


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




# तपशील

अंक चौथा, वर्ष पहिले, १९९६

**संपादक**

डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

**रचना**

हेमचंद्र कराडकर

**अक्षरजुळणी**

अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**

सौ. रूपा नाशिककर
श्रेयस डिझायनर्स ॲण्ड प्रिंटर्स,
ठाणे.

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ – अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२

## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका



## संपादकीय

प्रिय रसिक वाचकहो,

'तपशील'चा हा चौथा अंक आपल्या हाती देताना आम्हास आनंद होत आहे. 'तपशील'च्या तिसऱ्या अंकात एका नवीन लेखकाचा परिचय त्याच्या साहित्यकृतीचा सारांश आणि मुलाखत याद्वारे घडावा असा हेतू ठेवून पी. डी. जेम्स या लेखिकेचा परिचय करून दिला होता. या अंकात याच हेतूने 'आयरिस मरडॉक' या तत्त्वचिंतनात्मक ललितलेखन करणाऱ्या लेखिकेचा परिचय करून देण्याचा हेतू होता. त्यासंबंधीचा डॉ. आनंद जोशी यांचा लेख आमच्या हाती आलेला असून स्थलमर्यादेच्या कारणास्तव आम्ही तो या अंकात छापू शकलो नाही याबद्दल दिलगीर आहोत. तो लेख पुढील अंकात प्रसिद्ध करू.

डी. एच. लॉरेन्सच्या व्यक्तित्त्वाची ओळख करून देणाऱ्या 'प्रेमपुजारी' या लेखाचा पुढील भाग यात समाविष्ट केला आहे. तसेच 'असा हा वाचनछंद' मध्ये डोरिस लेसिंग या लेखिकेच्या वाचनछंदविषयक आठवणींचा आनंद आपण लुटू शकाल.

मिशेल तुर्निए यांच्या 'फ्रायडे' कादंबरीची महत्ता व त्याविषयीचे विवेचन आपण मागच्या अंकात वाचले आहे. या अंकात त्याचा पुढचा भाग-प्रत्यक्ष कादंबरीशी संबंधित वाचावयास मिळेल.

डॉ. जॉन्सन यांचा चरित्रकार बॉसवेल हा स्वत:देखील प्रतिभावंत लेखक होता. या स्वयंप्रतापी लेखकाचा परिचय् येथे नव्याने करून देत आहोत.

जपानी चित्रलिपीमुळे त्या भाषेशी जवळीक साधणे कठीण होते. या भाषेशी फारच कमी लोकांशी गट्टी असते. त्यामुळे जपानी भाषेतील साहित्याचा अनुवाद आपणास फार मोठ्या प्रमाणावर आढळत नाही. दुसऱ्या अंकात आपण टोनी मॉरिसन या कृष्णवर्णीय, नोबेल पुरस्कार विजेत्या लेखिकेच्या भाषणाचा अनुवाद वाचला असेलच. या अंकात केन झाबरो ओओे या जपानी लेखकाच्या भाषणाचा अनुवाद आपण वाचू शकाल. नोबेल पारितोषिक वितरणाच्या वेळी केलेलेच हेही भाषण आहे.

आधीच्या अंकाप्रमाणेच याही अंकाचे स्वागत आपण कराल अशी आशा आहे. आपल्या सूचनांचे आम्ही स्वागत करू. मोकळेपणाने आपले अभिप्राय कळवावेत.

- संपादक

**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.



अनुक्रमणिका



# साहित्य आणि समाज

## एका जपानी लेखकाचे निवेदन - गोंधळलेला जपान आणि मी

- प्रतिभा टिल्लू

(नोबेल पारितोषिक घेताना केन झाबरो ओअे यांनी केलेल्या भाषणाचा मुक्त अनुवाद)

[ एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला रशियात निहिलिझम हा शब्द निर्माण झाला. पण टर्जिनेव्हच्या १८६० मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'फादर्स अँड सन्स' ह्या कादंबरीपूर्वी तो वापरलेला आढळत नाही. ह्या कादंबरीचे मध्यवर्ती पात्र असलेला बझाराव्ह त्या काळातल्या निहिलीझमच्या कडवट उच्चाराकडे अभिमानपूर्वक दुर्लक्ष करतो. निहिलिझमचा शिक्का बसलेल्या इतर लेखकांच्या पात्रांपेक्षा हे पात्र अगदीच वेगळे आहे. ते राजकीय नव्हतेच. कारण एकीकडे परंपरेवर विश्वास पण दुसरीकडे भौतिक तत्त्वज्ञानाशी बांधिलकी आणि सध्याच्या समाजात मूलभूत बदल व्हावेत अशी जबरदस्त इच्छा असणारा असा हा बझाराव्ह होता. ह्या काळात रशियात 'चिरडता येण्याजोगे चिरडून टाका, वादळात टिकून राहील तेच उत्तम' हा मंत्र क्रांतीचा मार्ग (Road to Revolution) म्हणून म्हटला जात असे. बझाराव्ह हा प्रतिध्वनी थोडा अधिक मोकळेपणाने काढतो.

ह्या शब्दाचा युरोप अमेरिकेत झपाट्याने प्रचार झाला आणि मग मात्र त्याचा निर्नायकी क्रांतीचा वास गेला. राजकीय कार्यक्रम किंवा विद्वानांची चळवळ असंही स्वरूप त्याला उरलं नाही. ह्या शब्दाला नेमकेपणा, स्पष्टपणा प्राप्त झालाच नाही. एका बाजूला नैतिकतेच्या मापदंडाच्या संदर्भात मोठ्या प्रमाणात वापरला जाऊ लागला. दुसरीकडे मनुष्याच्या अस्तित्वाच्या क्षुद्रपणाबद्दल / रितेपणाबद्दल असणाऱ्या सार्वत्रिक हताशपणामुळे हा शब्द त्या अर्थीही वापरला जाऊ लागला. नास्तिकांच्या विरुद्ध उघडलेल्या एकोणिसाव्या शतकातील एका संघटनेमुळे हा दुहेरी अर्थ प्राप्त झाला होता. नास्तिक हे निहिलिस्ट मानले जातात. नास्तिकवादी नैतिकता मानीत नाहीत असे मानले जात असे. स्वाभाविकच तो दुष्ट, स्वार्थी, आपमतलबी एवढेच काय गुन्हेगारही ठरू शकत असे; त्याला आयुष्य निरर्थक वाटत असे व तो निराश होऊन आत्महत्येच्या मार्गाला वळत असे. अजूनही नास्तिकता आणि निहिलिझम हे शब्द जवळचे म्हणून वापरले जातात.

विसाव्या शतकात ह्या विषयाचा अभ्यास सुरू झाल्यामुळे ही प्रतिमा थोडी बदलू लागली आहे. तरुण पिढी आता निहिलिस्टांना 'विक्षिप्त' निराश, नास्तिक वगैरे मानीत

नाही,तर निहिलिझम हा नास्तिकवादामुळे नव्हे तर यांत्रिकीकरणामुळे, औद्योगिकीकरणामुळे, सामाजिक दबावांमुळे होतो असे ही पिढी मानते शिवाय त्याचे विशिष्ट परिणाम हे स्वार्थीपणा किंवा आत्मघात नसून बेपवाई,दुरावा, तिरकेपणा किंवा विस्कळित होणे आहे.

निहिलिझमचा दुसरा परिणाम हा तर्कशास्त्र किंवा तत्त्वज्ञानापेक्षा मानसशास्त्रीय आणि सामाजिक आहे. अँटी निहिलिझमच्या दोन प्रकारांच्या संदर्भात इथे दोन प्रश्न उपस्थित होतात. १) परमेश्वरावरचा विश्वास उडाल्यामुळे आयुष्याचे वैय्यर्थ जाणवून नैराश्य आणि रितेपणा येईल का ? आणि आला तर त्याचे पर्यवसान स्वार्थीपणात आणि कोडगेपणात होईल का? औद्योगिकीकरणामुळे किंवा प्रस्थापित सामाजिक दबावांमुळे आमचे आयुष्य अगदी नगण्य करून टाकले आहे.

त्यामुळे आम्हाला तुटलेपणा आला आहे हे खरं आहे का ? ह्याला दिलेले नकारात्मक उत्तर समकालीन साहित्याच्या बऱ्याचशा टीकेच्या विरुद्ध जाईल. ह्या प्रश्नाला नुसतंच होकारार्थी उत्तर मात्र योग्य ठरेल असे वाटत नाही, कारण उत्तरायुष्य घालवण्यासाठी देवावर विश्वास असावा हे विधान सत्याचा अपलाप करणारे ठरेल. टॉलस्टॉयच्या मानसिक झगड्याचे वर्णन ज्यांनी वाचले ते त्याचे दोन अर्थ लावतात. रसेलला ह्यालाच तोंड द्यावे लागले. पण देवाकडे न वळता तो कसा तगला ह्याचे वर्णन तो A free man's worship मध्ये करतो. मात्र रसेलला कुणीही अनीतिमान म्हणू धजावणार नाही.]

गेल्या विध्वंसक जागतिक युद्धात मी एक लहानगा मुलगा होतो. स्टॉकहोमपासून हजारो मैलांवर असलेल्या जपानी द्वीपसमूहाच्या शिकाकू बेटावरच पण अगदी आत आत असलेल्या गर्द झाडीत मी राहात असे. 'द ॲडव्हेंचर ऑफ हकलबरी फिन्स' आणि 'द वंडरफुल ॲडव्हेचर्स ऑफ नील' ह्या दोन पुस्तकांनी मी त्यावेळी खरोखरीच मंत्रमुग्ध झालो होतो. भयग्रस्ततेच्या लाटांच्या तडाख्यात त्यावेळी सारे जगच सापडले होते. मी रात्रीच्या वेळी डोंगरावरच्या जंगलात जात असे. तिथल्या वनराजीत झोपताना माझ्या मनाला सुरक्षित वाटत असे. अशी सुरक्षितता मला घरातसुद्धा वाटत नसे. हकलबरी फिन्स वाचल्याकारणाने हे माझे वागणे संयुक्तिक आहे अशी मी माझ्या मनाची समजूत घालीत असे. 'ॲडव्हेंचर ऑफ नील'च्या कथानकात नायकाचे रूपांतर एका लहानशा प्राण्यात होते. तो प्राणी पक्ष्यांची भाषा जाणतो व साहसी प्रवास करतो. त्या कथानकाने माझ्या ज्ञानेंद्रियांना सर्वतोपरी सुख दिले. शिकाकूच्या बेटावर त्या गर्द राईत माझे पूर्वज राहात असत. मी आता त्यांच्यासारखाच तेथे राहू लागल्यानंतर मला असा साक्षात्कार झाला की ह्या बेटावरचे हे जग आणि त्यातले जीवन हे खरोखरीच मुक्तता प्राप्त करून देणारे आहे. ही जाणीव म्हणजेच त्या सुखांपैकी एक सुख ! दुसरं म्हणजे मला खट्याळ नीलबद्दल सहानुभूती वाटून मी नीलशी सरूप

झालो. स्वीडनभर विहार करताना, जंगली बदकांबरोबर राहाताना, त्यांच्यासाठी इतरांशी मारामाऱ्या करताना नीलचे रूपांतर होते अजूनही निष्पाप राहिलेल्या तरीही आत्मविश्वासाने ओसंडणाऱ्या विनम्र मुलात ! अखेर अशा साहसी प्रवासानंतर नील घरी येतो आणि आईवडिलांशी बोलतो. मला वाटतं की या कथेतून मी आनंदाची जी परिसीमा गाठली ती त्या भाषेमुळे ! कारण नीलसह मीसुद्धा बोलत आहे या भावनेने मला शुद्ध आणि उन्नत झाल्यासारखं वाटलं. त्याच्या भाषांतरित फ्रेंच व इंग्लिश शब्दांचं मराठी भाषांतर पुढीलप्रमाणे,'नील अत्यानंदाने ओरडला "आईबाबा, मी आता मोठा झालो. मी नव्याने पुन्हा माणूस झालो."

विशेषत: 'मी आता नव्याने माणूस झालो आहे' ह्या वाक्याने मी अगदी भारून गेलो. मी जसजसा मोठा होऊ लागलो तसतसा आयुष्याच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर मला सतत कष्टांना तोड द्यावे लागले. माझ्या कुटुंबात, जपानी समाजाशी असलेल्या माझ्या संबंधामुळे (आणि माझ्या एकूणच जगण्याच्या पद्धतीमुळे) विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात मला हे कष्ट करावे लागले. ह्या कष्टांना मी कादंबरीचे स्वरूप दिल्यामुळे माझे जगणे मला सुसह्य झाले. 'मी आता परत नव्याने माणूस झालो आहे', हे शब्द जवळजवळ उसासे टाकत मी परत परत म्हणत असे. मी स्वत:बद्दल असे बोलणे हे ह्या जागी, ह्या प्रसंगी कदाचित अप्रस्तुत असेलही, तरी देखील आपण मजवर कृपा करावी आणि माझी मूलभूत लेखनशैली वैयक्तिक घटनांमधून सुरू होऊन समाज, देश आणि जग ह्यांच्यापर्यंत कशी पोहोचते ते सांगण्याची मला परवानगी द्यावी. इतकेच नव्हे, तर अजूनही थोडेसे आणखी मी स्वत:बद्दल बोललो तरी आपण मला क्षमा कराल अशी मला आशा आहे.

अर्ध्या शतकापूर्वी त्या घनदाट जंगलात राहात असताना 'द वंडरफुल ॲडव्हेंचर्स ऑफ नील' वाचल्यानंतर त्यात दोन भाकिते आहेत असे मला वाटले. एके दिवशी मला पक्ष्यांची भाषा कळेल हे पहिले भाकीत आणि मी माझ्या प्रिय सहचरीबरोबर बहुधा स्कँडेनेव्हियाकडे उडून जाईन हे दुसरे भाकीत !

आम्हाला विवाहानंतर झालेले पहिलेच मूल मतिमंद निघाले. आम्ही त्याचे नाव 'हिकारी' ठेवले.– या शब्दाचा जपानीतील अर्थ 'प्रकाश'. तो छोटा असताना मानवी आवाजाला तो कधीच साद देत नसे, फक्त रानपाखरांच्या चिवचिवाटाला मात्र प्रतिसाद देत असे. तो सहा वर्षांचा असतानाची गोष्ट ! त्या उन्हाळ्यात आम्ही आमच्या खेड्यातल्या घरात राहात होतो. घराजवळच्या राईपलीकडे एक पाणथळ जागा होती,त्या पाणथळ जागेपलीकडे वनराई होती. त्या झाडीतून पाणपक्षी ( Water rails) संथ आवाजात एका लयीत गुंजन करीत. तो आवाज त्याने ऐकला आणि एखाद्या रानपक्ष्याचे ध्वनिमुद्रण करणाऱ्या निवेदकाच्या आवाजात तो म्हणाला 'ते पाणपक्षी आहेत.' माझ्या मुलाने मानवी वाणीचा उच्चार केल्याची ती पहिलीच





अनुक्रमणिका

वेळ होती. त्यानंतरच आम्ही दोघांनी त्याच्याशी शाब्दिक संवाद व संपर्क साधायला सुरुवात केली. आता आमचा हिकारी अपंगांच्या एका व्यावसायिक प्रशिक्षण केंद्रात काम करीत आहे. ही संस्था ज्या कल्पनांवर आधारित आहे,त्या कल्पना आम्ही स्वीडनपासून शिकलो. दरम्यानच्या काळात तो संगीताची रचना करीत आहे. त्याने निर्मिलेल्या संगीताचे प्रेरक पक्षीच होते. ह्या पक्ष्यांनीच त्याला संगीतनिर्मितीची संधी आणि माध्यम मिळवून दिले. हिकारीला पक्ष्यांची भाषा समजली होती. मला पक्ष्यांची भाषा समजेल हे माझे भाकीत माझ्यावतीने त्याने पुरे केले. मला ह्या ठिकाणी हेसुद्धा सांगायलाच हवे की माझे जगणे माझ्या पत्नीशिवाय अशक्यच झाले असते. तिच्या असीम स्त्रीशक्तीमुळे आणि शहाणपणामुळे ते खरोखरी सुसह्य झाले. नीलच्या बदकांच्या पुढाऱ्याला 'अक्का' म्हणतात. माझी पत्नी ही मूर्तिमंत अक्का आहे. तिच्याबरोबर मी स्टॉकहोमला आलो आहे आणि माझे दुसरेही भाकीत अशा तऱ्हेने खरे ठरले आहे, हे सांगण्यास मला अतिशय आनंद होतो आहे.

नोबेल पारितोषिकाचा पहिला जपानी मानकरी– यसूनारी कावाबाटा. १८९९ ते १९७२ ह्या कालखंडातला हा प्रख्यात जपानी कादंबरीकार ! त्याची शैली काव्यात्म व चित्रदर्शी होती. त्याच्या साहित्यात मृत्यू, विनाश, एकाकीपणा ह्यांचे प्रभावी चित्रण आढळते. जपानमधील सर्व वाङ्मयीन पारितोषिके त्याला लाभली. अनेक भाषांमधून त्याच्या कादंबऱ्यांची भाषांतरेही झाली. अशा ह्या लेखकाने ह्याच व्यासपीठावरून दिलेल्या व्याख्यानाचा विषय होता : 'सर्वोत्कृष्ट जपान आणि मी' ते भाषण अत्यंत देखणेही होते व एकदम संदिग्धही (Vague) होते. इंग्रजी 'व्हेग' हा शब्द मी जपानी आइमाइना (Aimaina) ह्या शब्दासाठी योजला आहे. या जपानी अव्ययाचे भाषांतर अनेक तऱ्हांनी होऊ शकेल. कावाबाटाच्या भाषणातील संदिग्धपणाला त्याने योजलेल्या शीर्षकापासूनच सुरुवात होते. ते शीर्षक 'सुंदर जपानचा मी.' असेही होऊ शकेल. हा गोंधळ जपानी नो (No) मुळे (म्हणजेच खऱ्या अर्थाने – Of – च्या मुळे) झाला आहे. मी आणि सुंदर जपान हे दोन्ही शब्द अतिशय संदिग्धपणे वापरल्यामुळे त्यातून अनेक गोष्टींचे सूचन होते. या सूचनातून अनेक प्रकारचे अर्थ ध्वनित होतात. त्यातून असेही सूचित होते की, 'सुंदर जपानचा भाग असलेला मी.' जपानी (No) च्या नंतर येणारे नाम हे त्या आधी येणाऱ्या नामाशी ताबा, मालकी, बांधिलकी दर्शविते. ज्याप्रमाणे कावाबाटाच्या भाषणाचे इंग्रजी शीर्षक दाखवले आहे त्याप्रमाणे विरुद्धार्थीही ही जोडणी होते. हे भाषांतर एका अमेरिकन जपानी भाषाविशेषज्ञाने केलेले आहे. अर्थात ह्या ठिकाणी हे लक्षात ठेवले पाहिजे की ह्या भाषांतरप्रकरणात भाषांतर–काराची लबाडी किंचितसुद्धा नाही.

कावाबाटा आपल्या भाषणात फक्त जपानी विचारातच नव्हे तर पूर्वेकडील देशांच्या विचारात व्यापकपणे आढळणाऱ्या एका विलक्षण गूढवादाबद्दल बोलला. विलक्षण म्हणजे

झेन बुद्धिझमकडे झुकणारे विचार असा अर्थ इथे मला अभिप्रेत आहे. विसाव्या शतकातला लेखक असूनही कावाबाटा आपल्या मन:स्थितीचे वर्णन मध्ययुगीन झेन साधूच्या कवितातील परिभाषेच्या आधारे करतो. ह्या कवितांपैकी बहुतांश कविता ह्या सत्य सांगण्याबाबतची भाषा-शास्त्रीय असमर्थता व्यक्त करणाऱ्याच आहेत. या कवितांमध्ये शब्द स्वत:च्याच अर्थबंधनात बंदिस्त होतात. ह्या कवितांमधून हे शब्द बाहेर येतील आणि आपल्यापर्यंत अर्थ पोहोचवतील अशी आपणास वाचक म्हणून अपेक्षा करता येत नाही. स्वत:ला ह्या कवितांच्या स्वाधीन करून टाकल्याशिवाय आणि शब्दांच्या भोवतालचा तटबंदी भेदून शब्दांच्या पोटात शिरल्याशिवाय कोणालाच ह्या कवितांचे आकलन होणार नाही व त्यासंबंधी सहानुभाव वाटणार नाही.

दीक्षा घेतलेल्या शिष्यांनाच समजतील अशा जपानी भाषेतील अतिशय गूढ कविता स्टॉकहोममधील प्रेक्षकांसमोर. वाचण्याचा धाडसी निर्णय कावाबाटाने का बरे घेतला असावा? आपल्या लक्षणीय कारकीर्दीच्या शेवटी त्याने जो सरळसरळ धाडसीपणा प्राप्त करून घेतला होता आणि ज्या धाडसीपणाच्या आधारे आपल्या श्रद्धांचा कबुलीजबाब त्याने दिला, त्याकडे आज मी स्मृतिव्याकुलतेने पाहात आहे. कैक दशके कावाबाटा साहित्यिक पंढरीचा वारकरी होता. या कालखंडात त्याने प्रचंड अक्षरसाहित्य निर्माण केले. ह्या वारीच्या शेवटी त्याने एक कबुलीजबाब दिला होता. सहजासहजी हाती न लागणाऱ्या जपानी कवितांनी तो भारावून गेला होता. त्या कवितांच्या आकलनाच्या कोणत्याही प्रयत्नात मनाचा गोंधळ कसा उडतो हे त्याने आपल्या कबुलीजबाबात सांगितले. हे सांगितल्यानंतरच तो 'सुंदर जपान आणि मी' म्हणजेच ज्या जगतामध्ये तो जगला आणि जे वाङ्मय त्याने निर्माण केले त्याबद्दल तो बोलू शकला.

त्याउप्पर कावाबाटाने ज्या शब्दात त्याचे भाषण संपविले ते शब्द लक्षात घेण्याजोगे आहेत–

"माझे लेखन हे रितेपणा
दर्शविणारे आहे असे म्हटले
गेले आहे पण तो रितेपणा
पाश्चात्त्य निहिलिझम (मिथ्यावाद/
उच्छेदवाद) ह्या अर्थाने घेतला
जाऊ नये कारण त्याचा आध्यात्मिक
पायाच सर्वस्वी वेगळा आहे.
ऋतूंबद्दलच्या आपल्या
कवितांना त्याने Innate





Realism (अंगभूत वास्तववाद)
असे शीर्षक दिले. एकीकडे
ऋतूंचे गुणगान करीत असताना
डोगन त्याचवेळी झेनमध्ये
पूर्णपणे बुडालेला होता.
– एडवर्ड सायडेनस्टीकर) यांच्या इंग्रजी भाषांतरावरून

(वर उल्लेखिलेला डोगन (१२००– १२५३) हा जपानी बुद्धिस्ट. जपानला याने झेनची ओळख करून दिली. वृत्तीने कलावंत होता. चीनमध्ये झेनपद्धतीची ध्यानधारणा शिकला. जपानमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी राहून पद्मासनात ध्यान करणे, आत्मज्ञान मिळवणे ह्याचा त्याने प्रसार केला. अनेक पुस्तकेही लिहिली.)

इथेही मला स्वमताचा आग्रह धरणारी धीट आणि अगदी स्पष्ट विधाने सापडतात. एका बाजूला कावाबाटा खरोखरीच झेन तत्त्वज्ञानाच्या परंपरेशी आणि पौर्वात्यांच्या अभिजात साहित्याला व्यापलेल्या सौंदर्यवादी जाणिवेशी आपण स्वत: एकरूप आहोत असे सांगतो त्याचवेळी दुसऱ्या बाजूला पाश्चिमात्यांच्या 'निहिलिझम'पासून स्वत:च्या लेखनातला रितेपणा वेगळा आहे हेही मुद्दाम वाकडी वाट करून सांगतो. आल्फ्रेड नोबेलने आपल्या आशा आणि आपला विश्वास ज्या मनुष्यजातीच्या पुढील पिढ्यांच्या हवाली केला होता त्या पुढील पिढ्यांना कावाबाटा आपल्या भाषणात दिलखुलासपणे साद घालीत होता.

तुम्हाला खरे सांगायचे तर, जो कावाबाटा ह्या ठिकाणी सव्वीस वर्षांपूर्वी उभा राहिला, त्या माझ्या देशबंधूपेक्षा विल्यम बटलर यीट्स ह्या आयरिश कवीबद्दल मला जास्त आध्यात्मिक आकर्षण वाटते. एकाहत्तर वर्षांपूर्वी साहित्याचे नोबेल पारितोषिक घेताना तो जवळजवळ आजच्या माझ्या वयाचा होता. अर्थातच यीट्सच्या काव्यात्म प्रतिभेच्या पंक्तीत मी बसतो असे मी गृहीत धरीत नाही. मी त्याच्या देशापासून खूप दूरवर असणाऱ्या देशात राहाणारा केवळ एक विनम्र अनुयायी आहे. यीट्सने ज्या विल्यम ब्लेकच्या लेखनाचे पुनर्मूल्यांकन करून त्याला या शतकातल्या उच्चपदावर नेऊन ठेवले त्या विल्यम ब्लेकसंबंधी यीट्सने एकदा लिहिले की, त्याची कविता 'अखंड युरोप, आशिया, चीन आणि जपानमध्ये विजेच्या चमचमाटाप्रमाणे चमकली. [विल्यम ब्लेक (१७५७ – १८२७) हा गूढवादी इंग्रज कवी, चित्रकार. कविता आणि द्रष्टेपणा हे दोन समानार्थी शब्द आहेत अशी त्याची भूमिका होती. त्याची कविता उत्स्फूर्त व साधी वाटली तरी अंतर्यामी ती गूढ होती. त्याच्या हयातीत त्याला कीर्ती मिळाली नाही. पण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस त्याच्या प्रतिभेची मौलिकता आणि सामर्थ्य ओळखले गेले.]

गेली काही वर्षे मी एकमेकांशी संबंधित तीन साहित्यकृती– त्रिधारा – लिहिण्यात गुंतलो

आहे. माझ्या साहित्यविषयक कृतींचा तो परमोच्च बिंदू ठरावा अशी माझी इच्छा आहे. दोन भाग आधीच प्रसिद्ध झाले आहेत. तिसरा आणि शेवटचा भाग मी नुकताच लिहून पुरा केला. जपानी भाषेत त्याचे शीर्षक आहे 'तेजाळलेला हरितवृक्ष'. ( Flamming Green Tree ) यीट्सच्या Vacillation (व्हॅसिलाशन) या कवितेतून ते घेतलेले आहे.

"एक वृक्ष —

अगदी भरगच्च फांद्यांनी लगडलेला,

निम्मा तेजाळलेल्या पालवीचा,

निम्मा अगदी हिरवागार,

अफाट पर्णसंभार- दवाने भिजलेला."

खरं पाहाता यीट्सच्या समग्र काव्याच्या ओसंडणाऱ्या प्रभावात माझी 'त्रिधारा' चिंब भिंजलेली होती. यीट्सला नोबेल मिळाले तेव्हा आयरिश सेनेटने त्याच्या अभिनंदनाचा ठराव पास केला. त्या ठरावातले काही शब्द व काही वाक्ये— ". . . . ह्या त्याच्या यशातून जगातील संस्कृतीत भर घालणारा देश म्हणून आमच्या देशाला मिळालेली मान्यता;" ". . . . ह्यापूर्वी ह्या आयरिश वंशाला आजपर्यंत सन्माननीय राष्ट्रांमध्ये गणले गेलेले नव्हते." आणि "विनाश करण्याच्या वेडगळ आणि उत्साही कल्पनांपासून दूर झालेल्या लोकांची दाणादाण उडविली जाण्याचे भय नेहमीच असणार" (नोबेल प्राइझ – सेनेटर यीट्सचे अभिनंदन)

यीट्स हा असा लेखक आहे की ज्याच्या पावलांवर पाऊल ठेऊन चालावे असे मला वाटते. सांस्कृतिक क्षेत्रातील कार्यासाठी नव्हे, तर ज्या देशाच्या विद्युत अभियांत्रिकीच्या तंत्र ज्ञानामुळे आणि मोटारींच्या उत्पादनामुळे ज्याला ह्या पाश्चिमात्य देशांसारख्या विकसित देशांच्या यादीत अगदी अलीकडे समाविष्ट केले गेलेले आहे अशा देशासाठी मला यीट्सच्या पावलावर पाऊल टाकून जावेसे वाटते. शिवाय "विनाशाच्या वेडगळ कल्पनांनी भारून जाऊन" ज्या देशाने आपल्या स्वत:च्या देशाची व आपल्या शेजारी देशांचीही दाणादाण उडविली, अशा देशाचा नागरीक म्हणूनही मला यीट्सचे अनुयायित्व करायला आवडेल.

मी विद्यमान जगात एक नागरीक म्हणून राहातो आहे. माझ्या मन:पटलावर भूतकाळातल्या स्मृती अगदी कोरल्यागत आहेत. या स्मृतीत मी इतरांबरोबर सहभागी आहे. असे असल्याकारणाने कावाबाटाच्या सुरात सूर मिसळून 'सुंदर जपान आणि मी' असे उद्‌गार मला काढता येणार नाहीत.

कावाबाटाच्या भाषणाचे शीर्षक व आशय यातील संदिग्धतेचा मी नुकताच उल्लेख केला होता. प्रख्यात ब्रिटिश कवयित्री कॅथलीन रेन हिने Vague आणि Ambiguous ह्या दोन शब्दामधील अर्थछटा स्पष्ट केल्या होत्या. कॅथलीन रेन (जन्म १९०८) ही विद्यमान

कवयित्री व टीकाकार. तिचे पुष्कळ कवितासंग्रह प्रसिद्ध, आत्मचरित्राचे तीन खंडही प्रसिद्ध. स्कॉटलंडच्या निसर्गसौंदर्याबद्दलच्या कविता, विशेष म्हणजे 'ब्लेक'वरचा टीकाग्रंथ अधिक गाजला. माझ्या उर्वरित भाषणात मी 'गोंधळलेला' हा शब्द 'संदिग्ध' ह्या शब्दाऐवजी वापरीन. कॅथलीन रेन एकदा ब्लेकबद्दल म्हणाली होती की, तो 'गोंधळलेला' आहे असे म्हणण्याइतका 'संदिग्ध' नव्हता. मला माझ्यासंबंधी बोलताना 'गोंधळलेला जपान आणि मी' ह्याखेरीज काही बोलता येणार नाही.

जपान या देशाचा बाहेरच्या जगाशी संपर्क आल्यास आज १२० वर्षे झाली. या काळात सुधारणा व आधुनिकीकरण ह्या दोन्ही प्रक्रियांना इथे सुरुवात झाली. माझ्या असे लक्षात आले आहे की विद्यमान जपान हा दुभंगला गेला आहे. मी एक विद्यमान लेखक असल्याकारणाने ह्या विभाजनाच्या खुणा माझ्या मनावर खोलवर उमटल्या आहेत. ही स्थिती इतकी जबरदस्त आणि आत आत घुसणारी आहे की, ती माझा देश आणि माझ्या देशातील लोक ह्यांना सरळ विभागते, हे अनेक बाबतीत अगदी स्पष्टपणे दिसून येते. आधुनिकीकरण, पाश्चिमात्यांकडून घेतलेले धडे आणि पाश्चिमात्यांची नक्कल करून आलेले शहाणपण यांच्या रोखाने जपान जात आहे. असे असले तरी जपान आशियातच आहे आणि आपल्या पारंपारिक संस्कृतीला जपून आहे. जपानच्या गोंधळलेल्या मानसिकतेमुळे त्याच्याकडे आशियातला आक्रमक देश म्हणून पाहिले जाते. या शतकाच्या पहिल्या पन्नास वर्षात आधुनिक जपानची संस्कृती खुली आहे, मोकळी आहे असे पाश्चिमात्यांना भासत असे पण वस्तुत: ती आणखी काही वर्षे गूढच राहील. शिवाय ती नेहमीच अनाकलनीय रहाणार आहे. निदान ती त्यांना समजणे अवघड वाटेल. ह्या सगळ्यापेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे फक्त राजकीय दृष्ट्याच नव्हे तर सामाजिक आणि सांस्कृतिक दृष्ट्याही, इतर आशियाई देशांपासून जपान एकाकी पडला.

आधुनिक जपानच्या वाटचालीत साहित्यिक आपल्या कर्तव्याबद्दल अत्यंत जागरूक आहेत. या जागरूकतेशी इमान राखणाऱ्या ह्या युद्धोत्तरकालीन लेखकांनी वाङ्मयक्षेत्रात युद्ध संपता संपता प्रवेश केला. युद्धाच्या महाभयंकर संकटाने त्यांना आत्यंतिक वेदना झाल्या असल्या तरी त्यांना पुनरुत्थानाची आशा होती. जपानच्या सैन्याने आशियाई राष्ट्रांवर केलेल्या अमानुष क्रौर्याची भरपाई करण्याचा त्यांनी प्रयत्न केला; त्याचबरोबर पाश्चिमात्य व जपान ह्यात पडलेली प्रचंड दरी बुजवण्याचाही प्रयत्न केला. आफ्रिका आणि मध्य व दक्षिण अमेरिकेतील देश ह्यांमध्येही सेतू बांधण्याचा प्रयत्न केला. अत्यंत विनम्रपणे ह्या प्रश्नाला सामोरे गेल्यास बाहेरच्या जगाशी दिलजमाई करता येईल असे त्यांना वाटत होते की काय? या लेखकांच्याकडून माझ्याकडे आलेल्या परंपरागत वाङ्मयीन वारश्याला चिकटून राहाण्याची माझी नेहमीच इच्छा असे.

आधुनिकीकरणाच्या काळातील जपानी लोक आणि नंतरच्या काळातील जपानी लोक ह्या

दोन काळातील लोकांची स्थिती अगदी गोंधळाची होती आणि ती तशी असण्यावाचून दुसरे काहीही असूच शकत नव्हते. जपानच्या ऐतिहासिक आधुनिकीकरणाबरोबर मधल्या काळात दुसरे महायुद्ध झाले. ह्या महायुद्धाने जपानला आधुनिकीकरणाच्या कल्पनेपासून फार दूर नेले. पन्नास वर्षांपूर्वी जपानचा पराभव झाला. स्वत:च युद्धाचे कारण असलेल्या जपानला त्यातून सुटका करून घेण्याची संधीच ह्या पराभवामुळे मिळाली. ( जपानी लेखकानी जपानची युद्धोत्तर विपन्नावस्था आणि कारुण्यपूर्व व्यथा वर्णन केल्या होत्या. ) युद्धाचे दलाल असण्याच्या आरोपातून सुटका होऊन पुनर्जन्म हवा असल्यास जपानला 'लोकशाहीची कल्पना' व 'युद्ध न पुकारण्याचा निश्चय' हा नैतिक आधार धरूनच ठेवायला हवा होता. ह्यात गंमत अशी होती की अशा प्रकारच्या नैतिक आधारावर उभे राहू पाहाणारे जपानी लोक आणि त्यांचा देश हे निष्पाप तर नव्हतेच, पण इतर आशियाई राष्ट्रांवर स्वाऱ्या करण्याच्या त्यांच्या भूतकाळामुळे ते कलंकितच होते. हिरोशिमा व नागासाकीवर प्रथमच टाकलेल्या अण्वस्त्रांचे बळी झालेले वा त्यातून वाचलेले आणि अणुकिरणोत्सर्गाचे परिणाम झालेले हे लोक व त्यांची अर्भके (ह्यात ज्यांची मातृभाषा कोरियन आहे असे हजारो लोकही आले. ) ह्या सगळ्यांनाच वर वर्णन केलेल्या नैतिक आधारांची आवश्यकता होती.

अलीकडे जपानवर टीका केली जाते. जपानने जागतिक शांततेसाठी आणि शांततेच्या पुनर्स्थापनेसाठी महत्त्वाची भूमिका बजावून या कामात सक्रिय सहभाग द्यावा. यासाठी जपानने अधिक माणसे व सामुग्री ह्यांचे प्रत्यक्ष असे लष्करी साहाय्य युनोला पुरवावे असे सुनावले जाते. आम्ही जेव्हा जेव्हा ही टीका ऐकतो तेव्हा तेव्हा आम्हाला आत्यंतिक वेदना होतात. वेदना अशासाठी होतात की दुसऱ्या महायुद्धाच्यानंतर आमच्या राज्यघटनेचे मुख्य तत्त्व 'आम्ही युद्धसंन्यास घेतला आहे' असे आहे, तसे आम्ही जाहीरही केले आहे. तसे जाहीर करण्याचा आम्हाला हुकूमच होता. जपानने युद्धानंतरच्या आपल्या पुनर्जन्मासाठी आवश्यक असलेल्या नैतिकतेचा पाया म्हणून शाश्वत शांतीचे हे तत्त्व स्वीकारले आहे. असे असताना आम्ही हे साहाय्य कुठून व कसे पुरवावे ?

मला विश्वास वाटतो की शाश्वत शांतीचे हे तत्त्व पश्चिमेला अधिक चांगले उमजेल. जाणीवपूर्वक लष्करी सेवा दूर ठेवणे आणि सहिष्णू परंपरा ह्या दोन कारणांमुळे ते त्यांना समजेल. युद्धसंन्यासाचे हे कलम घटनेतून काढून टाकावे यासाठी जपानमध्येच काही लोक प्रयत्नशील असतात. यासाठी ते बाहेरून येणाऱ्या दबावांचा संधी म्हणून उपयोग करतात. पण घटनेतील शाश्वत शांतीच्या ह्या कलमापासून दूर जाणे अयोग्य आहे. आशियाई लोकांचा आणि हिरोशिमा–नागासाकीमधील अणूबॉम्बच्या बळींचा तो विश्वासघात ठरेल. त्या विश्वासघातकी कृत्यांमधून काय निर्माण होईल ह्याची मला लेखक असल्यामुळे पुरेपूर कल्पना करता येते.

लोकशाही मूल्ये लाथाडू शकणारी 'सर्वंकष' सत्ता जपानच्या घटनेत अनुस्यूतच होती आणि त्याला जपान्यांचा पाठिंबाही होता. नव्या घटनेला अर्ध शतक उलटून गेले असले तरी काही भागात अजूनही जुन्याच घटनेबद्दल भावनिक जवळीक वाटणारे लोकही आहेतच. जर जपानला गेली पन्नास वर्षे जोपासलेल्या तत्त्वांपेक्षा वेगळी तत्त्वे स्थापित करायची असतील, तर युद्धोत्तर काळातील सुधारणांचा प्रयत्न, मानवतावादी तत्त्वांचे पालन करण्याचा आम्ही केलेला निश्चय हे सगळे विफल होईल, उद्ध्वस्त होईल. सामान्य माणूस म्हणून बोलताना ही सगळी भुतं माझ्या डोळ्यापुढे नाचत असतात.

मी ज्याला जपानचे गोंधळलेपण म्हणतो ते जुनाट दुखण्यासारखे आहे. हे गोंधळलेपण जपानच्या आधुनिक युगात सातत्याने अस्तित्वात होते. ह्या दुखण्यापासून जपानची आर्थिक भरभराटही मुक्त नाही. विद्यमान जागतिक अर्थव्यवस्था आणि पर्यावरणाचे रक्षण यांची जी संरचना आहे तिच्या प्रकाशात पाहिले असता एक गोष्ट आढळते, ती म्हणजे ही जपानी आर्थिक भरभराट अनेक प्रकारच्या संभाव्य धोक्यांच्या सहवासात नेहमीच बंदिस्त आहे. उलट हे गोंधळलेपण ह्या संदर्भात चढत्या क्रमाने जाणवते. आम्हा जपानी नागरिकांपेक्षा जगातल्या टीकाकारांच्या नजरेला ते आधिक्याने जाणवत असेल. युद्धानंतर आर्थिक दारिद्र्याच्या अगदी अधोबिंदूवर असताना देखील आम्हाला अशी आनंदी वृत्ती लाभलेली आहे की आम्ही पूर्ववत होण्याची आशा कधीच सोडलेली नाही. आताच्या भरभराटींमुळे काही अनिष्ट परिणाम होण्याचीही भीती आहे. ते परिणाम आम्हाला सोसता येतील का, ह्याचे वाटणारे भयही सहन करण्याची लवचिकता आम्ही अजून गमावलेली नाही. हे माझे म्हणणे एखाद्याला चमत्कारिक वाटले तरी ते अगदी सत्य आहे. आशियाचे उत्पादन व त्याची मागणी ह्या मूलभूत गरजाच इतक्या प्रसरण पावलेल्या असतील की जपानची ही भरभराट त्यात सहज खपून जाईल.

टोकिओच्या ग्राहकसंस्कृतीचे व एकूणच जगाच्या संस्कृतीचे पडसाद काही कादंबऱ्यांमधून उमटतात. ह्या कादंबऱ्यांपेक्षा पूर्णपणे वेगळे असे गंभीर स्वरूपाचे लेखन करू इच्छिणाऱ्या लेखकांपैकीच मी एक आहे. माझी ओळख एक जपानी म्हणून काय असावी? डब्ल्यू. एच. ऑडेनच्या (१९०७– १९७३) कवितेचा परिणाम त्याच्या नंतरच्या पिढीवर खूप होता. त्याचे कवितेवर प्रभुत्व होते. जुन्या कवितेपेक्षा वेगळी अशी त्याची कविता नव्या स्वरूपात प्रकट झाली. त्याने कादंबरीकाराची व्याख्या एकदा अशी केली होती –

"... among the just / Be just,
among the filthy filthy too,
And in his own weak person,
if he can
Must suffer dully all the wrongs of man (The novelist)

नेटक्यांशी / व्हावे नेटके
गवाळ्यांशी / व्हावे गबाळे
शक्य असेल तर सोसावेत ।
सगळ्या मानव्याचे प्रमाद –
स्वत:सकट ।
(कादंबरीकार)

लेखकाचा व्यवसाय पत्करल्यामुळे 'फ्लॅनेरी ओ कॉनर'च्या शब्दात 'ही तर होऊन गेली माझी जन्माची खोड !' फ्लॅनेरी ओ कॉनर (१९२५– ६४) ही अमेरिकन कादंबरीकार व कथाकार. गूढ, भयाण जागी घडत असलेली भयप्रद कथानके हे तिचे वैशिष्ट्य ! दहा काव्यसंग्रहांनी जे साधणार नाही ते तिच्या एका स्पष्टही, अवघडही पण सच्चा कवितेने घडते असे तिच्यासंबंधी म्हटले जाते.

जपानी व्यक्तिमत्त्व कसे असावे असे मला वाटते ? अशा व्यक्तिमत्त्वाची व्याख्या करण्यासाठी सभ्य (decent) या शब्दाची निवड करणे मला आवडेल. जॉर्ज ऑरवेल त्याच्या आवडत्या व्यक्तिचित्रांसाठी 'कनवाळू, समजूतदार, देखणा, ही विशेषणे वारंवार वापरतो त्यापैकीच 'सभ्य' हे एक मी वापरले आहे. हे विशेषण वरवर सोपे वाटेल. पण ते ठळकपणे उठून दिसेल आणि 'गोंधळलेला जपान आणि मी' ह्या शीर्षकात माझ्यासाठी वापरलेल्या 'गोंधळलेला' ह्या शब्दाच्या विरुद्धार्थी अर्थही दाखवील. त्यात चमत्कारिक गोष्ट अशी अशी आहे की जपान्यांकडे त्रयस्थ दृष्टीने पाहिले असता ते जसे दिसतात; आणि प्रत्यक्षात त्याना ते जसे दिसावेसे वाटतात त्यात महदंतर आहे. मी सभ्य (Decent) हा शब्द मानवतावादी (Humanist) ह्या शब्दाला पर्यायवाचक म्हणून वापरला तर ऑरवेल हरकत घेणार नाही असे मी गृहीत धरतो, त्याचे कारण असे आहे की सहनशीलता आणि कनवाळूपणा हे गुण ह्या दोन्ही शब्दात सारख्याच प्रमाणात आहेत.

जपान्यांची सभ्य आणि मानवतावादी अशी प्रतिमा निर्माण होण्यासाठी आमच्या पूर्वजांपैकी काहीजणांनी खडतर कष्ट उपसले. त्यापैकी एक म्हणजे कै. प्रोफेसर काजूओ वॉटनाबे. फ्रेंच प्रबोधनाच्या विचारांचा आणि साहित्याचा अभ्यासक. दुसऱ्या महायुद्धाच्या सुरुवातीला आणि मध्यावर देशभक्तीच्या अडाणी उत्साहाने वेढलेला असताना प्रो. वॉटनाबे एकच स्वप्न बाळगून होता. जपान्यांच्या निसर्गाबद्दल असलेली संवदेनक्षमता व सौंदर्यासक्ती या सुदैवाने अजूनही कशाबशा तग धरून असलेल्या भावनांवर मानवतावादी दृष्टिकोनाचे कलम करणे हे ते स्वप्न होते. मला प्रथम हा खुलासा करायला हवा की कावाबाटाच्या 'सुंदर जपान आणि मी' ह्यातल्या सौंदर्याच्या कल्पनांपेक्षा प्रो. वॉटनाबेच्या कल्पना अगदी वेगळ्या होत्या.



अनुक्रमणिका

पाश्चिमेच्या नमुन्याबरहुकूम आधुनिक असा नवा देश निर्माण करण्याचा जपानचा प्रयत्न हा खळबळ माजवणारा होता. एकीकडे दुरावा दाखवीत तर दुसरीकडे ह्या बदलाशी जवळीक साधीत जपानी बुद्धिमंतांनी त्यांचा देश आणि पश्चिम ह्यातले अंतर बुजविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. हे काम कष्टप्रदच होते. पण हे कष्ट प्रसूतीच्या वेणांप्रमाणे ओसंडून वाहाणारा आनंद देणारेही होते. प्रो. वॉटनाबेचा फ्राँसूआ राबले (Francois Rabelais ) ह्या लेखकाचा अभ्यास हा जपानी बुद्धिमंतांच्या जगातला प्रकर्षाने उठून दिसणारा विद्वत्तापूर्ण पराक्रमच होता. राबले हा १४९४- १५५३ ह्या कालखंडातला फ्रेंच उपहासात्मक लेखन करणारा लेखक. मध्ययुगीन ज्ञान आणि साहित्य यांचे विडंबन करणारे रूपकात्मक लेखन, सर्वसंगपरित्याग करण्यावर हल्ला आणि मानवतावादी मूल्यांचा आग्रह यासाठी त्याची आठवण केली जाते. ह्या लेखनासाठी त्याने विनोदी, कल्पक आणि उसळती, उत्साही, ज्वलंत भाषा वापरली होती. पँटाग्रुअेल (Pantagruel) आणि गॅरगॅन्टुआ (Gargantua) हे दोन ग्रंथ त्याची आठवण देतात. पँटाग्रुअेल ह्या त्याच्या उत्कृष्ट ग्रंथात उत्तर मध्ययुगीन समाजातल्या जनसामान्यांना खोड्यात टाकणाऱ्या ढोंग व अंधश्रद्धा यापासून त्यांची सुटका करण्याचा प्रयत्न आहे. गॉरगांता ह्या ग्रंथात त्याने प्रचलित शिक्षणपद्धती व बुरसटलेपणा ह्यावर परखड टीका केली होती. गॉरगांता व त्याचा पुत्र पांताग्रुअेल ही पात्रे मुळात एका राक्षसाच्या नावाची. त्यांचा आकार, आहार हे राक्षसांसारखे. ते विशाल बुद्धिमत्ता ह्यांचे द्योतक आहेत. त्यांच्या माध्यमातून त्याने आपले विचार मांडले.

दुसऱ्या महायुद्धापूर्वी वॉटनाबेचे शिक्षण पॅरीसमध्ये झाले. जेव्हा त्याने त्याच्या शैक्षणिक पर्यवेक्षकाला 'राबले' जपानीत नेण्याची आपली महत्त्वाकांक्षा सांगितली तेव्हा त्या प्रख्यात वृद्ध विद्वानाने ह्या महत्त्वाकांक्षी जपानी विद्यार्थ्याला उत्तर दिले – "भाषांतरित करणे कठीण अशा रावलेचे जपानीत भाषांतर हा अभूतपूर्व असा उद्योग आहे." दुसऱ्या एका फ्रेंच विद्वानाने अचंबित होऊन परखडपणे म्हटले, "हे तर अतिशय दमछाक करणारे, कष्टप्रद पण कौतुकास्पद काम आहे– अगदी पँटाग्रुअेल सारखेच." हे असे सगळे असले तरी युद्धाच्या काळात आणि अमेरिकेचा जपानवर असलेला ताबा– या दोन्ही प्रकारच्या हलाखीच्या स्थितीत वॉटनाबेने आपले काम पुरे तर केलेच पण राबलेचे भविष्यवेत्ते, समकालीन आणि अनुयायी असलेल्या फ्रेंच मानवतावाद्यांचे जीवन आणि त्यांचे विचार त्यावेळच्या बावरलेल्या आणि दिशाहीन झालेल्या, भरकटलेल्या जपानमध्ये त्याने त्यावेळी रुजविले.

माझ्या जीवनात आणि लेखनात मी वॉटनाबेचा विद्यार्थी आहे. माझ्यावर त्याचा महत्त्वाचा असा परिणाम दोन प्रकारे झाला. एक म्हणजे माझ्या कादंबरीलेखनाच्या पद्धतीवर परिणाम झाला. त्याने केलेल्या राबलेच्या भाषांतरामुळे मला 'मिखाइल बाख्तीनचे' म्हणणे नीट



अनुक्रमणिका

समजायला मदत झाली. बाख्तीन हा रशियन साहित्यसमीक्षक होता. बाख्तीनची विचित्र वास्तववादाची रूपक (Image) पद्धत, लोकप्रिय हास्यसंस्कृती, भौतिक आणि पदार्थ विज्ञानाच्या तत्त्वांचे महत्त्व, भौतिक, वैश्विक व सामाजिक ह्यातील परस्परसंवाद, एकाच वेळी घडणारे मृत्यू आणि पुनर्जन्माची वासना आणि नातेसंबंधाची उतरंड मोडणारे हास्य ह्या सगळ्या गोष्टी मी त्या भाषांतरामुळेच समजू शकलो. मुख्य स्थानापासून दूरवर अगदी हद्दीच्या कडेवर जपान हा देश आहे. अशा लांबवरच्या देशातही त्याहूनच दूर असलेल्या अंतर्गत भागात जन्मलेला आणि वाढलेला असा मी आहे. साहित्याची कार्यपद्धती समजून हा आजचा जागतिक मोठेपणा मिळवणे मला रूपकाच्या पद्धतीमुळे शक्य झाले आहे. अशी पार्श्वभूमी असल्यामुळे मी नव्या आर्थिक शक्तीच्या आशियाचे नव्हे, तर अक्षय दारिद्र्य व भांबावलेली शोधकता असलेल्या आशियाचे प्रतिनिधित्व करतो. पूर्वपरिचित रूपकाच्या आधारे मी मला कोरियाच्या 'किम ची हा', चीनच्या 'चोन आय' आणि 'म्यूजेन' यांच्या पंक्तीत बसवतो. जागतिक साहित्यातील बंधुत्व अशा प्रकारच्या प्रत्यक्ष सौहार्दावर अवलंबून आहे असे मला वाटते. मी एकदा एका प्रतिभावंत कोरियन कवीच्या राजकीय स्वातंत्र्याकरिता झालेल्या मूक हरताळात भाग घेतला होता. मला तर आता असे निषेध व्यक्त करणाऱ्या चिनी कादंबरीकारांच्या भवितव्याबद्दल चिंता वाटते. कारण त्यांचे स्वातंत्र्यच तियानमेन चौकाच्या प्रसंगापासून सर्वस्वी हिरावून घेतले गेले आहे.

दुसरे म्हणजे प्रो. वॉटनाबेने मला त्याच्या मानवतावादी मूल्य कल्पनेनेही भारून टाकले आहे. सगळ्या अस्तित्वात असलेल्या लोकांसाठी युरोपचा मानवतावाद ही एक नमुनेदार गोष्ट आहे. मिलन कुंदेराने केलेल्या कादंबरीमागच्या प्रवृत्तीच्या व्याख्येत ही कल्पना दृष्टिगोचर होते. 'मिलन कुंदेरा' हा सध्याचा महत्त्वाचा कादंबरीकार. झेकोस्लोव्हाकियातील वातावरणाला कंटाळून तो १९७५ मध्ये पॅरीसला येऊन स्थायिक झाला. दुसऱ्या महायुद्धानंतर युरोपात झालेले सांस्कृतिक, राजकीय, लैंगिक अशा सगळ्या स्वरूपाचे बदल त्याने आपल्या कादंबऱ्यातून वर्णन केलेले आहेत. ऐतिहासिक पुराव्यांच्या अचूक अभ्यासाच्या मदतीने वॉटनाबेने टीकात्मक चरित्रे लिहिली. राबलेला समोर ठेवून इरॅस्मसपासून सेबेस्टीअन कॅसेलिऑनपर्यंतच्या लोकांची चरित्रे त्याने लिहिली. इरॅस्मस, डेस्डेरियन (१४६७- १५३६) हा उच्च मानवतावादी. ह्याने लॅटीन आणि ग्रीक म्हणींचा Adagia नावाचा एक संग्रह प्रसिद्ध केला. पंधराशे साली प्रसिद्ध झालेल्या ह्या ग्रंथाने राबले व इतर अनेक इंग्लिश लेखकांचे लक्ष वेधून घेतले. मूळ ग्रीक हस्तलिखितावरून नव्या कराराचे त्याने लॅटिनमध्ये सटीप भाषांतर केले.

हेन्री फोरशी संबंधित असलेल्या स्त्रियांची- अगदी क्वीन मार्गारेटपासून गॅब्रिएल डिस्ट्रेपर्यंतच्या स्त्रियांची- चरित्रे वॉटनाबेने लिहिली. हे करताना जपान्यांना मानवतावाद

शिकवण्याचा वॉटनाबेचा उद्देश होता. सहनशीलतेचे महत्त्व, माणसाच्या जुन्या पूर्वकल्पनांना बळी पडणाऱ्या स्वभावासंबंधी किंवा स्वनिर्मित यंत्रासंबंधी शिकवण्याचाही उद्देश होता. त्यालाही कळकळ इतकी प्रचंड होती की डॅनिश भाषाशास्त्रज्ञ 'क्रिस्टोफर कामरप'चे म्हणणे उद्धृत केल्याशिवाय त्याला राहवले नाही. 'जे युद्धाचा निषेध करीत नाहीत, ते युद्धाला मदतच करतात.' पाश्चिमात्य विचारांचा पाया म्हणून वॉटनाबेने धाडसानेच हा उद्योग आरंभला होता. हा उद्योगही पँटाग्रुअेलसारखाच कठीण होता.

वॉटनाबेच्या मानवतावादाने भारला गेलेला मी एक कादंबरीकार आहे. त्यामुळे जे कोणी स्वत:ला शब्दांच्या माध्यमातून आविष्कृत करू इच्छितात आणि आपल्या वाचकांना त्यांच्या दु:खातून बाहेर पडण्यास मदत करू पहातात, त्यांच्या हृदयाला झालेल्या जखमा भरून याव्यात यासाठी प्रयत्न करतात त्यांना मदत करणे हे माझे कर्तव्य आहे. दोन दिशांनी ओढणाऱ्या जपानी गोंधळी प्रवृत्तींमुळे मी दुभंगलो आहे असे मी म्हटलेच आहे. जुन्या दु:खातून सुटका करून घेण्याचा मी प्रयत्न करीत आहे, आणि ह्याचसाठी माझ्या जपानी बांधवांसाठीही प्रार्थना करीत आहे.

जर तुम्ही मला माझ्या मतिमंद मुलाचा – हिकारीचा उल्लेख पुन्हा करू दिलात तर काही गोष्टी मी सांगेन. पाखरांच्या आवाजाने तल्लख होऊन तो बाख आणि मोझार्ट ह्यांच्या संगीताकडे वळला आणि आता स्वत: रचनाही करीत आहे. त्याच्या सुरुवातीच्या रचना दमदार व आनंददायक होत्या. गवताच्या पात्यावर तळपणाऱ्या दवबिंदूसारख्या त्या रचना होत्या. Innocence हा शब्द, in नाही आणि nocence दुखावणे म्हणजेच not hurt दुखावलेला नाही असा आहे.

(मराठीतही निष्पाप हा समानार्थी शब्द
नि– नाही आणि पाप म्हणजे ज्याला
पापाचा, मालिन्याचा स्पर्श झाला नाही
असा – अनाघ्रात, असाच आहे)

हिकारीचे संगीत हे असेच रचनाकाराच्या निष्पापपणाचा उसळता आविष्कार आहे. जसजसा हिकारी अधिकाधिक रचना करू लागला, तसतसा त्याच्या 'रुदन करणाऱ्या काळ्या आत्म्याचा आवाज (the voice of a crying & dark soul ) ऐकू येऊ लागला. मतिमंद असल्यामुळे त्याने अथक परिश्रम केले. त्याचा एक परिणाम असा झाला की रचना–कौशल्य अथवा त्याची जीवनशैली यांना त्याच्या रचनेतील तंत्रकौशल्य आणि त्यांच्या जाणिवांची खोली यांची जोड मिळाली. त्यामुळे त्याच्या हृदयात खोलवर असलेले दु:ख जे त्याला शब्दात सांगता येत नव्हते ते त्याला शोधणे शक्य झाले. "रुदन करणाऱ्या गडद आत्म्याच्या आवाज सुंदर असतो." आणि हिकारीच्या रचनेतील अभिव्यक्ती त्याला बरं

करायला आणि त्याचं दु:ख शीतल करायला उपयोगी पडली. इतकेच नव्हे तर त्याचे संगीत त्याच्या बरोबरीच्या इतरांनाही बरे करणारी ठरून पूर्वस्थितीला आणणारे ठरले आहे. इथे मला कलेच्या बरे करण्याच्या एकमेव ताकदीवर विश्वास ठेवण्याला काही आधार आहे असे वाटू लागले आहे.

माझा विश्वास पूर्ण सिद्ध झालेला नाही. मी एक दुर्बळ आहे. दळणवळण आणि तंत्रज्ञान ह्यांच्या राक्षसी विकासामुळे विसाव्या शतकात अनेक चुकीच्या गोष्टी निर्माण झाल्या. ह्या सर्व गोष्टी ह्या शतकातच निर्माण झालेल्या असल्यामुळे मला सहन कराव्याशा वाटतात. सिद्ध न करता येण्याजोग्या श्रद्धेची मदत घेऊन मला हे प्रमाद सहन करता येतील. विद्यमान जगतातला, जागतिक मध्यबिंदूपासून दूर असणाऱ्या एका देशातला मी मानवजातीच्या एकमेळासाठी आणि दु:खहरणासाठी कसा उपयोगी पडेन ह्याचा मला शोध घ्यावासा वाटतो. माझ्या दृष्टीने ही नेमस्त, सभ्य आणि मानवतावादी अशी मदत आहे.

**स्टॉकहोम**

८ डिसेंबर १९९४.

---

उत्तम लेखन करणं हे काहीजणांचं वैभव असतं. तीच त्यांची गुणवत्ता असते आणि अजिबात काहीही न लिहिणं हेच अनेकांचं वैभव आणि गुणवत्ता असते.

**– जीन डि ला ब्रुयरे**

---

आपलं राष्ट्र सांस्कृतिकदृष्ट्या संपन्न होण्यासाठी एकच गोष्ट करायला हवी. आपण जेवढा पैसा च्युइंगमवर खर्च करतो, त्यापेक्षा अधिक आपण पुस्तकांवर करायला हवा.

**– एल्बर्ट हबार्ड**

---

आता श्लील, लैंगिकताहीन कादंबरीचा शोध घ्यायला पाहिजे. कारण अश्लील, लैंगिक कादंबऱ्या ही सध्याची प्रकृती बनली आहे.

**– जॉर्ज बर्नार्ड शॉ**

---

चांगली पुस्तकं वाचणं म्हणजे गतकाळतील विद्वानांशी, प्रतिभावंतांशी संवाद साधण्यासारखं, गप्पा मारण्यासारखंच आहे.

**– रेने देकार्त**

---

पुस्तकांमधून आपण अनेक देशविदेश फिरू शकतो.

**– अँड्र्यू लँग**

---






अनुक्रमणिका

# लेखमाला

## असा हा वाचनछंद – डोरिस लेसिंग

**– डॉ. मीना वैशंपायन**

मी चौदा वर्षांची असताना शाळा सोडली. (त्यावेळी 'गळती' हा शब्द प्रचारात नव्हता. त्यामुळे मी शाळा सोडल्याने 'गळती'चं प्रमाण किती 'कमी' वा जास्त झालं हे सांगता येणार नाही. ) शाळा सोडल्याने मी वाचनाच्या मदतीनं स्वत:च शिकत राहिले, ज्ञान मिळवत राहिले. मी 'स्वयंशिक्षित' झाले. 'स्वयंशिक्षित' म्हणजे मुक्त, स्वैर अशा प्रकारच्या परिस्थितीला बंदिस्त करून पाहणारा, क्षुद्र, ओंगळ शब्द वाटतो मला ! स्वयंअध्ययनाचे फायदे अतिसुलभ पद्धतीने सांगायचे झाले तर असे : "जर पुस्तकांच्या मदतीने तुम्ही स्वत:चं शिक्षण करीत असाल तर तुमच्या त्या साहसी प्रवासाचा प्रत्येक टप्पा तुम्हीच निवडत असल्याने, प्रत्येक पुस्तक तुम्ही मनापासून वाचून स्वत:त रिचवता आणि तुमच्या मनाचा तो एक भाग बनतो." पण नंतर तुम्हाला त्यातल्या अज्ञानाचे प्रदेश दिसू लागतात, आणि एखाद्या शाळकरी मुलाला जी सर्वसामान्य माहिती सहज विनासायास मिळालेली असते ती मिळविण्यासाठीही तुम्हाला वेळ घालवावा लागतो. प्रत्येक शाळकरी मुलाला असायला हवी अशा स्वरूपाची ती प्राथमिक माहिती असते. पण मग मनात विचार येतो की, तसं झालं असतं तर अठराव्याच वर्षी आपल्याला हव्या त्या पुस्तकांची निवड मी योग्य रीतीने करू शकले नसते. कारण शाळेत इतिहास आणि वाङ्मय यांच्या आवडीनिवडींवर साचेबंद पद्धतीनेच परिणाम होत राहिला असता. असा विचार आला की मग माझ्या दु:खाची धार जराशी बोथट होते. खरं पाहता, वाङ्मय आणि इतिहास यांच्या प्रदेशात कुणीही विहार करू शकतं. त्यासाठी तुमच्याजवळ फक्त एखाद्या ग्रंथसंग्रहालयाचं प्रवेशपत्र, आणि थोर्डसं मार्गदर्शन हवं. पण आपल्याला गणित आणि भाषा हे विषय आले नाहीत याचं मात्र मला मनापासून अतीव दु:ख होतं. आजूबाजूला असलेलं, आपल्याबद्दलच्या आपल्या सर्व कल्पनाच ढवळून काढणारं, उसळतं, झगमगतं असं जे संशोधनक्षेत्र आहे त्याचं आकलन होण्यासाठी तुम्हाला गणिताची गरज आहेच. गणित न येणं म्हणजे अर्धवट बहिरेपण, आंधळेपण आल्यासारखंच वाटतं आणि भाषांबद्दल काय सांगायचं ? प्रत्येक मिनिटामिनिटाला लहानलहान होत जाणाऱ्या, जवळ येत चाललेल्या या जगात भाषांची फारच गरज असते. पण हेही खरंच की बालपण ओलांडल्यावर भाषा शिकणं काही सोपं नसतं.

एका सिगारेटच्या पाकिटावरची अक्षरे वाचण्यापासून मी माझ्या वाचनाची सुरुवात केली

तेव्हा मी सात वर्षांची होते. मात्र त्यानंतर एकदम आईवडिलांच्या पुस्तकांच्या कपाटातील पुस्तके वाचण्यापर्यंत माझी प्रगती झाली. त्याकाळी कोणत्याही मध्यमवर्गीय घरात असावीत तशीच पुस्तकं, तशाच प्रकारच्या कपाटात आमच्याकडेही होती. तसंच पाहिलं तर आहे त्यापेक्षा चांगलं आयुष्य प्राप्त करून घेण्याची गुरुकिल्ली म्हणजे पुस्तकंच आहेत असं समजणाऱ्या, वायफळ वडबड करणाऱ्या क्षुल्लक अशा कामगारवर्गाकडेही कधीकधी अशी पुस्तकं असत म्हणा ! डिकन्सच्या पुस्तकांचे संच, वॉल्टर स्कॉट, स्टीव्हन्सन, रुडयार्ड किपलिंग, काही प्रमाणात हार्डी आणि मेरेडिथ, ब्रॉन्टे भगिनी, जॉर्ज एलियट ही सारी मंडळी त्या कपाटात हजर असत. इंग्लिश वाङ्मयातील अभिजात पुस्तकं त्यात होती पण गंमत म्हणजे १८ व्या शतकातील एकही पुस्तक मात्र नव्हतं. त्या कपाटात काही काव्यसंग्रह होते, 'इंप्रेशनिस्ट' चित्रांचा संग्रह होता, पहिल्या महायुद्धातील आठवणी व इतिहास सांगणारी पुस्तकं होती. मी साधारण दहा वर्षांची होण्यापूर्वीच ही पुस्तकं वाचली होती, (वाचण्याचा प्रयत्न केला होता असं म्हणणं श्रेयस्कर !) त्यावेळी मला जी पुस्तकं आवडली होती ती आता चांगली वाटतातच असं नाही. प्रत्येक पुस्तक तुम्ही तुमच्या योग्य वयातच वाचायला हवं.

शिवाय त्या वाचनाच्या आग्रहाचा अतिरेकही होता कामा नये याची जाणीव मला आहे, कारण वाङ्मयाच्या आस्वादाची ती गुरुकिल्लीच आहे. आजकालच्या मुलांना अपरिचित असणारी, मुलांसाठी मानली गेलेली बहुतेक सर्व पुस्तकं मी वाचली होती. अमेरिकन साहित्यातील एल. एम. मॉटगॉमेरीची 'ॲन ऑफ ग्रीन गेबल्स' या पुस्तकांची मालिका, सुसान कूलीजची 'व्हॉट केटी डिड' ही कथामालिका, जीन स्ट्रॅटॉन पोर्टरची 'द गर्ल ऑफ द लिम्बरलॉस्ट' ही कादंबरी आणि तिचे पुढचे सर्व भाग मी वाचले होते. शिवाय लुईझा अलकॉट, हॉथोर्न, हेन्री हेही वाचले होते. दर्जेदार इंग्लिश पुस्तकांमध्ये लुई कॅरॉलची पुस्तके आता मला जेवढी आवडतात तेवढी तेव्हा आवडली नव्हती; आणि मिलनेचं 'विनी – द – पूह' तेव्हा फारच आवडलं होतं, पण आता मात्र तेवढंसं आवडत नाही. त्यातला नायक म्हणजे मूर्ख, हावरट छोटं अस्वल होतं, आणि बाकीचे 'हुशार' प्राणी माझ्या मते तिरस्करणीय होते. मला कधीकधी वाटतं, जुन्या इंग्लंडचं प्रतिबिंबच त्यात आहे. पण त्यावेळी मी केनेथ ग्रॅहॅमचं 'द विन्ड इन द विलोज' वाचलं. शिवाय मुलांसाठी म्हणून एक वृत्तपत्र होतं. 'मेरी गो राऊंड' नावाचं मुलांसाठी एक मासिकही होतं. त्यात वॉल्टर द ला मरे, एलिनॉर फर्जिऑन, लॉरेन्स बिनयॉन यांच्या आणि इतरही चांगल्या लेखकांचं साहित्य प्रकाशित होई. वॉल्टर द ला मरे च्या 'द थ्री रॉयल मंकीज' या कथेनं तर मला भारावूनच टाकलं होतं आणि अलीकडेही जेव्हा मी ती पुन्हा वाचली तेव्हा माझ्या मनावरील त्या कथेची जादू अजूनही टिकून आहे असंच वाटलं मला !

मी नशीबवान होते कारण माझे आईवडील मला आणि माझ्या भावाला पुस्तकं वाचून

दाखवीत. माझी अशी श्रद्धा आहे की, वाचून दाखवलेल्या आणि कथन केलेल्या गोष्टींचा परिणाम अधिक असतो, कायमस्वरूपी असतो. मला अजूनही त्या संध्याकाळच्या वेळा, त्यावेळचं वातावरण आठवतं आणि त्या सर्व गोष्टीही आठवतात. त्यातल्या काही दीर्घकाळ चालणाऱ्या घरगुती कथा असत ज्या आईनेच रचलेल्या असत. त्यांचे विषयही आमच्या घरातल्या उंदरांनी, कुत्र्यामांजरांनी केलेल्या साहसाबद्दलचे असत. कधीकधी आमच्या आवारातील झुडुपांमध्ये राहणाऱ्या, छपरांखालच्या लाकडी तुळयांवर उड्या मारणाऱ्या माकडांच्या त्या गोष्टी असत; तर कधी आमच्या घरातले पाळीव प्राणी आणि आमच्या आजूबाजूला असणारे जंगली प्राणी यांच्यातील संबंधांवर आधारित त्या गोष्टी असत. कारण त्यावेळी जंगली प्राण्यांची आतासारखी हकालपट्टी झाली नव्हती. अलीकडेच केव्हातरी मी माझ्या बालपणीच्या आठवणी एका तरुण, कृष्णवर्णीय पुरुषाला सांगत होते तेव्हा तो म्हणाला, "तू काय 'सफारी पार्क' मध्ये राहात होतीस की काय ?" शाळेत असताना, दिवे बंद झाले की काही मुली भयानक, जंगली प्राण्यांच्या चमत्कारिक गोष्टी सांगत. मला तर वाटतं जे आईवडील आपल्या मुलांना गोष्टी वाचून दाखवतात किंवा गोष्टी रचून सांगतात ते आपल्या मुलांना जगातली मौल्यवान अशी भेट देत असतात. आपण बरेचदा विसरतो की कथाकथन हे हजारो वर्षांपूर्वीपासून चालत आलेलं आहे आणि आपण केवळ काही शतकं वाचन करीत आहोत.

मुलं लहान असताना अधिक हुशार, संवेदनाशील असतात आणि मोठी होऊ लागली की अधिक मूर्ख होतात, त्यांना शिंगं फुटतात यावर माझा पूर्ण विश्वास आहे. सोळाव्या वर्षी जी पुस्तकं मी वाचीत होते त्यापेक्षा अधिक अवघड पुस्तकं मी वयाच्या आठव्या, नवव्या, दहाव्या आणि अकराव्या वर्षी वाचत होते. तेव्हा मला असं वाटू लागलं की इतकी वर्षे बहुधा आपण डुलक्या काढत होतो किंवा बधिरलेले होतो कारण आपण त्याच त्या गोष्टी पुन्हा पुन्हा वाचीत होतो. ( हे वाटणं बहुतेक माझ्या शरीरातील सळसळत्या रक्तप्रवाहामुळे किंवा शारीरिक बदलांमुळेच असावं, ) मी तीन – चार – पाच वर्षांच्या मुलांना चित्रपट दाखवायला घेऊन जाई. चित्रपटही कसे होते तर २००१, 'स्टार वॉर्स ', 'क्लोज एन्काऊन्टर्स ऑफ द थर्ड काइन्ड' वगैरे. आयव्ही कॉम्पटन बर्नेटचं रेडिओवर झालेलं नाट्यीकरण, किंचितही हालचाल न करता सलग दीड तास ऐकत असणारा मुलगाही मी पाहिला आहे. पण अकरा वर्षांची झाली की त्याच मुलांना फक्त 'नेबर्स ' कळू शकतात.

वयाच्या सोळाव्या वर्षी मनातला उत्साह उतू जात असताना मला पुस्तकांचं जग सापडलं आणि आता मी त्या मार्गाचा शोध घेत चालले आहे. बहुधा तो शोध माझ्या मृत्यूनंतरच थांबेल.

मी कुठून सुरुवात केली बरं? हं ! आठवलं. एच. जी. वेल्स आणि 'द शेप ऑफ थिंग्ज टु कम' ( The shape of things to come ) इथून सुरुवात झाली. पण खरं म्हणजे

आजूबाजूच्या कोणत्याही पुस्तकापासून ती होऊ शकली असती. वेल्स आणि शॉ ! केवढा आनंद ! केवढा क्षोभ ! माझ्या आजूबाजूला असलेल्या, मी पाहिलेल्या प्रत्येक गोष्टीचं कलात्मक मूर्तिभंजन आणि विचारांची उलटापालट होतेय असं मला जाणवत होतं ! जुन्या दक्षिण ऱ्होडेशियात, आताच्या झिम्बाब्वेमध्ये हे सारं घडत होतं ( मी तिथे राहात होते ) आणि 'बौद्धिक चेतना देणारी जागा' असं त्या देशाचं वर्णन करणं कठीणच आहे. बहुतेक वेळा तिथे माझी मीच पुस्तकं मिळवीत असे. पण कधीकधी झुडुपांमध्ये असणाऱ्या 'फार्म हाऊस' मधले लोक मला भेटत. त्यांच्या घरातील एखादी खोली पुस्तकांनी भरलेली असे. त्यातले बहुतेकजण चमत्कारिक पद्धतीने कोपऱ्यात जाऊन पडलेले, एकांगी, एकाकी असे होते. त्यांनी कधीच इंग्लंडमध्ये पाऊल ठेवलं नव्हतं. इतर पुस्तकांमध्ये येणाऱ्या संदर्भांनुसार मी पुस्तकांचा शोध घेई – कधी एखादी कादंबरी, कधी एखादे ऐतिहासिक पुस्तक तर कधी कुणाच्या आठवणींचे पुस्तक !

नंतर मला 'प्रत्येकाचं ग्रंथसंग्रहालय' ( Everyone's Library ) या संस्थेचा शोध लागला आणि मी लंडनहून पुस्तकं मागवू लागले. ती पुस्तकं माझ्यापर्यंत पोचायला कित्येक आठवडे लागत. आलेल्या पुस्तकांची पार्सलं उघडताना मला जी नशा चढत असे ती मी कधीच विसरणार नाही. त्यातली काही पुस्तके वाचताना मी फार कंटाळून जाई कारण ती पुस्तकं आकलन होण्याएवढी मी मोठी नव्हते. उदा. कार्लाईल, रस्किन, हॅझलिट, डॉ. जॉन्सन या सर्वांची (नुसती यादी बघून मागवलेली) पुस्तकं माझ्या डोक्यावरूनच जात होती. त्यावेळच्या नवीन इंग्लिश लेखकांशी मात्र माझी दोस्ती झाली होती. जरी ही मंडळी माझ्यापेक्षा ज्येष्ठ होती तरीसुद्धा माझं त्यांच्याशी जमे. त्यात व्हर्जिनिया वुल्फ, डी. एच. लॉरेन्स, अॅल्डस हक्सले, लिटन स्ट्रॅची यासारखी लेखक मंडळी होती. टॉलस्टॉय, दोस्तोएवस्की, टर्जिनिव्ह, चेकॉव्ह, लर्मोनस्टोव्ह यासारखे अभिजात रशियन लेखकही मला आवडत. मिखाईल शोलोखोव्ह यांच्या 'And Quiet Flows The Don' या आधुनिक रशियन कादंबरीने रशियन क्रांतीचा मला दुसऱ्या खेपेला अनुभव आला. त्याआधी रशियन क्रांतीबद्दल मी 'पिप, स्केक आणि विल्फस्की यांच्या चित्रकथांमधूनच वाचलं होतं. त्यात नाट्यमयता होती. बोल्शेविक बॉम्ब घेऊन हिंडत होते आणि ती पात्रे ट्रॉटस्कीच्या धर्तीवर आधारलेली होती. यावरून एवढंच लक्षात येतं की लहानपणचे सर्वच संस्कार खोलवर रुजतातच असं नव्हे. लौकरच माझी थोरो, व्हिटमन, प्रूस्त, थॉमस मान, बाल्झॅक,कॉनरॅड यासारख्या लेखकांच्या साहित्याशी ओळख झाली. याचबरोबर आधुनिक अमेरिकन लेखक ड्रेझर, हेन्री मिलर, स्टाईनबेक, फॉकनर यांच्या साहित्यकृतीचाही मी आस्वाद घेतला. नंतर मला १८व्या शतकाकडे वळावेसे वाटले. फिल्डिंगची 'टॉम जोन्स', रिचर्डसनची 'क्लॅरिसा', स्टर्नची 'ट्रिस्ट्रॅम शॅन्डी,' डिफोची 'मॉल फ्लॅन्डर्स', स्तान्धालची 'टू द हॅपी फ्यू' आणि 'Cavie de Henri Bruland' यासारख्या पुस्तकांनी, कादंबऱ्यांनी मला प्रभावित केले. या

सगळ्या वाचनातून नवीन काहीतरी गवसल्याचा एक अननुभूत असा आनंद मला मिळत असे. त्यामुळे या नवनवीन गोष्टींच्या नवलाईची धुंदी बराच काळ माझ्या मनावर असे. हे मी एवढ्यासाठी आवर्जून सांगते आहे कारण नेहमी तरुण मुलांना वाङ्मयवाचनाचा उपदेश केला जातो, तेव्हा त्याच्या रसास्वादाबद्दल काहीच सांगितलं जात नाही. त्यांची 'वाङ्मयाच्या अभ्यासाशी' ओळख करून दिली जाते. त्यामुळे वाङ्मयास्वाद म्हणजे गंभीर चेहऱ्याच्या विद्वानांनी केलेली आणि आपल्यापुरतीच मर्यादित ठेवलेली किचकट विश्लेषणं असा समज होतो. त्यामुळे एकदा तर अशी वेळ आली होती की या देशातल्या कोणत्याही विद्यापीठात 'वाङ्मय' हा विषय अभ्यासाला ठेवूच नये असे मत काही तज्ज्ञ व्यक्त करीत होते आणि त्यावर वादविवाद चालू होते. काहींचं म्हणणं असं होतं की, "वाङ्मयाभ्यास हा विषय म्हणजे फारच क्षुल्लक, बिनमहत्त्वाचा !" पण बाकीच्यांचं– जेन ऑस्टिनसकट अनेकांचं – म्हणणं असं होतं की, "कादंबऱ्यांच्या माध्यमातून मानवी वर्तनपद्धतींचा मागोवा घेता येतो." अर्थात या गटाचं म्हणणं मान्य केलं गेलं. त्यामुळे मग विद्यापीठात वाङ्मयविभाग स्थापन झाले, साहित्यिक पुरस्कार दिले गेले, साहित्यिक उत्सव साजरे झाले आणि मग संरचनावाद, संरचनावादाचा उत्तरार्ध अशा विषयांवर चर्चासत्रं आयोजित केली गेली. 'प्रत्येक नाण्याला दोन बाजू असतात'. एका बाजूने पाहता वाङ्मय ही गंभीरपणाने घेण्याची गोष्ट आहे. पण दुसऱ्या बाजूला असं दिसतं की, काही विद्यापीठीय मंडळींना वाटतं की वाङ्मयाभ्यास ही आपलीच मक्तेदारी आहे. याचा परिणाम म्हणजे तरुणांच्या मनात पुस्तकांबद्दल निर्माण होणारी निरुत्साही वृत्ती ! 'तुम्ही काय वाचता' असं या तरुण मुलांना विचारलं की जी उत्तरं मिळतात ती मोठी गंमतीदार असतात. "छे ! मी वाचत नाही, कारण मी विद्यापीठात वाङ्मयाचा अभ्यास केला." किंवा "आम्हाला शाळेत 'मॅकबेथ' अभ्यासाला होतं आणि तेव्हापासून मी वाचन सोडूनच दिलं ते चांगलं झालं." हे ऐकून कोणत्याही एखाद्या लेखकाने कपाळावर हात मारून घेतला, त्रागा केला, आक्रोश केला किंवा दु:ख केलं तर आश्चर्य वाटायला नको. साहित्य हे सर्वांसाठी आहे. त्यासाठी प्राध्यापकांची किंवा शिक्षकांची गरज नाही. तरीही मुलांच्या अनेक पिढ्यांना वाचनाची प्रेरणा देणारे शिक्षक आहेत. वाचनाची आवड असणाऱ्या एखाद्या प्रौढाला तुम्ही भेटलात तर तो नक्की म्हणेल, "माझ्या शाळेत असे छान शिक्षक होते की ------." मी इकडे तिकडे फिरते तेव्हा मला असे लोक नेहमी भेटतात. उदा. – एकदा एक ऑस्ट्रेलियन कामगार तरुणी मला भेटली. ती म्हणत होती की, तिच्या घरात वाचनाचं वातावरण मुळीच नव्हतं. पण तिचे शिक्षक मात्र तिला वाचनाची गोडी लावण्यासाठी प्रयत्नशील होते. ते तिच्याकडून वाचून घेत असत. ज्यांच्या घरी वाचनाला पोषक वातावरण नाही, जी अनेक गोष्टींपासून वंचित झालेली आहेत आणि जी मुलं खरोखरी अर्धशिक्षित होती त्यांना ती तरुणी आता शिकवतेय. ती मुले आता शेक्सपियर वाचतात, इतर अभिजात पुस्तकं वाचतात आणि पॅट्रिक व्हाईट, हेन्री हॅंडेल रिचर्डसन यांचं

साहित्यसुद्धा वाचतात. ती मुलं कथा लिहितात, नाटकंही लिहितात.

जगातल्या प्रत्येक देशामधली ग्रंथसंग्रहालयं म्हणजे कथा, काव्य, निबंध यांचे खजिने आहेत. त्यामध्ये जगाच्या सर्व भागांमधील, सर्व कालखंडांमधील वाङ्मय उपलब्ध असतं. साहित्य हे अनेक क्षेत्रांशी संबंधित असतं. ऐतिहासिक, धार्मिक, जादूटोणाविषयक, गूढवादी पुस्तकांनाही साहित्यिक मूल्यं असू शकतात. समाजशास्त्रीय किंवा मानववंशशास्त्रीय पुस्तकंही 'साहित्यिक' असतात. आपण ज्याचा विचार करू त्या प्रत्येक विषयासाठी आणि प्रत्येक व्यक्तीसाठी वाङ्मय उपलब्ध आहे. ग्रंथप्रेमी, ग्रंथविषयक सूचना करणाऱ्यांचीच कमतरता आहे. सार्वजनिक वाचनालय म्हणजे जगातली उत्तम लोकशाही संस्था असते. सम्राट आणि हुकूमशहा यांचं सामर्थ्य नष्ट करण्याची शक्ती तिथे असते. कदाचित एखादा राजकीय पुढारी, लेखकांकडून हवं ते हवं तसं लिहवून घेऊ शकेलही. पण भूतकाळात लिहिल्या गेलेल्या वाङ्मयाचा सर्वस्वी नाश करणं किंवा त्यांचा परिणाम नाहीसा करणं ही त्यांच्या आवाक्याबाहेरची गोष्ट आहे. आजवर असे अनेक प्रयत्न झाले पण ते निष्फळच ठरले. माझ्या मनाच्या एखाद्या तरल क्षणी मी विचार करते की, या देशातल्या ग्रंथसंग्रहालयांकडे होणाऱ्या दुर्लक्षाचं काय कारण असावं ? मग मला वाटतं की, ज्या लोकांना चांगल्या ग्रंथसंग्रहालयांपर्यंत पोचता येतं, ज्यांना इतिहास, नवीन कल्पना, नवं ज्ञान यांचं आकलन होतं त्यांना कोणता विचार करावा हे इतर कोणी सांगू शकत नाही. (आणि त्यांचं लक्ष आपल्याला हव्या त्या विषयाकडे न वळवता आल्याने बहुधा) ग्रंथसंग्रहालयं दुर्लक्षित राहातात. जे लोक साहित्यप्रेमी आहेत, त्यांच्या मनाचा एखादा कोपरा इतका निर्भय असतो की त्यावर इतर कुणी, काहीही बिंबवू शकत नाही. जर तुम्ही वाचत असलात तर तुम्ही स्वत:च आणि स्वत:बद्दलही विचार करायला शिकता.

साहित्यात इतिहासादी शास्त्रे झिरपत असतात असं मी जेव्हा म्हणते तेव्हा मनात असं असतं की, कादंबऱ्यांमध्ये येणारी जी माहिती असते ती आपण बरेचदा गृहीत धरतो, कादंबऱ्या आपल्याला ती माहिती देत असतातच. एखाद्या कादंबरीचं किंवा लघुकथेचं वाङ्मयीन सौंदर्य जसं एखाद्याला जाणवेल तसंच त्यात वर्णिलेल्या समाजाबद्दलही त्याला माहिती होईल. क्रांतिपूर्व रशिया कसा होता हे आपल्याला कसं कळतं ? तर त्याकाळच्या लेखकांच्या साहित्यकृतीतून ! टॉलस्टॉयची ॲना कॅरेनिना वाचली की तेव्हाची सामाजिक परिस्थिती, स्त्रियांबद्दलचा सामाजिक दृष्टिकोन लक्षात येतो. आज पाश्चात्त्य देशात निराळी परिस्थिती असली तरी ॲनासारख्या अनेक स्त्रियांची आज जगातील इतर देशांमध्ये तशीच गांजणूक होतेय हे लक्षात येतं. अमेरिकन संयुक्त राष्ट्रसंघाची स्थित्यंतरं आपल्याला तत्कालीन लेखकांमुळेच तर कळतात. १९व्या शतकातील इंग्लंडच्या ग्रामीण जीवनाचा, सामाजिक परिस्थितीचा अभ्यास करताना हार्डीच्या कादंबऱ्यांसारखं दुसरं उत्तम साधन कोणतं असणार? तीच गोष्ट ग्रीस, रोम, मध्ययुगीन युरोपची ! त्यासाठी लेखक फार महान, थोर





असलेच पाहिजेत असं नाही. इतिहासाची परीक्षा देण्यासाठी तत्कालीन लोकप्रिय ऐतिहासिक कादंबऱ्या वाचण्याचा सल्ला, एखाद्या मुलाला प्रौढाने क्वचितच दिला असेल. (त्यामुळे ऐतिहासिक कादंबरी लेखकांना आपला तपशील गोळा करणे, वास्तव जाणून घेणं त्रासाचं ठरतं. ) संगीतातील साम्यस्थळं शोधायची असली तर एखादा अगदी बीथोवेन, बर्लियाझपासून बीटल्स आणि ब्ल्यूजपर्यंतच्या संगीताचा आस्वाद घेऊ शकतो. काहीजणांची मानसिक तयारी नसल्याने त्यांना वाचनापासून वंचितच राहावं लागतं. दूरचित्रवाणीचा जिथे संपर्कच नाही, रेडिओवरील बी. बी. सी. च्या बातम्यासुद्धा मोठ्या प्रयासाने खरखराटात ऐकू येतात, पण जिथे अभिजात साहित्यकृतींनी भरलेली कपाटे आहेत, अशा एखाद्या आडबाजूला असणाऱ्या, विपुल पर्णराजीने युक्त अशा मळ्यावर लहानपण व्यतीत करण्याचं भाग्य कितीजणांना लाभतं ?

आधी, एखादं चित्रकथेचं पुस्तक (Comic) असावं असं समजून शेक्सपियर वाचला आणि मग समजून वाचला किंवा पाहिला तर कुठे बिघडलं ? 'मिल्स आणि बून'पासून जेन आयरेपर्यंत जायला काही फार वेळ लागत नाही. एका देशातून दुसऱ्या देशात गेल्यासारखंच ते असतं. मला वाटतं, कदाचित विद्यार्थ्यांना असं आवर्जून सांगायला हवं की, त्यांनी वाचनाचा जाणीवपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. त्यांनी एखादा लेखक गंभीरपणे वाचणं आवश्यक असतं. आपल्या मनातील वाचनाबद्दलचा आळस आणि अनिच्छा झटकून टाकून त्यांनी सावधपणे वाचलं पाहिजे. तुम्ही वाचता त्यावेळी तुमच्यापेक्षा वेगळा विचार करणाऱ्याच्या मनात प्रवेश करून त्याला तुम्ही समजून घेण्याची जरुरी असते: हा आणि एवढाच मुद्दा खरा असतो. वाङ्मय म्हणजे अनेक दालनं असलेला मोठाच महाल आहे तेव्हा त्यात प्रवेश काळजीपूर्वक केला पाहिजे.

माझ्या असं लक्षात येतंय की मुलं, तरुण यांना प्रोत्साहन वाटेल असंच मी लिहिलंय. त्यांना कुणी उत्तेजन न दिल्याने ती बिचारी केवढ्या मौल्यवान गोष्टीपासून वंचित झाली आहेत याची मला पूर्ण कल्पना आहे. विशेषत: आता जेव्हा वाईट पद्धतीनं शिकवली गेलेली पिढी मोठी होते आहे, तेव्हा त्या प्रौढांना मला सांगावंसं वाटतंय की, 'तुमच्यातील कमतरता, उणिवा दूर करण्यासाठी ग्रंथालयं तुम्हाला नक्कीच, मदत करतील. फक्त थोडंसं मार्गदर्शन हवं.'

सध्या मी काय वाचतेय ?तर जे मी पूर्वी वाचलंय तेच ! पुन्हा पुन्हा वाचायची मला आवड आहे. सुदैवाने मी वेगाने वाचू शकते. नाहीतर मी एवढं वाचन कसं करू शकले असते कोण जाणे ! जे काही नवीन लिहिलं जातंय त्याच्याशी संपर्क ठेवण्याचा मी प्रयत्न करीत असते पण ते काही पूर्णपणे शक्य होत नाही. अलीकडे अनेक देशात खूप नवीन प्रकारचं लेखन होतंय. इतर लेखकांप्रमाणे माझ्याकडेही प्रकाशक पुस्तके पाठवीत असतातच. कधी कधी तर आठवड्याला ८- १० पुस्तके येतात, कारण त्यांच्या पुस्तकविक्रीसाठी

त्यांना अभिप्रायांची गरज असते. प्रत्येक पुस्तकाचं किमान स्वरूप लक्षात येण्याएवढं तरी मी ते वाचते. पण मला ते पटत नाही. तुम्ही जर तुमच्या कामात बुडालेले असलात किंवा थकलेले असलात तर अशा वेळी ते पुस्तक तुमच्यावर एवढा परिणाम करू शकत नाही. शिवाय प्रत्येक आठवड्याला तुम्ही जर अशा पद्धतीने एकेक पुस्तक 'उडवू' लागलात तर तुमच्या अभिप्रायाला खरोखरी काही अर्थ राहील का? भरपूर माहिती देणारी पुस्तकं वाचायला मला आवडतं. उदा – जेम्स ग्लेइकची 'Chaos' भिन्न देशात, भिन्न विद्यापीठात वैज्ञानिक, पदार्थविज्ञानातील नवनवीन कल्पना कशा शवल करून टाकतात त्याचं फार सुरेख चित्रण या कादंबरीत आहे. बार्बारा टकमनची पुस्तकं मला आवडतात. रॉबर्ट ऑर्नस्टेइनचं 'नवे जग ! नवे मन !' हे पुस्तक मला आवडलं. सूफीपंथाबद्दलचं इद्रिस शाह यांचं 'Sufi Thoughts And Action' हेही आवडलं. कारण त्यातून जीवनाबद्दलचा नवीन दृष्टिकोन मिळतो. आजवर मला आयुष्यात काही देणारा असा मार्ग दिसलाच नव्हता. शिवाय मला इतिहास आवडतो. नीरद चौधरींचं 'The Autobiography Of An Unknown Indian' आवडलं. मायकेल हॉलराईडनं लिहिलेली बर्नार्ड शॉ व लिटन स्ट्रॅची यांची चरित्रं मी नुकतीच वाचली. अमेरिकन मानववंशशास्त्रज्ञ लॉरेन एस्ली यांचे निबंध मी पुन्हा पुन्हा वाचते. साखलीनमधील कैद्यांचं वर्णन करणारं चेकॉव्हचं 'The Island ' ही मी वाचते. शिवाय नील शीहानचं 'The Bright Shining Lire,'जीन कॉकचं 'Opium'----- कुठं थांबवायची ही यादी ? 'Citizen', 'An Embarrassment of Riches' ही पुस्तकं तर मी विसरलेच होते. या पुस्तकांनी प्रस्थापित कल्पना, गृहीत मतं यांचा पार निकाल लावला होता.

माझ्या आवडत्या दहा पुस्तकांविषयी सांगणं कठीणच ! तरीही गोगोलचं 'The Overcoat', टर्जिनिव्हचं,'Fathers And Sons', दोस्तोयेवस्कीचं 'The Devil' स्तांधालचं 'The Red And The Black', होमरचं 'इलियड', व्हर्जिनिया वुल्फचं 'To The LIght House', हेन्री फील्डिंगचं 'Tom Jones' यासारखी कितीतरी पुस्तके ! शिवाय मार्सेल प्रूस्ट, मार्क ट्वेन, हेन्री हॅडेल रिचर्डसन ---- आणि कितीतरी ! माझ्या अक्षय आनंदाचा ठेवाच !

**डोरिस लेसिंग** – Doris Lessing

इराणमध्ये १९१९ मध्ये जन्म. बालपणीची पाच वर्षे तिनं तिथेच घालवली. त्यानंतर आताचा झिम्बाब्वे, म्हणजे पूर्वीच्या दक्षिण ऱ्होडेशियात एका 'फार्म ' वर ती राहू लागली. तिथेच मोठी झाली. १९४९ मध्ये ती लंडनला आली आणि तेव्हापासून आजपर्यंत तिथेच राहात आहे. विविध प्रकारांमध्ये तिने लेखन केलं आहे. ' The Good Terrorist' या तिच्या पुस्तकास 'W. H. Smith' साहित्यिक पुरस्कार १९८६ मध्ये मिळाला. याशिवाय तिच्या पुस्तकांमध्ये लघुकथांचे अनेक संग्रह समाविष्ट आहेत. The Golden Notebook ही चार खंडातील उल्लेखनीय कादंबरी व 'Canopus in Argos' ही लेखमाला वैशिष्ट्यपूर्ण ठरली.



अनुक्रमणिका

# मिशेल तुर्निए– फ्रायडे

## फ्रायडे

**–डॉ. मंगला सरदेशपांडे**

रॉबिनसन क्रुसो या डिफो यांच्या पुस्तकातील फ्रायडे ह्या व्यक्तीभोवती प्रख्यात फ्रेंच लेखक मिशेल तुर्निए (१९२४) यांनी १९६५ साली एक कादंबरी लिहिली. ती त्यांची पहिली कादंबरी. तिचे नाव 'VIENDRDI OU LES LIMIBES DU PACIFIC'– 'व्हॅनद्रदी उ ले लिम्ब ड्यू पॅसिफिक.' मिशेल तुर्निए यांचा जन्म पॅरिसमध्ये १९२४ साली झाला. ते जन्माने फ्रेंच असले तरी त्यांचे जर्मनीशी घनिष्ट संबंध आहेत. त्यांचे आई-वडील हे दोघेही जर्मन भाषा व साहित्य याचे गाढे अभ्यासक व पंडित होते. म्हणून त्यांचे शिक्षण UNIVERSITY OF TUBINGEN युनिव्हर्सिटी ऑफ ट्युबिनगेन येथे झाले असावे. कायदा व तत्त्वज्ञान या दोन्हीही विषयांचे ते एम. ए. आहेत. ते अनेक वर्षे एका फ्रेंच प्रकाशन संस्थेत नोकरी करीत होते. छायाचित्रे काढण्याचा त्यांना छंद आहे. फ्रेंच दूरचित्रवाणीवर त्यांनी अनेक कार्यक्रम निर्माण करून सादर केले आहेत. काही वर्षापूर्वी त्यांनी भारतासही भेट दिली होती. त्यांच्या पहिल्याच कादंबरीस GRAND PRIX DU ROMAN – ग्राँ प्रि ड्यू रोमाँ हे पारितोषिक देण्यात आले. त्यांच्या दुसऱ्या कादंबरीचे नाव 'OGRE' ओग्र. या कादंबरीस फ्रेंच भाषेतील सर्वश्रेष्ठ पारितोषिक PRIX GONCOURT प्रि गॉकुर्ट मिळाले. महत्त्वाची गोष्ट अशी की एकमताने पारितोषिक मिळणारी ती एकमेव कादंबरी. यापूर्वी व नंतरही एकाही कादंबरीस एकमताने हे पारितोषिक मिळालेले नाही. या कादंबरीनंतर त्यांनी 'GEMINI' जेमिनी आणि 'THE FOUR WISE MEN' फोर वाईज मेन या दोन कादंबऱ्या लिहिल्या, व दुसरीही अनेक पुस्तके लिहिली. या सर्वच साहित्यकृतींचे मोठ्या उत्साहाने स्वागत झाले. आज फ्रान्समध्येच नाही तर युरोपमध्ये ते एक विनीचे लेखक मानले जातात.

त्यांच्या कादंबऱ्यांची अनेक भाषांतून (भारतीय भाषा याला अपवाद) अनुवाद होऊन ते अनेक देशात प्रसिद्धही झाले आहेत. प्रचंड ताकदीचा हा कादंबरीकार. लघुकथा या साहित्यप्रकाराच्या क्षेत्रातही त्यांची कामगिरीही उल्लेखनीय आहेच. उल्लेखनीय म्हणणे म्हणजे इंग्रजी वाक्यप्रचारानुसार, हे या वर्षातले, अगदी खालच्या आवाजात केलेले विधान (UNDERSTATEMENT OF THE YEAR). थोडक्यात ते प्रचंड ताकदीचे कादंबरीकार असूनही लघुकथा या साहित्यप्रकाराच्या क्षेत्रातही त्यांची कामगिरी उल्लेखनीय व नजरेत

भरेल अशीच आहे. म्हणूनच त्यांना त्या क्षेत्रातही, हुशार, तरतरीत व लक्षवेधी लेखक म्हणून आज जगतात (भारत हा अपवाद) मान्यता प्राप्त झालेली आहे. 'ल क्रोक ड ब्रुअेर' आणि 'ल, मेडिआनो द आमरझ' हे त्यांचे दोन कथासंग्रह नुसतेच वाचनीय नाहीत, तर ते आपले मन खेचून घेतात. पारदर्शकता व स्पष्टता हे दोन्ही गुण असलेल्या त्यांच्या लेखनातले सौंदर्य वाचकाच्या मनाला भुरळ पाडते. रचनाकौशल्य आणि कमालीची कलात्मकता दर्शविणाऱ्या अशा त्या साहित्यकृती आहेत. या लघुकथा अनोख्या आहेतच, पण त्या वाचकाला व्यथित करतात. त्यांना विनोदाचे अस्तरही आहे; तरी, अनेक वेळा हा विनोद भीषणता व बीभत्सता यांच्या फारच जवळ गेलेला आढळतो.

फ्रेंच वाङ्मयातील पूर्वीच्या परंपरा न मानणारे,अगदी नव्या कोऱ्याकरकरीत दर्शन शैलीने लेखन करणारे असे ते विद्यमान लेखन आहेतच. पण त्याजबरोबर त्यांचे लिखाण पराकोटीचे वादंग निर्माण करणारे ठरले आहे. त्यांच्या साहित्यकृती वाचकाच्या मनात प्रखर अशा प्रतिक्रिया उत्पन्न करतात. त्यांच्या साहित्यकृतींचा वाचक एकतर त्यांच्या प्रेमात पडतो, किंवा त्यांचा दु:स्वास करतो. परंतु त्यांच्यासंबंधी वाचकाची काहीही प्रतिक्रिया होतच नाही, असे मात्र कधीही होत नाही. 'व्हॅनद्रदी उ ले लिम्ब ड्यू पॅसिफिक', या त्यांच्या पहिल्या कादंबरीला – रॉबिनसन यांची गोष्ट पुन्हा एकदा नव्याने सांगितलेल्या कथेला पारितोषिक मिळाले याचा उल्लेख येऊन गेलाच आहे. प्रकाशित झालेले ते त्यांचे पहिले – वहिले पुस्तक. ही कादंबरी डॅनिएल डिफो यांच्या 'रॉबिनसन क्रुसो' या कादंबरीचा 'नवा अवतार' आहे. व्यक्तीचे या निसर्गात व प्राप्त जगतात नेमके स्थान कोठचे? हे गूढ उकलण्याचा प्रयत्न त्यांच्या कादंबरीने, मूळ कथेला दिलेल्या 'नव्या अवतारा'मागे आहे. हे खुद्द लेखकानेच स्पष्ट केले आहे. डिफो, हे अठराव्या शतकात प्रचलित असलेल्या बुद्धिवादांचे पुरस्कर्ते होते. या उलट तुर्निए यांचा दृष्टिकोन मानवी भावनांचा आदर करणारा, मानवी संवेदनांजवळ जाणारा, आणि उत्स्फूर्ततेवर भर देणारा आहे.

विसाव्या शतकातील व्यक्तीच्या आत्म्याचा शोध घेण्याचा प्रयत्न तुर्निए यांनी आपल्या 'फ्रायडे' या कादंबरीत केलेला आहे. काल, दैनंदिन उद्योग, क्रिया, गरजा, व्यवहार आणि राजकीय श्रद्धा या सर्वासंबंधीचे अनुभव हे प्राथमिक स्वरूपाचे आहेत. त्यांच्याकडे, नव्या व यापूर्वीच्या परंपरांवर कोठल्याही प्रकारे अवलंबून नाही, अशा दृष्टिकोनातून, पाहाण्यासाठी, त्यांनी स्वत:ला अभिप्रेत असलेल्या मार्गाचा शोध घेतला आहे. प्राणी, वनराजी, आणि धरतीमाता,या सर्वांबरोबरचे,थोडक्यात या मानवी संस्कृतीत अनुस्यूत असलेल्या मानवाच्या संबंधांची ते नव्याने तपासणी करतात; व त्यावर स्वत:च्या दृष्टिकोनातून भाष्यही करतात. तुर्निए यांच्या फ्रायडे या कादंबरीत, फ्रायडे या व्यक्तीची अनेक चांगलीच लांबलचक स्वगते आहेत. तुर्निए त्या स्वगतांच्या मदतीने, स्पिनोझा या प्रख्यात युरोपीय तत्त्वज्ञाने सांगितलेल्या, तत्त्वज्ञानाचा शोध घेतात. ही तुर्निए यांची पहिली कादंबरी, त्यांच्या



अनुक्रमणिका

तत्त्वज्ञानविषयक कल्पना आणि त्यासंबंधीचे अंदाज बांधणे, या दोन्ही दृष्टीने, फारच मौल्यवान आहे. ही कादंबरी बरेचसे सांगून जाते. एका फ्रेंच (भाषिक) साहित्य समीक्षकाने, तुर्निए यांच्या दृष्टिकोनाचे सार थोडक्यात पुढील शब्दात व्यक्त केले आहे. त्यांच्या मते, फ्राईड, युंग आणि क्लाद लेव्ही ट्रास यांच्या दृष्टिकोनातून, तुर्निए यांनी पाहिलेला क्रुसो, असे त्या फ्रायडे या कादंबरीचे वर्णन करता येईल.

एका निर्जन बेटावर सोडून दिलेला एक नाविक वा खलाशी, डिफो व तुर्निए या दोघांच्याही कादंबऱ्यात आहे. या दोन बेटांवरचे हे दोघेजण, त्या बेटावर त्यांचे असे जे पर्यावरण असते त्यावर नियंत्रण ठेवण्याचा व ते सुसंस्कृत करण्याचा प्रयत्न करतात. परंतु तुर्निए यांचा रॉबिनसन हा वृत्तीने डिफो यांच्या रॉबिनसनपेक्षा वेगळा आहे. निसर्गावर आपली इच्छा लादण्यात काहीही उपयोग नाही, हे त्याच्या झटकन लक्षात येते. म्हणूनच ते बेट आणि तो स्वत: या दोघांच्यात एक गूढ असा अनुबंध विकसित होतो. तो बेटाला नाव देतो स्पेरऑनझा. डिफो यांचा रॉबिनसन हा अखेरपर्यंत एक इंग्लिश मध्यमवर्गीय माणूसच राहातो. काहीही साध्य करायचे असेल, तर त्यासाठी माणसाने नियोजन केले पाहिजे व प्रयत्नशील असले पाहिजे, यावर त्याची ठाम श्रद्धा असते. तुर्निए यांच्या कादंबरीतील रॉबिनसन क्रुसो हे फ्रायडे या व्यक्तीला भेटण्याअगोदरच त्यांनी युरोपीय चालचालणूक व संकेत यांचा त्याग केलेला असतो. सूर्याची पूजा ते अगदी मनापासून करतात. कपडे घालण्याचे सोडून दिलेले असते आणि स्वच्छंदीपणे जीवन जगतात. त्यांना वाटेल तेव्हा, मनात येईत ते काम करायचे, जेवायचे आणि झोप काढावयाची असा त्यांचा दैनंदिन कार्यक्रम असतो.

तुर्निए यांच्या कादंबरीत शेवटी त्या दोघांची सोडवणूक करण्यासाठी एक जहाज येते. त्या जहाजाच्या मदतीने फ्रायडे ते जहाज सोडून जातो. रॉबिनसन त्या जहाजावरून पडतात. आपल्या लाडक्या स्पेरनाझा या बेटाला रामराम ठोकण्यास नकार देतात.

रॉबिनसन या निर्जन बेटावर नवनिर्मिती करण्याबाबत अगदी तळाशी येऊन पोचतात. त्यांचे हे स्थळ, कालाबाहेर कोठेतरी अधांतरी असते. इतिहासाची कसलीही व कोणतीही पुसटशी खूण त्याठिकाणी नसते.

तुर्निए यांच्या सर्वच कादंबऱ्यांचे रूप व घाट परंपरागत आहे. पण त्यातल्या आशयाचे स्वरूप हे वैश्विक आणि चमत्कारिक आहे. या दोन्ही गोष्टीत जो अंतर्विरोध आहे तेच त्यांच्या कादंबऱ्यांचे वैशिष्ट्य आहे.

तुर्निए कादंबरीतले कथानक सांगण्यासाठी जो घाट वापरतात तो एकोणिसाव्या शतकातील कादंबऱ्यांच्या घाटासारखाच जवळजवळ होता. उदा. कादंबरीतील कथानकात आलेल्या व्यक्तींचा विकास, वर्णने, एका रेषेत कथानक पुढे सरकणे इत्यादी. तथापि एका बाबतीत फरक जरूर आहे. तुर्निए यांच्या कादंबऱ्यांत, निष्ठा, ओंगळ अशी लैंगिकता, मृत देह, घाण, कचरा, पशुत्व, आणि जवळच्या कुटुंबियांतील संभोगाची दृष्ये, या सर्व विषयांवर

भडक व तपशीलवार वर्णने आढळतात. तुर्निए यांनी 'ल व्हँ पारातेत' या नावाचे एक पुस्तक लिहिले आहे. ते त्यांच्या बौद्धिक वाटचालीचा आलेख काढणारे आत्मचरित्रच! या पुस्तकात मिशेल तुर्निए यांनी आपल्या एकंदर लेखनाबद्दल तपशीलात जाऊन विवेचन केले आहे. ते आपल्या साहित्याबद्दल असे स्पष्टपणे सांगतात की माझ्या साहित्यात 'घाट या पातळीवर नवे काही करावे असे माझे उद्दिष्ट नाही.'

**फ्रायडे या कादंबरीतील कथानकाचा सारांश :**

२९ सप्टेंबर १७६९च्या रात्री 'ला व्हिरजिन' या बोटीचे कप्तान व्हॅन डयस्सेल, आपल्या जहाजावरील एक उतारू रॉबिनसन क्रुसो याचे भविष्य टारोट या खेळाच्या मदतीने वाचतात. तो उतारू गेली कित्येक वर्षे समुद्रपर्यटन करीत असतो. त्याने आपली बायकामुले इंग्लंडमध्ये ठेवलेली असतात. अमेरिकेत जाऊन आपले नशीब उघडेल अशी आशा त्याला वाटत होती. . . इत्यादी.

हे भविष्य एका गुप्त व सांकेतिक भाषेत असल्याकारणाने, त्याची फोड करून त्याचा अर्थ लावणे भाग असते. ह्या बेटावरचे जीवन, रॉबिनसन क्रुसो यांचे जीवन कसे असेल याचे वर्णन कप्तान डयस्सेल यांच्या भविष्यात येऊन जाते. हे भविष्य असताना, नेमक्या त्याच क्षणी ते जहाज कसल्यातरी अडथळ्यावर आदळते व फार प्रचंड आवाज होतो. जहाज बुडण्यास सुरुवात होते. रॉबिनसन डेकवरती येतात. त्यांना आजूबाजूला चहूबाजूंनी पाणी फार वेगाने बोटीत शिरताना दिसते. काही तासानंतर, रॉबिनसन क्रुसो यांना एका बेटाच्या किनाऱ्यावर जाग येते. प्रथम त्यांना असे वाटते की ते दुर्दैवी जहाज बुडाल्यानंतर वाचलेले असे ते एकटेच. थोड्याच वेळाने त्यांना टेनचा शोध लागतो. त्या जहाजावरच्या कुत्र्याचे ते नाव. बुडत्या जहाजावरून निसटण्यात तो यशस्वी झाला होता. रॉबिनसन क्रुसो यांच्या त्या बेटावरच्या वास्तव्यात, अनेक दिवस 'टेन' हाच त्यांचा एकमेव सवंगडी.

रॉबिनसन यांना जाग आल्यानंतर, त्या बेटावरून शक्य असेल तो मार्ग वापरून, आपली सुटका करून घेणे, हीच त्यांची ताबडतोब झालेली प्रतिक्रिया होती. त्या बेटावर रानटी मेंढ्या आणि गिधाडे भरपूर प्रमाणात होती. ते त्या बेटाचे नाव ठेवतात 'इल ड ला डेसोलाशीआँ,' 'हताश करणारे बेट.' ते क्षितिजावर नजर टाकतात. बेटाजवळून जाणारे एखादे जहाज दिसले, तर त्या जहाजावरील लोकांना आपल्या अस्तित्वाची जाणीव व्हावी यासाठी ते खाणाखुणा करतात. हे सारेच प्रयत्न अयशस्वी ठरतात. मग ते एक होडी तयार करण्याचा बेत करतात. या होडीचा वापर करून, आपण चिली या देशाचा किनारा गाठू असे त्यांना वाटत होते, कारण चिली हा देश फार जवळ आहे, अशी त्यांची कल्पना. होडी तयार करण्यासाठी हत्यारांची जरुरी होती. ती मिळाली तर पाहावीत या हेतूने, ते या फुटलेल्या जहाजावर जातात. या जहाजावरून, काही स्फोटके, काही शस्त्रे, काही अवजारे आणि बायबल घेऊन ते बेटावर परत येतात. तथापि होडी तयार करण्याचा त्यांचा प्रकल्प

मात्र यशस्वी होत नाही. खूप खटपट करून ते कशीबशी एक होडी तयार ठेवतात. तिला इव्हेजन (सुटका) हे नावही देण्यात येते. परंतु ती पाण्यात कधीही जात नाही, कायम जमिनीवरच राहाते.

एकाकीपण, हाच त्यांचा कायमचा सवंगडी ठरतो. या सवंगड्याची विनवणीही करता येत नाही असा. निराशेने त्यांचे मन भरून जाते. जवळ जवळ वेड लागण्याची पाळी येते. दिवसा स्वप्ने पडतात. वेगवेगळे भास होऊ लागतात. उदा. , आपली बहीण ल्युसी आपण पाहात आहोत असा भास त्यांना होतो. बराचसा वेळ ते चिखलाच्या डबक्यात स्वत:ला गळ्यापर्यंत बुडवून घेत. या घट्ट चिखलात बसून ते स्वत:ला हरवून घेत. आपल्या सर्वांगाला स्वत:चीच विष्ठा फासून घेत. त्यांच्या मनाच्या अगदी आतल्या गाभ्यातून जुन्या आठवणींचे तुकडे त्यांच्या जाणिवेत डोकावत. नैराश्याचा व निरुत्साहीपणाचा तो प्रदीर्घ असा कालखंड होता. तथापि एक दिवस रॉबिनसन यांची फारच जोरदार प्रतिक्रिया होते. या बेटावरून सुटका करून घेण्याची स्वप्ने, प्रत्यक्षात कधीही येणार नाहीत, इतकी ती अशक्य कोटीतली आहेत हे ध्यानात आल्यानंतर, ती स्वप्ने व ते विचार ते सोडून देतात. महासागराकडे जणू पाठ फिरवून त्यांनी त्या बेटावरील आपले आयुष्य संघटित करावयास सुरुवात केलेली असते.

रॉबिनसन यांना आपला 'कमकुवतपणा', 'ढासळलेली मन:स्थिती' या दोन्हीबद्दल लाज वाटू लागली होती. एका नव्या पर्वाचा आरंभ होतो. आपल्या आयुष्यावर आपला ताबा यावा या हेतूने काही गतिशाली निर्णय घेण्याचे ते ठरवितात.

रोजनिशी किंवा नोंदवही ठेवण्यास सुरुवात करणे, हा त्यांनी घेतलेला पहिला विधायक असा निर्णय. या रोजनिशीत, ते आपल्या अंतर्गत आयुष्याची उत्क्रांती कशी झाली हे नमूद करणार होते. आजवर पशुतुल्य भावना व गरजांनी त्यांच्यावर विजय मिळविला होता. रोजनिशी ठेवण्यास सुरुवात केल्याने, त्यातून आपली सुटका होईल असे त्यास वाटले. सरतेशेवटी मनुष्यप्राणी हा विचार करणारा प्राणी आहे. यापुढे यांत्रिकी पद्धतीने जीवन जगावयाचे नाही असा निर्णय ते घेतात. आपण ज्या प्रकारे जीवन व्यतीत करणार आहोत, त्यासंबंधी विचार करावयाचा किंवा जीवनाबद्दल आपल्या स्वत:च्या ज्या प्रतिक्रिया होतात त्यांची नोंद घ्यायची, असा निश्चय करून तो लगेच अमलात आणण्याचेही नक्की होते. या अशा प्रकारे, चैतन्यशील आणि सांस्कृतिक जगात ते पुन्हा प्रवेश करणार असतात. भाषा हा त्यांच्या सांस्कृतिक जीवनात एक आवश्यक असा घटक. रोजनिशी लिहून ते एक पुण्यकृत्य करणार होते. त्यांच्या दृष्टीने ती कृती एक 'पवित्र अशी कृती' होती. ते यापुढे ज्या कृती करतील त्यांना बायबलमध्ये आपणास आधार सापडेल असेही त्यांना वाटले. भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ यांच्यातील दुवा आता त्यांना गवसतो आणि ते जो 'काळ' व्यतीत करीत, तो संघटित करण्यास ते आरंभ करतात.

'काल' तसेच 'पैस' संघटित करणे, हा त्यांचा दुसरा एक विधायक निर्णय. एक पंचांग

तयार करून त्याची देखभाल व्यवस्थित होते आहे,याकडे ते लक्ष देतात. घटिका पात्र, तयार 'काल' मापन ते धरतात. या अशा प्रकारे कालगणनेला– पंचांग व घटिकापात्र– संघटित स्वरूप त्यांनी प्राप्त करून दिले होते. हे असे केल्याने आपण जणू काही 'काळ' कैद करून ठेवला आहे, या खुषीत ते असतात. आज कोठचा वार आहे, हे त्या परिस्थितीत त्यांनी कल्पनेनेच नक्की केले होते. परंतु पंचांग तयार करण्याच्या प्रक्रियेत हे वारही तसे नक्की होतात. मग प्रत्येक दिवशी काय करायचे याचे वेळापत्रकही तयार होते. उदा. शुक्रवारी उपास करायचा, रविवारी विश्रांती घ्यायची इत्यादी.

रॉबिनसन यांच्याव्यतिरिक्त, अन्य कोणीही मनुष्यप्राणी त्या बेटावर नसल्याकारणाने ते 'एकाकी' असतात. म्हणून त्यांना असे वाटते की, हे बेट आपण 'काबीज' केलेच पाहिजे आणि त्यावर, आपण आपला वरचष्मा प्रस्थापित केला पाहिजे. ते त्या बेटाचा अगदी तपशीलात जाऊन व्यवस्थितपणे शोध घेतात. त्याचा कानाकोपरा अगदी बारकाईने नीट तपासतात, मग स्वत:साठी घर बांधतात. हे घर त्यांचा वैयक्तिक असा अथवा मानवतेचा स्पर्श झालेला पैस होतो.

बेटावरील प्रत्येक गोष्टीला काही नाव द्यायचे हा त्यांचा तिसरा निश्चय होता – हे असे केल्याने, मानवी समूह आणि त्या बेटावरील प्रत्येक वस्तू यांच्यात दुवा निर्माण करण्यास आपणास अवसर मिळेल असे त्यास वाटत होते. हे असे करण्यामागेही कारणे होती. एकतर भाषा ही गोष्ट अस्तित्वात असल्याकारणाने समाज अस्तित्वात येतो. दुसरे आपल्या अवती–भोवती जे जे काही आहे, त्यावर नियंत्रण मिळविण्याच्या दृष्टीने, त्यांचा तो निर्वाणीचा प्रयत्न होता. प्रत्येक गोष्टीला नाव देणे हा त्या प्रयत्नाचाच भाग होता. रॉबिनसन असे सांगत की 'मला प्रत्येक वेलीला, झुडपाला, झाडाला नाव दिले, प्रत्येक पक्ष्याच्या पायात कडी अडकवली, आणि प्रत्येक सस्तन प्राण्यावर डाग देऊन मुद्रा उठविली असं म्हणायला मला आवडते.' आपल्या अवतीभोवती असलेल्या प्रत्येक गोष्टीचा नामकरणविधी हे त्यांच्या दृष्टीने धर्मकृत्यच होते. ते जी होडी तयार करीत त्याला त्यांनी इव्हेंजन हे नाव अगोदरच दिले होते, याचा उल्लेख यापूर्वी येऊन गेलाच आहे. बेटाला त्यांनी सुरुवातीला 'इल डला डेझोलासिऑं' असे नाव दिले होते. आता त्याचा पुन्हा एकदा नामकरणविधी होतो. त्याचे नाव बदलून 'एसपेरानझा' (आशा) असे ठेवण्यात येते. हे नाव ठेवण्याची प्रेरणा त्यांना बायबलवरून मिळाली होती; कारण बायबलच्या दृष्टीने 'आशा' हा अगदी आवश्यक असा सद्‌गुण आहे.

### काम करणे, हा रॉबिनसन यांचा चौथा निर्णय

आदिमानवाप्रमाणे रॉबिनसनही अनेक अवस्थातून क्रमाक्रमाने जातात. अन्न गोळा करणे (फळं, झाडांची मुळे, मध इत्यादी) – शिकार– शेती– गोपालन– पशुपालन या त्या अवस्था होत. निसर्गाने त्यांना जे देऊ केले होते त्यावर ते इत:पर समाधानी नव्हते. आता ते

निसर्गात बदल घडवून आणण्याचा प्रयत्न करतात. ते अगदी एकटेच असल्याकारणाने त्यांनाच सर्व कामे करावी लागतात. त्यातली काही फारच कष्टाची असतात. आदिमानवाच्या चार अवस्थांचा वर जो उल्लेख आला आहे, तो सारा प्रवास त्यांनी एकट्यांनीच केला होता.

त्या बेटावर असलेल्या साधनसंपत्तीचा वापर करण्याचा निश्चय होतो. पेरणी, कापणी आणि मग धान्य साठवणे, इत्यादी कामे क्रमाक्रमाने होतात. ते स्वत:च्या प्रयत्नाने ब्रेड तयार करतात, आणि समुद्रात सापडलेल्या फळांपासून साखरेइतक्याच जवळ जवळ गोड अशा एका वस्तूंचे उत्पादनही होते. लोणची, मोरंबे तयार होतात. उंदरांपासून, आपल्या वाढत्या पिकांना त्रास होऊ नये यासाठी उंदरांचा बंदोबस्त होतो. वजन-मापे तयार करण्यात येतात.

तथापि रॉबिनसन यांच्या मनात एक संशय कायम घर करून होता. या नाना प्रकारच्या आपण ज्या कृती करतो त्यांचा काय उपयोग आहे? हा प्रश्न त्यांच्या मनात कायम घोळत असे. पोकळीविरुद्ध चाललेल्या निर्वाणीच्या लढाईसारख्याच त्यांच्या या कृती होत्या. या प्रश्नाचे उत्तर त्यांच्याकडे नव्हते. परंतु या सर्व कृती केल्याने त्यांना अतिशय आनंद होत होता. त्याची कारणेही अनेक होती. संस्कृतीच्या रोखाने जाणारे हे सारे प्रयत्न, त्यांना मानवतेजवळ घेऊन जात होते. त्यांच्या सध्याच्या परिस्थितीत, मानवतेपासून त्यांचा संबंधच तुटला असल्याकारणाने, तो संबंध नव्याने प्रस्थापित होण्यासाठी होणाऱ्या कृती आनंददायी ठरणे स्वाभाविकच होते. दुसरे या सर्व हालचालींच्या द्वारा ते धार्मिक मूल्यांना उचलून धरून ते सृष्टिनिर्मात्या परमेश्वराच्या समीप जात होते. वस्तू निर्माण करणे, त्या वाढविणे, त्यांचे जतन करणे हे करण्यापासूनही आनंद प्राप्त होत होता.

'कायदे करणे' हा रॉबिनसन यांचा पाचवा निर्णय. याही निर्णयामागे एक कारण असते. कोणत्याही प्रकारच्या सामाजिक जीवनासाठी, अनेक नियम व कायदे यांचे अस्तित्व गृहीतच धरले जाते. म्हणूनच फुटक्या जहाजावरून या बेटावर आलेला मनुष्य 'सनद' तयार करतो. एसपेरनाझा बेटासाठी एक 'पिनल' कोड मागाहून तयार करण्यात येते. या पिनल कोडानुसार वेगवेगळ्या प्रकारच्या गुन्ह्यांसाठी निरनिराळ्या शिक्षाही ठरविण्यात आलेल्या होत्या. त्यांनी स्वत:च ते या बेटाचे गव्हर्नर (राज्यपाल) हे पद अगोदरच घेतले होते. आता ते त्या बेटाचे सेनापतीही बनतात.

तथापि एक मोठा प्रश्न अजूनही अनुत्तरितच होता. सध्या या बेटावर रॉबिनसन हे एकटेच असतात. या परिस्थितीत या सर्व कृती, हालचाली, रॉबिनसन यांच्या दृष्टीने फायद्याच्या होत्या का? त्यांना एकाकीपणा, नैराश्य, भीती या सर्व शक्तींविरुद्ध झुंज द्यायची होती. नैराश्याच्या महापुरात स्वत:ला बुडवून टाकावे, या प्रलोभनाविरुद्ध झगडायचे होते. डुकराच्या सान्निध्यात चिखलाच्या डबक्यात डुंबून एखाद्या जनावराप्रमाणे वागून सर्वस्वी अमानुष अशी वागणूक करण्याच्या मोहाविरुद्ध लढाई करायची होती. हे सारे संघर्ष व लढाया करण्यासाठी एका बचावात्मक यंत्रणेचे स्वरूप त्या कृतींना व हालचालींना आहे, असे रॉबिनसन यांना

वाटत होते.

तथापि हे सारे उपाय तसे ठिसूळच होते, आणि मानवता गमाविण्याची प्रक्रिया चालूच राहिली. कमकुवतपणा आणि नैराश्य यांचेही काही क्षण असतात. शब्दांना काही अर्थ आहे का? याबद्दलच त्यांना संशय यावयास सुरुवात होते; तसेच ते शब्द आता एखाद्या ठोस गोष्टीचे प्रतिनिधित्व करीत नाहीत असेही त्यांना आढळून येते. या सर्वांवर म्हणजे, आपण आपले व्यक्तित्व किंवा 'मी'पण गमावून बसलो आहोत, आपल्या स्वत:मध्ये काही बदल झाला आहे ही भावना त्यांच्या मनात जागृत होते. अन्य कोणी अस्तित्वात असणे म्हणजे त्या दुसऱ्या व्यक्तीच्या असण्याने एखाद्याचे व्यक्तित्व व मीपणा सिद्ध होतो. ते बेट निर्जन असल्याकारणाने, आपले व्यक्तित्व व मीपणा आपण गमावून बसलो आहोत याबद्दल त्यांची खात्री होते. आपण प्रत्यक्ष काय पाहात आहोत, आपण कशाची कल्पना करत आहोत, आणि आपणास नेमके काय वाटते, या तीन प्रश्नात त्यांना इत:पर फरकच करता येत नव्हता. म्हणूनच ज्या वेडामुळे भयभीत व्हावे असे वेड आपणाला घेरते आहे असे त्यास वाटू लागले. म्हणूनच ते खास करून पुढील निरीक्षण नोंदवितात – "दृष्टीला होणारा भास,मृगजळ, चित्तभ्रम, दिवा-स्वप्ने, भास, फँटसी, बेशुद्धावस्थेतील बडबड या सर्वांविरुद्ध उठाव करून, आपणास नक्की असे संरक्षण कोण देत असेल?आपला शेजारी, आपला मित्र, आपला शत्रूसुद्धा -- परंतु हे दयाघना परमेश्वरा कोणीतरी ---- कोणीही." या कालखंडात ते आपली 'मी'पणाची जाणीवच अनेक वेळा गमावून बसत. ते स्वत:स एसपेरानझा या बेटाची एक प्रकारची विष्ठाच आपण आहोत असे समजू लागले होते.

रॉबिनसन यांना काल,पैसा,भाषा,जगाबद्दलची जाण, या सर्वांत बदल घडून येत आहेत असे वाटणे, हा सारा परिणाम त्या बेटावर अन्य कोणीही नसणे अगर एकाकीपणाचा होता.

जनावराच्या परिस्थितीत परत जाणे, आपली मानवता सर्वस्वी गमाविली आहे अशा परिस्थितीत जाणे,या दोन्हीपासून आपण स्वत:स वाचवावे, याची अगदी ते घायकुतीला येऊन इच्छा करीत होते. रॉबिनसन याच कालखंडात ऊबदार, अधिक भ्रातृभाव दर्शवील अशा दुसऱ्या एका बेटाची स्वप्ने पाहू लागतात.

ज्या जागेचे संरक्षण केले पाहिजे, जिचे प्रशासन केले पाहिजे एवढ्यापुरतेच ते बेट नव्हते. निदान अनेक दिवस त्यांना तसे वाटत होते. रॉबिनसन यांच्या दृष्टीने त्या बेटाला एका खऱ्याखुऱ्या व्यक्तित्वाचे स्थान व प्रतिष्ठा होती. त्यांनी अनेक वर्षांपूर्वी ज्या स्त्रीवर प्रेम केले होते तिचे नाव होते एसपेरनासा,– तेच नाव त्यांनी त्या बेटास दिले होते. बेटावर दुसरे कोणीच नसल्याकारणाने, त्या बेटाबरोबरच रॉबिनसन एक प्रदीर्घ व गहन असा संवाद करीत. मानवी भाषेचं विघटन होत असले तरी, निसर्ग विरोधात उभा राहिला नाही. तो त्यांना प्रतीकात्मक निरोप पाठवीत होता.

ते बेट ही जणू आपली माता – कालांतराने ती आपली पत्नी आहे – असे मानून रॉबिनसन यांनी त्या बेटावर प्रेम करण्यास सुरुवात केली. त्या क्षणापासून प्रत्येक गोष्टीत बदल होत गेला. या बेटाच्या मध्यभागी एक गुहा होती. रॉबिनसन या गुहेच्या अगदी आतल्या भागात जातात. तेथे जाणे सुकर व्हावे म्हणून आपल्या सर्व अंगाला दूध चोपडतात. अगदी आतल्या भागात पोचल्यानंतर, मूल जन्माला येण्याअगोदर ज्या तऱ्हेने मातेच्या पोटात असते, तसेच ते त्या ठिकाणी पडून राहतात. कामाचा त्यांना विसर पडतो आणि एका सुखद कल्पांतात एक प्रकारे ते जगतात. बालपणातील निरागसता जी आपण गमाविली होती, ती आपणास पुन्हा एकदा प्राप्त झाली आहे असे त्यांना वाटते.

तथापि हे बेट त्यांना आपल्या आईची इतकी जोरदारपणे आठवण करून देते की त्यामुळे ते भयभीत होतात. रॉबिनसनना असे भय वाटू लागते की आपल्या या जोरदार स्मरणामुळे, आपले मातेबरोबर, जवळ जवळ लैंगिक असे संबंध वाढीस लागले आहेत. म्हणूनच त्या गुहेतल्या अगदी आतल्या भागात वेळ घालविण्याची जी सवय त्यांना लागली होती, ती ते सोडून देतात.

रॉबिनसन एका झाडाबरोबर लैंगिक संबंध प्रस्थापित करतात. परंतु हा संबंध काही महिनेच टिकतो. एक दिवस एका कोळ्याने त्यांच्या जननेंद्रियाला चावा घेतल्याकारणाने ते दुखू लागते. म्हणून त्या संबंधाचा त्याग करणे त्यांना भाग पडते. त्यानंतर ज्यास ते सपक मार्ग म्हणून संबोधीत त्याकडे त्यांना वळावे लागते. निसर्गाबरोबर प्रेमसंबंध विकसित करण्यासाठी आपण दुसरा कोठचा तरी मार्ग शोधून काढला पाहिजे याची जाणीव त्यांना होते.

मैदानात फार दूरवर बाक असलेली एक गुलाबी खोलगट अशी जागा पाहून रॉबिनसन यांना स्त्रीच्या पाठीची आठवण होते. रॉबिनसन त्या जागेकडे आकृष्ट होतात. ती जागा आपल्या जननेंद्रियाच्या मदतीने नांगरतात. तेथेच त्यांचे रेतस्खलनही होते. ती धरती, ही आता त्यांनी आजवर पत्नी मिळावी अशी इच्छा केली, ती त्यांची इच्छा पुरी करते. आपले मिलन वांझ ठरणार नाही, निदान तशी कल्पना तरी रॉबिनसन करतात. या जागेवर तोवर कोणी पाहिला नव्हता, अशा फुलांचा बहर आलेला आहे असे निदान त्यांना तरी वाटते. त्यांची आता अशी खात्री होते की आपले त्या धरतीबरोबर मिलन झाले, त्याची ती परिणती आहे. ते या फुलांचे नाव ठेवतात मेड्रागोरस.

रॉबिनसन यांचे जणू आता एका नव्या माणसात परिवर्तन होते. तसे होते तरी त्यांच्या स्वत:त जी वेगवेगळी परिवर्तन होत होती, ती त्यांना अजूनही समजत नव्हती. उदा. मानवी अवस्थेतून आपण खाली खाली जाणे ही प्रक्रिया आपल्या बाबतीत खरी ठरेल अशी भीती त्यांना अजूनही वाटत होती. म्हणूनच ते आपल्याभोवती ज्या भेडसावणाऱ्या शक्ती होत्या त्यांच्यापासून संरक्षण करण्याची काळजी घेत. त्यासाठी त्या बेटाचे प्रशासन करणे आणि

वेगवेगळे कायदे पास करणे त्यांनी चालूच ठेवले. जिचे अनुकरण त्यांना करता येईल अशा व्यक्तीची रॉबिनसन यांना गरज होती. त्यांना ही गरज भासू लागली तेव्हाच फ्रायडे यांनी त्यांच्या आयुष्यात प्रवेश केला.

रॉबिनसन यांना आपण आजवर जे काही उत्पादन केले– उदा. डुकरांचे मांस – हे अगदी निरुपयोगी व निष्फळ आहे, अशी तीव्र जाणीव दिवसेंदिवस होतच होती. आता ती अधिक अधिक प्रमाणात होऊ लागली. सर्वसामान्यपणे मानवी प्रयत्न हे मूल्यवान आहेत या सिद्धांतासंबंधीच ते प्रश्न उपस्थित करू लागले.

नेमक्या याच वेळी आरोकान्स या टोळीचे / जमातीचे अमेरिकन इंडियन्स या बेटावर उतरतात. धार्मिक विधीचा एक भाग म्हणून नरबळी देणे– हा विधी पार पाडण्याच्या हेतूने ते तेथे आलेले असतात. ते एक नरबळी देतात,पण दुसरा बळी जो ते देणार होते, तो त्यांच्या हातातून निसटतो. एका सडसडीत बांध्याच्या उंचनीच, तुकतुकीत जांभूळवर्णी तरुणास नरबळी म्हणून मुक्रर केलेले असते. पण तो तरुण त्यांच्या हातून निसटतो व पळ काढतो. हा तरुण जे अमेरिकन इंडियन बळी देणार होते,त्यांच्यापेक्षा वेगळा होता, म्हणून ते त्याला बळी देणार होते की त्याला बळी देणे हे एक प्रकारचा वांशिक स्वरूपाचा द्वेष व्यक्त करण्यासाठी होते,याबद्दल रॉबिनसन यांना कुतूहल वाटते. तो तरुण रॉबिनसन यांच्या रोखाने धावत येतो– रॉबिनसन त्या तरुणांचा पाठलाग करणारांवर, आपल्या बंदुकीच्या मदतीने गोळ्या झाडतात. ते पाठलाग करणारे लगेच पळ काढतात. हा जांभूळवर्णी इंडियन त्यांच्या पायावर लोळण घेतो.

रॉबिनसन यांच्या दृष्टीने, फ्रायडे हा एक 'रानटी' मनुष्य (savage) होता. म्हणजे, तो त्यांच्या दृष्टीने तसा माणूसच नाही. एखाद्या गोऱ्या युरोपियन वसाहतवाद्याचे मन, ज्या पूर्वग्रहाने भरलेले असते, तसेच रॉबिनसन यांचेही होते. त्यांच्या दृष्टीने मानवजातीच्या उतरंडीत फ्रायडे हा अगदी शेवटच्या पायरीवर उभा असलेला प्राणी. त्यांनी त्याच्यावर अंमल गाजविला पाहिजे आणि नियंत्रणही ठेवले पाहिजे. त्याजबरोबर त्यांनी त्याचे शिक्षण करणे व त्याच्यात परिवर्तन करणेही आवश्यक होते.

रॉबिनसननी आता एका निर्मात्याच्या आणि प्रशासकाच्या भूमिकेत अगदी मनापासून वावरण्यास सुरुवात केली. या इंडियनाच्या आगमनाबरोबरच रॉबिनसन हे अखिल ब्रिटिश संस्कृतीचे एकमेव प्रतिनिधी बनले. त्या संस्कृतीची त्यांच्यावर सुरुवातीपासून छाप होतीच. त्यांना यापूर्वी त्या संस्कृतीबद्दल जेवढी आत्मीयता वाटत होती, त्यापेक्षा ती आता अधिक वाटू लागली. ब्रिटिश संस्कृतीबरोबर अशी जवळीक वाटत असल्याने, त्यांना सुरक्षितता प्राप्त होत होती. हा जांभूळवर्णी इंडियन, आपण एक गुलाम आहोत ही भूमिका आत्यंतिक अशा नम्रतेने व अगदी सहजपणे स्वीकारतो. इंग्लिश मनुष्य त्याला काय करावे व काय करू नये, याबद्दल हुकूम करतो. त्या साऱ्या सूचनांचा व उपदेशाचा तो स्वीकार करतो. आता

तो इंडियन रोज प्रार्थना करू लागतो. पैसे कसे वापरावेत याचे शिक्षण घेतो, बेटाची साफसफाई करतो, व त्या बेटाला सौंदर्याने नटवितो. इतकेच नव्हे तर इंग्रजी शिकण्यासही तो सुरुवात करतो.

रॉबिनसन त्याचे नाव फ्रायडे ठेवतात, कारण त्याच वारी त्यांची व त्याची प्रथम भेट झाली होती. हा नामकरणविधी ही घटना बरेचसे काही सांगून जाते. या घटनेद्वारा रॉबिनसन यांची मनोवृत्ती आविष्कृत होते. त्यावरून असे सूचित होते की त्या मालकाच्या दृष्टिकोनातून तो फ्रायडे हा 'मनुष्य' नव्हता. 'काळात घडलेली घटना' या पलीकडे अधिक काहीही नव्हता. याही पलीकडे जाऊन फ्रायडे हे नाव रॉबिनसन यांनी का निवडले ? याची कारणमीमांसा तपासली, तर ती कारणे काहीशी गूढ आणि गुंतागुंतीची आहेत असे आढळून येईल. रॉबिनसन यांनीच सांगितले आहे की फ्रायडे हा व्हिनस देवतेचा दिवस, तसे तो ख्रिस्ताच्या मृत्यूचाही दिवस. महासागराच्या पाण्यातून व्हिनस ही देवता प्रकट होते. तसेच फ्रायडे या नोकराचे होते. या फ्रायडेच्या प्रभावाखाली. रॉबिनसन हे आपल्या प्युरीटन पंथाचा त्याग करून, त्याऐवजी दैवी, निसर्गाच्या भक्तीमागे लागण्याची शक्यता होती.

फ्रायडे याची आत्यंतिक नम्रता ही केवळ वरवरची होती. तो दाखविण्याचा भाग होता. वस्तुत: त्यांच्यावर नियंत्रण ठेवणे अथवा त्यांना शिक्षण देणेही शक्य नव्हते. या सर्वांमुळे रॉबिनसन अस्वस्थ होत आणि कालांतराने कमालीचे त्रासले व चिडचिड करू लागले होते. फ्रायडे याचे हास्य तसे भेसूर होते, शिवाय त्या हास्याचा स्फोटही एकाएकी होत असे. हे हास्य पाहून आधीच अस्वस्थ असलेले रॉबिनसन कमालीचे अस्वस्थ होत. फ्रायडे आपल्या मालकाबद्दल प्रेम व आस्था व्यक्त करीत नाही. तसेच प्राण्यांच्या बाबतीत तो क्रूर होता. उदा. एका कासवाला मारण्याअगोदर, तो त्या कासवाचे कवच प्रथम काढून घेतो. या उलट तो टेन या कुत्र्याबाबत कमालीच्या हळुवार व कोमल भावना व्यक्त करी. फ्रायडेने एक छोटेसे गिधाड पाळले होते. तो त्याला माणसाळवतो व त्याचे संगोपन करतो. या गिधाडाकडे तो मातेच्या प्रेमाने पाहात असे. त्याला दिलेल्या कामाकडे पाहाण्याचा त्याचा दृष्टिकोन असाच चमत्कारिक होता. तो जेव्हा त्याच्या दृष्टीने ज्या कामाचा काही उपयोग नाही आणि जे मूर्खपणाचे वाटे, असे काम करीत असे, तेव्हा तो कधीही आनंदी व सुखी नसे. तसेच त्याला इच्छा व अभिरुची या दोन्ही गोष्टी अनाकलनीय अशाच होत्या. उदा. त्याला खडे फेकायला आवडत; झाडे उलटी करून म्हणजे मुळे वर आणि पाने खाली असे करून, त्यांचे रोपण करण्यात त्याला रस होता. वेली आणि फुले यांच्या मागे लपायला त्याला आवडे, आणि अगदी एखाद्या वेड्यागत झपाटल्यासारखे तो नृत्य करीत असे.

रॉबिनसन यांनी अफाट कष्ट घेऊन त्या बेटावर एक पद्धत व व्यवस्था प्रस्थापित केली होती. तिला फ्रायडे एक धोका होऊन बसतो. एकदा तो रॉबिनसन यांचा पाईप घेऊन ओढत बसला असताना, त्या अवस्थेत रॉबिनसन त्याला पकडतात. त्यामुळे फ्रायडे भयभीत होतो,

घाबराघुबरा होतो, आणि त्या गोंधळलेल्या अवस्थेत त्याने तो पाईप्र एका स्फोटकांच्या पेटीवर टाकल्याकारणाने स्फोट होऊन रॉबिनसन यांनी त्या बेटावर जे जे काही उभे केलेले असते, त्याचा नाश होतो. या स्फोटात टेन कुत्राही मृत्यू पावतो. मेंढरे सर्वत्र विखुरली जातात. रॉबिनसन यांची स्वत: राहाण्याची गुहा कोसळून पडते. थोडक्यात या स्फोटामुळे रॉबिनसन यांचा त्यांच्या स्वत:च्या युरोपीय इंग्लिश संस्कृतीबरोबर असलेला अखेरचा दुवा निखळून पडतो. त्यांना एक नव्या पद्धतीने आता जीवन व्यतीत करण्यास सामोरे जावे लागते. हे असे होणार आहे, व आपणास एका नव्या पद्धतीचे जीवन जगावे लागेल, हे असे का कोणास ठाऊक त्यांना वाटतच होते !

स्फोटानंतरच्या नव्या जीवनात आता फ्रायडे हा त्यांचा मार्गदर्शक बनतो. कोठच्याही कृतीचा आरंभ तो करतो. रॉबिनसन नेतृत्व गमावून बसलेले असतात. फ्रायडेला खेळ, नाच व हास्य याच गोष्टींबद्दल आस्था असते व त्यांच्याशीच आपल्याला कर्तव्य आहे असे तो मानतो. भविष्याबद्दल कसलीही चिंता न करता, तो वर्तमानकाळातच जगतो. रॉबिनसन यांनी आपल्या जीवनाचा प्रत्येक क्षण आनंदात कसा घालवावा, कल्पांत कसा शोधावा, याचे शिक्षण तो त्यांना देतो. फ्रायडे याच्या दृष्टीने आपले स्वत:चे शरीर हे सर्वप्रथम अशा महत्त्वाचे असते. रॉबिनसन यांनी आपले नग्न शरीर सूर्यप्रकाशात नाहून काढावे, यासाठी फ्रायडे त्यांना प्रोत्साहन देतो. कालांतराने रॉबिनसन हे सूर्यदेवतेचे पूजक बनतात.

तब्बल अठ्ठावीस वर्षानंतर या बेटावर अडकून पडलेल्या लोकांना सोडविण्यासाठी एक जहाज येते. सर्वात गमतीची गोष्ट ही होती की रॉबिनसन ते बेट सोडून जाण्यास नाकारतात. या उलट फ्रायडे त्या जहाजाबरोबर निघून जातो. तथापि त्या बेटावर पुन्हा एकदा एकाकीपणे जीवन घालविण्याचा आनंद रॉबिनसन यांच्या नशिबी नसतो. त्यांना एका नव्याच व्यक्तीचा सहवास मिळणार होता. त्या जहाजावर एक मुलगा नोकरीला होता. तो त्या जहाजावर होत असलेल्या आपल्या छळाला कंटाळून त्या जहाजावरून आपली सुटका करून घेऊन पळ काढतो व तो या बेटावर दाखल होतो. एस्पेरनाझ बेटाचा हा नवा रहिवाशी. तो आता रॉबिनसन यांचा नवा सहकारी ...... तो फ्रायडेची जागा घेणार होता -----

---

मैत्रीचा आरंभ करण्याच्या दृष्टीने हास्य अजिबात वाईट नाही. आणि मैत्रीची इतिश्री करण्यासाठी हास्य हे सर्वोत्तम. –. **ऑस्कर वाईल्ड**

---

मी एक रानटी मनुष्य आहे, याचे कारण कोणालाही मी समजत नाही. परंतु मी असे शोध प्रकल्प पूर्णत्वास नेले आहेत की ते अनेक विद्वानांना रोखून धरतील.

– **अव्हिरिस्ट गालोई,** प्रख्यात गणिती

---

जुना मित्र हाच उत्तम आरसा. – **जुनी म्हण**

# साहित्य आणि संशोधन

## स्वयंप्रकाशी ताऱ्यांचे शोधनाट्य

**– नाना जोशी**

मि. जेम्स बॉसवेल ऑचिनलेक स्कॉटलंड यांना आयुष्यभर कीर्ती या एकाच गोष्टीची सर्वात अधिक आवश्यकता भासत असे. ते कालांतराने डॉ. जॉनसन यांचे चरित्रकार म्हणून विश्वविख्यात झाले हे खरे. परंतु ही कीर्ती त्यांना आपल्याला डॉ. जॉनसन यांच्यामुळे प्राप्त झाली आहे असे वाटत असे. त्यांना आपल्या स्वत:च्या गुणांवर आधारित असलेल्या कीर्तीचा सदैव हव्यास होता. मद्यपान आणि त्यांना वश होणाऱ्या स्त्रिया यांनी त्यांचे अगदी तात्पुरतेच समाधान होत असे. या दोन्हीही गोष्टी त्यांना आपल्या आयुष्यात भरपूर प्रमाणात प्राप्त झालेल्या होत्या. पण त्यांना हवी होती ती स्वयंप्रकाशित कीर्ती! लोकांचे लक्ष आपणाकडे वेधून घ्यावे, यासाठी ते आयुष्यभर प्रयत्नशील होते. परंतु आपणात [illegible] कमी आहे, म्हणून लोक आपल्याकडे दुर्लक्ष करतात हा विचार त्यांचे मन सदैव कुरतडीत असे.

आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसात आपल्यातील कमतरतेबद्दल त्यांची खात्री पटली असावी. ते काय असेल ते असो, यावर मात करण्यासाठी ते अखेर खुळचट चाळे करीत. त्यातली काही उदाहरणे. स्ट्रॅटफर्ड येथे १७६९ साली शेक्सपिअरमहोत्सव चालू होता त्यावेळचा हा प्रसंग आहे. बॉसवेल यांनी कॉर्सिका या देशाला भेट दिल्यानंतर, लिहिलेले प्रवासवर्णन चांगलेच गाजले होते. त्या पुस्तकाचा लेखक जेम्स बॉसवेल तो मीच हे लोकांस ठाऊक व्हावे यासाठी आपल्या हॅटवर कॉर्सिका बॉसवेल हा फलक लावून ते स्ट्रॅटफर्डच्या रस्त्यारस्त्यातून फिरत होते. जेम्स बॉसवेल यांनी प्रख्यात तत्त्वज्ञ जॉनांकस रूसो यांस लिहिलेल्या पत्रात आपण चांगले नकलाकार आहोत असे लिहिले होते. ड्रुअरी लेन नाट्यगृहात जमलेल्या प्रेक्षकांची करमणूक व्हावी (आणि स्त:स प्रसिद्धी मिळावी) या हेतूने, गाईचे हंबरणे, त्याच्या जोडीला फारच सुमारपणे इतर प्राण्यांचे आवाज काढून दाखविण्याचाही प्रयोग त्यांनी केला. एका गुन्हेगाराला फाशी देण्याच्या प्रसंगी, ते प्रेत वाहून नेणाऱ्या गाडीच्या टपावर उभे राहून आपल्याकडे लोकांचे लक्ष जावे म्हणून त्यांनी खटपट केली. लंडनच्या उपनगरात एकदा फेरफटका केल्यानंतर, एका शेण वाहून नेणाऱ्या गाडीच्या टपावर सगळ्यांच्या नजरेत आपण येऊ अशा प्रकारे बसून ते लंडन शहरात आले. अशा प्रकारे आपण किती चक्रम आहोत (निदान त्या मार्गाने तरी कीर्ती प्राप्त होऊ दे) हेच त्यांना



अनुक्रमणिका

जणू सिद्ध करावयाचे होते.

परंतु या अशा प्रकारच्या खुळचट चाळ्यांनी जेम्स बॉसवेल यांना कीर्तीची प्राप्ती झाली नाही. या उलट ते चांगलेच कुप्रसिद्ध झाले. त्या क्षणापुरते का होईना, हेही नसे थोडके असेच होते. प्रख्यात लेखक ऑस्कर वाईल्ड म्हणत असे त्याप्रमाणे विस्मरणात जाण्यापेक्षा लोकांनी शिव्या देण्याकरता का होईना आपले नाव घ्यावे. एवंच या खुळचट चाळ्यांच्या मदतीने बॉसवेस हे सतत लोकांच्या नजरेसमोर आणि आठवणीत होते. परंतु आपल्यानंतर येणाऱ्या अथांग भविष्यकाळात आपले स्मरण लोकांना सतत होत राहावे, या एकाच उद्दिष्टावर बॉसवेल यांनी आपले लक्ष केंद्रित केले होते, आणि केवळ हाच एक हेतू मनात ठेऊन त्यांनी डॉ. जॉनसन यांचा सहवास आपणास प्राप्त व्हावा यासाठी प्रचंड खटपट केली. त्यासाठी ते सतत प्रयत्नशील होते. बॉसवेल हे तसे एक नाणावलेले वकील (मग मेकॉले यांचा पूर्वग्रह त्यांना काहीही सांगो) होते. याचे स्मरण कोणालाही एखादे वेळ होणार नाही. तसेच एक निबंधकार, प्रवासवर्णन लेखक आणि वेळप्रसंगी काव्य करणारा लेखक यातल्या कोठच्याही कारणासाठी आजकाल त्यांची आठवण कोणालाही होणार नाही.

'लाईफ ऑफ़ जॉनसन' (जॉनसन यांचे चरित्र) हा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यांनतर लॉर्ड मेकॉलेने सांगितल्याप्रमाणे एकवेळ इंग्रजी भाषा जाईल पण हा चरित्रग्रंथ मागे राहील. इतका तो अजरामर आहे. त्याचे नाव कधीही विसरले जाणार नाही हे नक्की आहे. परंतु नियतीला अनेक प्रकारे चकविता येते आणि बॉसवेल यांनी नियतीला ज्या प्रकारे फसविले ती पद्धत आपणा सर्वांना फारच पसंत पडेल अशी आहे. त्याची किंमत त्यांना किती मोजावी लागली हे नीटनेटकेपणे व सारांश रूपाने लॉर्ड मेकॉले यांनी सांगितले, यांची जाणीवही आपणास होते. इंग्रजी भाषेतील हा मोठ्यात मोठा चरित्रकार,इतिहासातील सर्व मूर्खात अत्यंत मूर्ख माणूस होता, या लॉर्ड मेकॉले यांनी वाचकांचे लक्ष वेधलेल्या प्रसिद्ध विरोधभासात, तो सारांश शब्दरूप झालेला आहे.

तथापि 'लाईफ ऑफ जॉनसन' वाचणाऱ्या कोणत्याही वाचकास जेम्स बॉसवेल हे विशुद्ध कीर्तीसाठी किती आसुसलेले होते हे स्पष्ट होईल. आपण लिहिलेल्या चरित्रग्रंथांनी चरित्र नायकाच्या, कोणावरही छाप पडेल अशा व्यक्तिमत्त्वामुळे आपणास कीर्ती प्राप्त होता नये असे त्यांना वाटत होते. याउलट आपल्या स्वत:च्या व्यक्तित्वात लोकांनी रस घ्यावा व त्यातून आपणास लौकिक प्राप्त व्हावा अशी त्यांची इच्छा होती. आपण बडेजावीत रस असलेली एक मूर्ख व्यक्ती आहोत म्हणून आपणास कीर्ती प्राप्त व्हावी, असेही त्यांना वाटत नव्हते. काहीही झाले तरी आपण मि. जेम्स बॉसवेल म्हणून आपले स्मरण केले जावे असे त्यांना वाटत होते. आदरभाव– कुप्रसिद्धी नाही– तोही कायम स्वरूपाचा, तोही आपल्या स्वत:च्या कर्तृत्वाने व स्वत:च्या गुणांच्या जोरावर मिळाला तर तो त्यांना हवा होता. यदाकदाचित 'लाईफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथाच्या सर्व प्रती या पृथ्वीतलावावरून

नाहीशा झाल्या, तरी अठराव्या शतकातील इंग्लंडमधील ऐतिहासिक दस्तऐवजात जेम्स बॉसवेल यांना स्थान असले पाहिजे, ते सुद्धा ज्या स्थानाला कसलेही आव्हान मिळणार नाही, अशा प्रकारचे असले पाहिजे ही त्यांची इच्छा होती.

लॉर्ड मेकॉले यांची जेम्स बॉसवेल यांच्यासंबंधीची विधाने केवळ कल्पना व पूर्वग्रह यांच्यावर आधारलेली होती. त्यांना वस्तुस्थितीचा आधार नव्हता हे बॉसवेल यांच्या दुर्दैवाने कालांतराने सिद्ध झाले. त्यासाठी अनेक घटना घडण्याची आवश्यकता होती. ते काहीही असो लॉड मेकॉले यांचे लिखाण काही दशके तरी लोकप्रिय होते. त्या काळात बॉसवेल यांच्याकडे जगाने नेमके कोठच्या दृष्टीने पाहावे हे मेकॉले यांनी दाखवून दिले होते. एक शतकभर तरी लॉर्ड मेकॉले यांचे मूल्यमापन व अंदाज या दोन्हीबद्दल (फारच थोड्या) वाचकांनी कसलीही शंका व्यक्त केली नव्हती. म्हणून आपणास एक कल्पनाचित्र रेखाटता येईल. बॉसवेल यांची जागा नरकातच (Purgatory) राखून ठेवलेली असणार, कारण स्त्री- सुख प्राप्त करून घेण्यासाठी त्यांनी जी पापे केली होती त्यामुळे त्यांची रवानगी त्या ठिकाणीच होणे क्रमप्राप्त होते. नरकातल्या त्या राखीव जागेवरून हा चरित्रकार आपल्याला ओरडून सांगत होता. एबनी (एक प्रकारचे लाकूड) मेजाच्या कप्प्यात- (एबनी मेजाच्या कप्प्यात) पाहा- कारण नेमके त्याच ठिकाणी खरे बॉसवेल "वस्ती" करून होते. त्या ठिकाणी जर कोणी पाहावयाचे श्रम घेतले असते तर त्या ठिकाणी बॉसवेल यांनी लौकिक प्राप्त व्हावा, आणि व्यक्ती म्हणून त्यांना स्थान जरूर आहे हे सिद्ध करणारे साहित्य या शोधकाच्या हाती पडले असते. निदान जेम्स बॉसवेल हे मृत्यू पावण्यापूर्वी त्यांनी त्या मेजाच्या कप्प्यात अत्यंत प्रेमाने व काळजीपूर्वक आपले साहित्यिक जगातील स्थान पक्के करणारे साहित्य ठेवले होते हे नक्की.

जेम्स बॉसवेल हे इ. स. १७९९ साली मरण पावले. त्यांच्या मृत्युपत्रात एका विशिष्ट एबनी मेजातील कप्प्याबद्दल खास तरतूद केलेली आढळते. हे एबनी- कप्पा असलेले मेज, त्यांच्या पणजीकडून त्यांना वारसाहक्काने आलेली 'परंपरागत- वस्तू' होती. ती बॉसवेल यांच्या एडिंबर्ग या शहराजवळील ऑचिनलेक या गावातील परंपरागत घरात बॉसवेल जिवंत होते तोपर्यंत होती. ही ऐतिहासिक अशी 'परंपरागत- कौटुंबिक- वस्तू' आपल्या कुटुंबातच राहावी यासाठी त्यांनी आपल्या मृत्युपत्रात तरतूद करून ठेवली होती. जो कोणी या ऐतिहासिक अशा परंपरागत कौटुंबिक वस्तूपासून फारकत करून घेईल, त्याला यासाठी एक हजार पौंड एवढी जबरदस्त किंमत मोजावी लागली असती.

घरातल्या एकंदर फर्निचरपैकी फक्त एका वस्तूसंबंधी त्यांना एवढी काळजी का बरे असावी? हा प्रश्न साहजिकच उपस्थित होईल. त्याचे उत्तर अर्थातच असे संभवते की परंपरागतपणे चालत आलेल्या अनेक वस्तूंपैकी ती एक होती. बॉसवेल यांना आपले प्राचीन घराणे, परंपरा व त्या सर्वांसंबंधी वाटत असलेला प्रचंड अभिमान विलक्षण होता. त्याहीपेक्षा

आणखी एक अधिक महत्त्वाचे कारण होते. त्या एबनी मेजाच्या कप्प्यात बॉसवेल यांचे अत्यंत महत्त्वाचे कागदपत्र होते. हे कागदपत्र कधी काळी जर जगाच्या नजरेस पडले तर मग आपणास कोणी विसरणार नाही, ही जी बॉसवेल यांची स्वत:च्या कर्तृत्वाबद्दल श्रद्धा होती, ती अस्थानी नव्हती हे सिद्ध झाले असते. स्कॉटलंडमधील मॅगपाय हा पक्षी वस्तू जमा करून त्या साठवून ठेवण्यासाठी प्रसिद्ध आहे. त्या पक्ष्याप्रमाणेच बॉसवेल यांनी आपल्या दैनंदिन आयुष्याबद्दलच्या नोंदी अनेक वर्षेपर्यंत अत्यंत काळजीपूर्वक जतन करून ठेवल्या होत्या. त्या नोंदवह्यांची व्याप्ती किती मोठी आहे, आणि त्या कशा प्रकारच्या आहेत, याबद्दल त्यांच्याशिवाय कोणाला काहीच माहिती नव्हती. परंतु आपल्या 'लाईफ ऑफ जॉनसन' या ग्रंथात आपल्या दप्तरखान्याबद्दल आडवळणाने त्यांनी उल्लेख केलेला आढळतो. परंतु ती त्यांची नेहमीचीच आत्मप्रौढी होती असेच कोणाला वाटले असते. ते काहीही असो. एक गोष्ट उघड होती. ऑचिनलेक येथील 'दप्तरखान्यात' डॉ. जॉनसन यांना गेलेली आणि त्यांच्याकडून बॉसवेलना आलेली अनेक पत्रे होती. हे विधान आपणास करता येते याचे कारण त्या पत्रातली अनेक उतारे 'लाईफ ऑफ जॉनसन' या ग्रंथात उद्धृत करण्यात आले होते. या सर्व शक्यतांबरोबर आणखीही अनेक शक्यता होत्या. डॉ. जॉनसन यांचे चरित्र अगदी तपशीलवार सांगता यावे, म्हणून बॉसवेल यांनी केलेली शेकडो टिपणे व टाचणे त्यात असण्याचाही संभव होता. बोल्ट कोर्ट, स्ट्रथम आणि स्कॉटलंडमधील भन्नाट वाऱ्यांनी भरलेल्या दऱ्याखोऱ्यातून हिंडताना, डॉ. जॉनसन यांच्याबरोबर झालेल्या संभाषणांची नोंदही, त्या दप्तरखान्यात असणे शक्य होते. त्या मंतरलेल्या दोन दिवसांच्या घटनांची टांचणेही त्यात सापडली असती.

बॉसवेल यांची धूर्त नजर अजूनही भविष्यकाळावर खिळलेली होती. त्या एबनी– मेजाच्या कप्प्यात साठविलेल्या त्या अमाप कागदपत्रांचे काय करावयाचे यासंबंधी बॉसवेल यांनी आपल्या मृत्युपत्रात तपशीलवार व बारीकसारीक गोष्टींचा खुलासा देऊन मार्गदर्शन केलेले होते. त्यांच्या तीन मित्रांना– रेव्हरंड विल्यम जॉनसन टेंपल, सर विल्यम फोरबस आणि एडमंड मालोन– आपल्या मृत्युपत्रातील सूचना कार्यवाहीत आणण्यासाठी त्यांनी मुक्रर केले होते. या तिघांनी या दप्तरखान्यातील कागदपत्रांची छाननी करावयाची व त्यांना त्यातले जे भाग योग्य वाटतील ते त्यांनी प्रसिद्ध करावयाचे होते. बॉसवेल यांचे वाङ्मयीन साहित्य त्यांनी जे आपल्यामागे ठेवले होते त्याची तपासणी व प्रसिद्धी करण्यासाठी नेमलेल्या व्यक्ती ह्या नात्याने , त्या मित्रांनी ही कामगिरी पार पाडावयाची होती. आपल्या मृत्यूनंतर लोकांनी आपली आठवण ठेवावी यासाठी यापेक्षा अधिक खात्रीलायक असे कोणाला काही करता आले असते का?

परंतु बॉसवेल यांचे खाजगी कागदपत्र वाचण्याबद्दलची लोकांची इच्छा काही वर्षे पुरी झाली नाही. बॉसवेल यांचा या बाबतीतला अंदाज अवाजवी होता. एखादे वेळी त्यांच्या

पिढीतल्या लोकांना त्या खाजगी पत्रासंबंधी उत्सुकता असेलही. पण त्यांच्यानंतर आलेल्या पिढीत तेवढी उत्सुकता नव्हती. बॉसवेल यांनी आपल्या मृत्युपत्रात मुक्रर केलेल्या व्यक्तींनी बॉसवेल यांच्या दप्तरखान्याचा अत्यंत काळजीपूर्वक धांडोळा घेतला, हे आपणास ठाऊक आहे. पण हे काम संपते न संपते तोच थोड्या दिवसात त्यातला एकजण मृत्यू पावला. दुसऱ्या दोघांनी पुढील कारवाई करण्यासाठी आणखी थोडा काळ जाऊ द्यावा असे ठरविले. बॉसवेल यांचा दोन क्रमांकाचा मुलगा वयात आल्यानंतर, त्या कागदपत्रांना प्रसिद्धी द्यावी असे ठरले. हा असा निर्णय त्यांनी घेतला याला एक कारण होते. हे कागदपत्र प्रसिद्ध झाल्यानंतर त्यातून जी मिळकत होईल ती या मुलास मिळावी असे बॉसवेल यांनी मृत्युपत्रात नमूद करून ठेवले होते. यानंतर या दप्तरखान्यातील कागदपत्र संपादण्यासाठी, अथवा ते छापण्यासाठी आणखी प्रयत्न झाले नाहीत. या कागदपत्रात काय लिहिलेले होते, ते त्या तीन मित्रांनाच माहीत होते. ते त्यांनी कोणालाच कधीही सांगितले नाही. त्यामुळे ते लिखाण अगदी गुपितच राहिले. एकंदर परिस्थिती अशी होती की हे गुपित उघड व्हावे असे कोणालाच वाटत नव्हते. याचे कारण लॉर्ड मेकॉले यांनी 'एडिंबर्ग रिव्ह्यू' या नियतकालिकात लिहिलेला डॉ. जॉन्सन यांच्यावरचा लेख. त्यातील बॉसवेल यांच्यासंबंधीचा मजकूर असा होता, ज्या शब्दांचे प्रतिध्वनी शतकभर उमटतच होते.

लॉर्ड मेकॉले यांनी जेम्स बॉसवेल यांच्यासंबंधी पुढील मजकूर लिहिला होता. "डॉ. जॉनसन यांचे एक मंडळ होते. इतिहासात या मंडळाला चांगलीच प्रसिद्धी प्राप्त झाली. या मंडळात असलेले लोक चांगले नामवंत होते. त्यात एक सभासद असे होते की त्यांच्यामुळे ह्या मंडळाला नाव व कीर्ती प्राप्त झाली. असे असले तरी, या सभासदाबद्दल, त्या मंडळातील इतर बहुसंख्य सभासदांचे मत चांगले नव्हते व त्याच्याबद्दल त्या सर्वांच्या मनात आदरही नव्हता. या सभासदाला या मंडळाचे सभासदत्व प्राप्त करून घेऊन त्यात सामील होण्यासाठी म्हणूनच फार कष्ट पडले होते. या इतरांना तो तितकासा हवा असा वाटत नव्हता. अशा या सभासदाचे नाव जेम्स बॉसवेल. हे एक तरुण स्कॉट वकील होते. स्कॉटलंडमधल्या मोठ्या नामवंत खानदानी घराण्यात त्यांचा जन्म झाला होता व ते तसे चांगलेच सुखवस्तू होते. त्यांच्याशी ज्यांचा ज्यांचा परिचय होता त्या सर्वांना बॉसवेल हे कमकुवत स्वभावाचे, पुढेपुढे करणारे, दाखवेगिरीत पटाईत, चौकस, भांडकुदळ, रटाळ संभाषण करणारे, बोअर असे गृहस्थ होते, हे ठाऊक होते.

बॉसवेल यांच्याकडे कसलाही युक्तिवाद नसे, त्यांना चमकदार संभाषण करता येत नव्हते. नर्म विनोदाचे त्यांना वावडे होते. बोलण्यात स्पष्टता नव्हती. हे त्यांचे सारे अवगुण त्यांच्या लिखाणावरून स्पष्टच आहेत. असे असूनही त्यांचे लिखाण अमेरिकेतील मिसीसिपी राज्यापासून तो उत्तरेच्या सीमेवरच्या अखेरच्या गावापर्यंत आणि इतरत्रही मोठ्या आवडीने वाचले जाते. इतकेच नव्हे तर जोवर इंग्रजी ही जिवंत भाषा असेल आणि यदाकदाचित

तिला मृत भाषेचा दर्जा प्राप्त झाला, तरी जेम्स बॉसवेल यांचे लिखाण वाचले जाईलच, याबद्दल माझी खात्री आहे. बॉसवेल हे प्रकृतीने गुलामीवृत्तीचे व व्यक्तिपूजक होते. त्यांचे मन, वनस्पतीशास्त्रात ज्या वेलींना बांडगुळे म्हणतात, त्या वेलीसारखे होते. ताठ वृक्षाभोवती, बांडगुळे स्वत: लपेटून घेतात,त्या ताकदवान वृक्षातून जीवनरस शोषून घेतात, तसेच बॉसवेल यांचे होते. आपल्यापेक्षा बलवान व्यक्तीला चिकटल्याशिवाय त्यांचे भागतच नसे. त्यांच्या दृष्टीने एका भाग्यवानक्षणी ते डॉ. जॉनसन यांना चिकटले. ही जोडी तशी विजोडच होती. बॉसवेल यांचा देश स्कॉटलंड. त्या देशाबद्दल डॉ. जॉनसन यांचे अनेक पूर्वग्रह होते. डॉ. जॉनसन हे चौफेर वाचन करणारे व प्रगाढ ज्ञानी होते. डॉ. जॉनसन हे तसे झटकन रागावत. या अशा डॉ. जॉनसनना बॉसवेल यांची आत्मप्रौढी, मूर्खपणा व व्यक्तिपूजा यांचा त्रास झाला नसता तरच नवल![१] एखाद्या माशीची कानाजवळ सतत भुणभूण असण्यासारखाच बॉसवेल यांचा सहवास आहे, असे डॉ. जॉनसन यांस वाटले असेल. डॉ. जॉनसन यांस, त्यांना कोणी प्रश्न विचारलेले आवडत नसत. परंतु बॉसवेल त्यांची सर्व विषयांवरच सातत्याने उलट तपासणी करीत असत. काही वेळा "महाराज, आपणास एका बालकाबरोबर, एखाद्या मनोऱ्यात कोंडून ठेवले तर आपण काय कराल?" यासारखे आचरट प्रश्न बॉसवेल डॉ. जॉनसनना विचारीत. डॉ. जॉनसन पाणी पिऊन तहान भागविणारे, याउलट, बॉसवेल हे मद्य ढोसणारे मद्यपी. नेहमीच दारू पिऊन तर्र होणाऱ्या मद्यप्यांपेक्षा जरा बरे एवढेच. या अशा दोन भिन्न प्रकृतीच्या मित्रात, उत्तम सुसंवाद असणेच अशक्य होते. तसे प्रत्यक्षात काही वेळा घडले की डॉ. जॉनसन या थोर माणसाला जरूर राग येई. मग ते बॉसवेल यांना जे काही सुनावत, ते बॉसवेल यांना अजिबात पसंत नसे. त्यानंतर अनेक तासच, ती नापसंती त्यांच्या मनात घर करून असे. हे असे होते तरी प्रत्यक्षात, प्रत्येक भांडण काही काळ गेल्यानंतर विरे, व पुन्हा एकदा दिलजमाई होई. त्या दोघांच्या वीस वर्षांच्या सहवासात बॉसवेल हा शिष्य, आपल्या गुरूला सदैव पूज्यच मानत असे. डॉ. जॉनसन हे गुरू, आपल्या शिष्याची नेहमीच कानउघाडणी करीत, त्याच्यावरचा रागही व्यक्त करीत आणि प्रेमही करीत.

हे दोघेही मित्र दैनंदिन जीवनात एकमेकांपासून फारच दूर अंतरावर राहात. बॉसवेल आपली वकिली, स्कॉटलंडमधील एडिंबर्ग या शहरातील पार्लमेंट हाऊस या इमारतीत करीत. ते अधूनमधून लंडनला भेट देत. या लंडनभेटीत, डॉ. जॉनसन यांचे निरीक्षण करणे, हा बॉसवेल यांचा प्रमुख व्यवसाय होता. हे निरीक्षण करताना, डॉ. जॉनसन यांच्या काही सवयी व लकबी असतील त्यांचा शोध घेणे, ज्या कोठच्या विषयावर, डॉ. जॉनसन काहीतरी व लक्षणीय बोलतील अशा विषयाकडे संभाषणाचा ओघ वळविणे आणि त्यानंतर डॉ. जॉनसन जे काही बोलले असतील, त्याची नोंद भल्या मोठ्या नोंदवह्यात घेऊन, त्या वह्या या नोंदींनी भरून टाकणे, हाच बॉसवेल यांचा लंडनभेटीतील प्रमुख उद्योग होता. या अशा

प्रकारे, जमा केलेल्या साहित्यातून, या कालखंडानंतरच्या जगात, जो ग्रंथ अत्यंत वाचनीय ठरला, अशा चरित्रग्रंथाची निर्मिती झाली होती.

एवंच व्हिक्टोरिया राणीच्या प्रजाजनांच्या मते, बॉसवेल यांचे व्यक्तित्व घृणास्पद असेल, त्यांची बुद्धी बेतावाताची असेल, हे सगळे असूनही काहीतरी करून त्यांनी एक महत्त्वाचा चरित्रग्रंथ लिहिला होता. अशा या लेखकाबद्दल आणखी काही ज्ञान झाले नाही तर त्याबद्दल फारसा खेद करावा असे त्यांना वाटत नव्हते. त्या चरित्रग्रंथाबद्दल बॉसवेल यांचे सदैव ऋणी राहिले म्हणजे झाले.

साहित्यजगतातील एखाद्या व्यक्तीबद्दल जे जे काही शक्य असेल, त्याचा आपण शोध घेतला पाहिजे आणि त्याच्याविषयी जी काही माहिती उपलब्ध असेल ती आपणास ठाऊक असलीच पाहिजे, असे मानणारे काही साहित्यप्रेमी लोक असतात. हे लोक आपल्या आवडत्या लेखकासंबंधी जी जी काही माहिती मिळेल त्याचा शोध सातत्याने घेत असतात. तसेच त्यांचे कुतूहल कायम जागृत असते. या पंथातील लोकांना, बॉसवेल यांची वागणूक आणि नैतिकता या दोन्हीशी काहीही कर्तव्य नव्हते. त्यांना बॉसवेल यांच्याविषयी तपास घ्यायचा होता. बॉसवेल यांनी आपले स्वत:चे जे शब्दचित्र रेखाटले आहे तसेच ते होते. 'लाईफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथात हे शब्दचित्र अविश्वसनीय ठरेल अशा चातुर्याने रेखाटलेले आहे. ते (बॉसवेल) "क्षुद्रमनाचे, दाखवेगिरी, बडेजावी करणारे, कमकुवत मनाचे, लांगूलचालन करणारे, स्वत:चे दु:ख कुरवाळण्याची हौस असलेले, लोकभ्रमावर श्रद्धा ठेवणारे, चौकस, चोरून संभाषणे ऐकणारे, निर्लज्ज." ..इत्यादी इत्यादी होते. या सर्व अवगुणांबद्दल मान्यता असली तरी एक प्रश्न राहातोच. ते यापेक्षा अधिक काहीही नव्हते का? बॉसवेल यांचे हे आत्मनिवेदन व आत्मपरीक्षण हे तसे अगदी सर्व गोष्टी विचारात घेऊन केल्यासारखे भासते. पण या सर्व वर्णनातून, त्या व्यक्तीचे प्रत्यक्षातील व खरोखरीच्या व्यक्तित्वाचे संपूर्ण चित्र आपल्या हाती येते का? बॉसवेल यांच्या व्यक्तित्वाची आणखीही एक बाजू असण्याची शक्यता, त्यांच्या खाजगी कागदपत्रात आविष्कृत झाली असावी. यासाठीच त्यांनी, भविष्यकाळावर नजर ठेऊन, आपली खाजगी पत्रे, टांचणे, नोंदवह्या इत्यादी लिखित साहित्य, त्या एबनी मेजाच्या खणात कुलुपबंद केलेले होते का?

या प्रकारचे विचार, त्या काळातील अनेक साहित्यप्रेमी व्यक्तींच्या मनात होते. दुसरीकडे त्याचवेळी, त्या एबनी– मेज– कप्प्याचे कोडे, दुसऱ्याही अनेक साहित्यप्रेमी व्यक्तींच्या मनात सदैव रुंजी घालत होते. विशेषत: जॉनसनयुगासंबंधी अधिक माहिती झाली पाहिजे ही इच्छा बाळगणाऱ्यांच्या मनात ह्या कोड्याची उकल व्हावी, असेच होते. परंतु या अशा विचारांच्या सर्व लोकांना, बॉसवेल कुटुंबातील लोकांनी, ऑचिनलेक या गावातील, त्या एबनी मेजातील कप्प्यांना अजिबात हात लावू दिला नाही. या काळात, बॉसवेल यांच्या कुटुंबात फक्त स्त्रियाच विद्यमान होत्या. त्या सर्व काटेकोर व ठोकळेबाज अशा व्हिक्टोरियन

शिस्तीत लहानाच्या मोठ्या झालेल्या होत्या. लॉर्ड मेकॉले यांची बॉसवेल यांच्याविषयी जी मते होती, त्यांच्याशी सर्व जग सहमत आहे, हे बॉसवेल कुटुंबीयातल्या (प्रामुख्याने स्त्रिया) सर्वजणांना, माहीत होते. बॉसवेल कुटुंबातील या स्त्रियांना आपल्या बॉसवेल या परंपरागत उमरावी नावाला, कमीपणा आणणाऱ्या कुटुंबीयांबद्दल लोकांना अधिक काही माहिती होऊ नये हे चांगले, असे वाटले असल्यास त्यात नवल नाही. म्हणूनच बॉसवेल घराण्याचा इतिहास या दृष्टिकोनातून पाहाता, जेम्स बॉसवेल हा अध्याय निकालात निघालेला होता. मग ते जेम्स बॉसवेल, डॉ. जॉनसन यांचे स्नेही असोत वा नसोत. त्या शतकाच्या आरंभीच्या काळात, जेम्स बॉसवेल यांचे कागदपत्र जाळण्यात आले होते ही अफवा तत्कालीन वाङ्मयीन जगतात प्रचलित होती. बॉसवेल कुटुंबीयांतील स्त्रियांनी या अफवांचा प्रतिवाद केला नाही. थोडक्यात, जगाच्या दृष्टीने, तो कप्पा तसा रिकामाच आहे ही समजूत पक्की झाली.

बॉसवेल यांचे कागदपत्र, मग त्यात काहीही माहिती असो, ते अस्तित्वातच नाहीत अशी त्या काळी तरी भावना होती. वेश्यागमन करणारी, आत्मप्रौढीत मशगूल असलेली एक व्यक्ती म्हणजे बॉसवेल, त्यांनी कोणत्याही कारणाने, कसातरी, एक महान ग्रंथ लिहिण्याची चूक केली होती. जेम्स बॉसवेल – जेथे 'कोठे' त्यावेळी होते – त्यांना आपले स्मरण एवढ्याचसाठी होते आहे यावर समाधान मानावे लागले असते. त्याकाळी डॉ. जॉनसन भक्तांचा पंथ एकसारखा वाढतच होता. या सर्व जॉनसनभक्तांना, आपल्या दैवताचे चरित्र लिहिणाऱ्या व्यक्तीसंबंधी अधिक माहिती करून घेण्याची इच्छा होती. ते स्वाभाविकच होते.

बॉसवेल यांनी 'लाइफ ऑफ जॉनसन' लिहिताना, जमा केलेल्या माहितीपैकी ज्या माहितीचा वापर केला नाही ती बॉसवेल यांच्या कागदपत्रात असण्याचा संभव होता. या महत्त्वाच्या माहितीपासून अनेक वर्षे लोकांना वंचित राहावे लागले. डॉ. जॉनसन यांच्या पंथाबरोबरच लहानसा का होईना पण एक बॉसवेलपंथही तयार झाला होता. तसा हा पंथ जगावेगळाच. आपल्यातील त्रुटी व कमकुवतपणा यासंबंधी जो मनुष्य इतक्या मोकळेपणानें व उघडपणे लिहितो, त्यांच्यावर या पंथातील व्यक्तींचे मनापासून प्रेम होते. हे प्रेम का होते, याचे स्पष्टीकरण देता येणार नाही. हे सारे विचार त्या बॉसवेलभक्तांच्या मनात अनिवार्यपणे येत असत. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरच्या इंग्लंडमधल्या परिस्थितीचे हे चित्र आहे.

एक म्हण आहे. येणाऱ्या घटनांची छाया विद्यमान घटनांवर पडते. या म्हणीत काही तथ्य असलेच तर त्याचा पडताळा फ्रान्समधील बुलोन्य स्यूर मेर (BOULOGNE- SUR-MER) या छोट्या शहरात १८५० साली एका दिवशी आला. यादिवशी ईस्ट इंडिया कंपनीत नोकरी करणारा मेजर स्टोन नावाचा एक अधिकारी त्या शहरातील एका दुकानात गेला. त्यांनी त्यादिवशी दुकानात जाऊन मोठीच कामगिरी केली. त्याव्यतिरिक्त या मेजरचे नाव कोणत्याही कामगिरीसाठी इतिहासात नमूद झालेले नाही. बारीकसारीक खरेदी

करण्याकरता, त्या शहरातील एका दुकानात ते गेले होते. खरेदी संपवून, ते राहात होते त्या निवासात परतल्यानंतर, त्यांनी जी वस्तू खरेदी करून आणली होती तिच्या वेष्टनासाठी वापरलेला कागद,– हा एका जुन्या पद्धतीच्या इंग्लिशमध्ये लिहिलेल्या पत्राचा एक भाग होता– चौकसपणे (या चौकसपणामागे कोठचाही हेतू नव्हता) त्यांनी या पत्राच्या तळाशी असलेल्या स्वाक्षरीकडे नजर टाकली. ती स्वाक्षरी पाहिल्याबरोबर त्यांनी ती स्वाक्षरी लगेच ओळखली. वाङ्मयीन संस्कृतीशी थोडाबहुत परिचय असलेल्या प्रत्येक इंग्लिश व्यक्तीला परिचित असलेली ती स्वाक्षरी होती. जेम्स बॉसवेल यांची ती स्वाक्षरी होती.

या मेजरचे आपण एका गोष्टीसाठी सदैव ऋणी राहिले पाहिजे. त्यांनी ताबडतोब तो वेष्टनाचा कागद कोठून आला याचा शोध घेतला. बुलोन्य या शहराला एका भटक्या भंगार–सामान– वस्तू खरेदी विक्री करणाराची फेरी असे. वर्षातून एकदा किंवा दोनदा तो येई. त्या शहरातील दुकानांना त्याच्याकडे जो भंगारमाल असे, त्यातले त्यांना जे हवे असेल, ते तो भटका व्यापारी पुरवीत असे. या मेजरच्या आणि इंग्लिश भाषिकांच्या सुदैवाने या बुलोन्यमधील दुकानदाराने खरेदी केलेली रद्दी, त्याने अजून फारशी वापरली नव्हती. त्या दुकानदाराने विकत घेतलेल्या रद्दीतच त्या मेजरला वाङ्मयीन खाणीचा शोध लागला. पैशाची बोलणी होऊन, त्या रद्दीची खरेदी झाली. अशा रीतीने बॉसवेल यांनी आपला अत्यंत जिवलग मित्र रेव्हरंड विल्यम टेंपल यांना लिहिलेल्या अनेक पत्रांचे मेजर स्टोन हे मालक बनले.

हा बॉसवेल–टेंपल पत्रव्यवहार फ्रान्समधल्या बुलोन्य या छोट्या शहरातील एका दुकानात जाऊन कसा पोचला, यासंबंधीचे स्पष्टीकरण अगदी साधे व सरळ आहे. टेंपल यांना एक कन्या होती, तिचे नाव ॲन. तिने चार्लस् पॉवलेट (POWLETT) नावाच्या एका पाद्रीशी लग्न केले होते. या दोघांनी काही कारणांनी इ. स. १८२५ साली इंग्लंड सोडले व बुलोन्य या शहरापासून फारच थोड्या किलोमीटर अंतरावर असलेल्या दुसऱ्या एका शहरात ते स्थाईक झाले. येथवरचा कथाभाग अगदी निश्चित व स्पष्ट आहे. या नंतरच थोडीशी अनिश्चितता आहे. याचे कारण या जोडप्याने फ्रान्समध्ये आल्यानंतर काय केले हेच अनिश्चित आहे. याबद्दल फक्त अंदाज बांधता येतात. या जोडप्यापैकी जे कोणी मागे राहिले असेल त्या व्यक्तीने हे कागदपत्र विकले असतील, अथवा घराची साफसफाई करताना जी रद्दी फेकून दिली जाते त्यात हे कागदपत्र असतील. खाजगी स्वरूपाचा दस्तऐवज असला आणि ता कुटुंबाला नकोसा झाला म्हणजे मग तो रद्दी म्हणून विकला जातो. खाजगी स्वरूपाचे दस्तऐवज बऱ्याच वेळा अचानकपणे प्रकाशात येतात ते याच प्रकारे, असा आपला आजवरचा अनुभव आहे. तो भंगार सामान खरेदी करणारा व्यापारी पॉवलेट यांच्या घराजवळून जात असतेवेळीच पॉवलेट यांनी हे कागदपत्र विकावयास काढले असावेत. त्या भंगार व्यापाऱ्याने ती रद्दी खरेदी केली आणि थोड्याच दिवसांनी बुलोन्य येथे विकून टाकली.

इ. स. १८५६ च्या उत्तरार्धात बॉसवेल– टेंपल पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला. बॉसवेल यांच्या मृत्यूनंतर, लोकांच्या ज्ञानात त्यांच्यासंबंधी प्रथमच महत्त्वाची भर पडत होती. हा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाल्यानंतर, त्याच्या खरेपणाबद्दल अनेकांनी शंका घेतली, कारण त्याकाळी इंग्लंडमध्ये बनावट पत्रे तयार करणारे अनेक लोक होते. इ. स. १८५०–५१ च्या सुमारास प्रख्यात इंग्लिश कवी शेली यांच्या पंचवीस बनावट पत्रांचे प्रकरण चांगलेच गाजले होते. ते इंग्लिश वाङ्मयात कुप्रसिद्ध आहे. त्यावेळी शेली यांच्या बनावट पत्रांचे पुस्तक प्रसिद्ध होण्याचे घाटत होते व त्यासाठी कवी ब्राउनिंग यांनी प्रस्तावनाही लिहिली होती. परंतु बॉसवेल–टेंपल पत्रव्यवहार अस्सल आहे, हे दोन कारणांनी सिद्ध झाले. एकतर त्या पत्रांची प्रकृती ही बॉसवेलछाप होती, याबद्दल कोणालाही शंका नव्हती. दुसरे त्या पत्रातून ज्या घटना नमूद करण्यात आल्या होत्या, त्या प्रत्यक्षात घटलेल्या घटना होत्या हे अगोदरच सिद्ध झाले होते. थोडक्यात अंतर्गत पुराव्यावरून ती पत्रे अस्सल आहेत याबद्दल एकवाक्यता होती.

परंतु या पत्रातला मजकूर काही असा नव्हता की बॉसवेल यांचे बाकीचे कागदपत्र-पत्रव्यवहार नष्ट झाल्याबद्दल लोकांनी शोक करावा. ही पत्रे प्रकाशित करण्यापूर्वी त्यातला मजकूर फार मोठ्या प्रमाणात गाळण्यात आला होता, हे जरी खरे असले तरी त्या पत्रातल्या मजकुरावरून लॉर्ड मेकॉले यांनी बॉसवेल यांचे केलेले मूल्यमापन किती यथार्थ होते हेच सिद्ध होत होते. बॉसवेल यांनी आपल्या पत्रातून टेंपल यांना विशेषत: दोन गोष्टींची वारंवार कबुली दिलेली आहे. एक ते असाधारण असे बाहेरख्याली होते. हा त्यांचा बाहेरख्यालीपणा तसा निमित्तमात्र नव्हता. त्या दुर्गुणात ते सतत गुरफटलेले असत. शिवाय वेश्यांच्या निवडीबाबतही त्यांना कसलाही विधिनिषेध नव्हता. व्हिक्टोरियन काळातील लोकांनी, या अशा व्यक्तीला आपल्या घरात प्रवेशच दिला नसता. हा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाल्यानंतर थोडा काळ बॉसवेल यांच्यासंबंधी कुतूहल जागृत झाले हे खरे. परंतु बॉसवेल यांची प्रतिमा व त्यांची प्रसिद्ध जशी पूर्वी होती तशीच राहिली. त्यात फारसा फरक पडला नाही. टेंपल यांना बॉसवेल यांनी लिहिलेली पत्रे प्रकाशित झाल्याचा एक प्रमुख परिणाम झाला. तो म्हणजे बॉसवेल कुटुंबीयांनी ऑचिनलेक वाड्याचे दरवाजे सर्वच संशोधकांना कायमचे बंद करून टाकले. मग एखाद्या चुकार संशोधकाची अवस्था काय होत असेल याची कल्पनाच न केलेली बरी. जॉर्ज बर्कबेल हिल् हे 'लाईफ ऑफ जॉनसन' या ग्रंथाच्या संशोधित आवृत्तीचे महान संपादक. त्यांच्या संपादित आवृत्तीत भरपूर टीपा आहेत. त्या टीपा त्यांच्या साक्षेपी संशोधनाची साक्ष आहेत. हा महान संशोधक बॉसवेल यांची पत्रे प्रसिद्ध झाल्यानंतर वीस वर्षांनी ऑचिनलेक येथे स्वत: गेला. त्याला घरात प्रवेश मिळाला नाहीच; त्यांना पाहाताच वाड्याचा दरवाजा खाडकन लावून घेण्यात आला.

२

बॉसवेल यांच्या ऑचिनलेक घरातील शेवटचा वारस १९०५ साली मृत्यू पावला. फारच थोड्यांना ही बातमी ठाऊक होती. त्याहीपेक्षा फारच थोड्या लोकांना त्या बातमीचे महत्त्व ध्यानात आले होते. आता जेम्स बॉसवेल यांच्या हयात असलेल्या एकमेव पुरुष वारसाकडे सर्व मालमत्ता गेली. त्यांचे नाव लॉर्ड तालबोट ड मालाहिड. जेम्स बॉसवेल यांचे हे फार दूरचे नातू होते. ते डब्लीन शहराजवळ मालाहिड कॅसल या ठिकाणी राहात असत. त्या ठिकाणी बॉसवेल कुटुंबीयांच्या सर्व वस्तू नेण्यात आल्या. त्यात ते एबनी टेबलही असावे. परंतु ग्रंथजगतास या घटनेबद्दल काहीही सांगण्यात आले नव्हते.

बॉसवेल यांच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने पहिले पाऊल सतरा वर्षांनंतर एका अमेरिकन अभ्यासकाने टाकले. त्यांच्या मते बॉसवेल हे स्वतंत्र वाङ्मयीन अभ्यासाला योग्य अशी व्यक्ती होते, व तशा प्रकारचा अभ्यास होणे -विशेषत: मानसशास्त्रीय स्वरूपाचा- आवश्यक आहे, असंही त्यांचे मत होते. या अभ्यासकाचे नाव चोन्से ब्रुस्टर टिंकर (CHAUNCEY BREWSTER TINKERE). ते येल या प्रख्यात विद्यापीठात प्राध्यापक म्हणून काम करीत होते. त्यांनी आपल्या 'यंग बॉसवेल' या ग्रंथात पुढील प्रतिपादन केले आहे. लॉर्ड मेकॉले यांनी बॉसवेल यांचे जे मूल्यमापन केले होते त्याचा प्रभाव प्रचंड आहे हे खरे परंतु लॉर्ड मेकॉले यांनी बॉसवेल यांच्या व्यक्तित्वाबद्दल, त्यांच्या स्वभावाबद्दल केलेला निवाडा हा बरोबर असलाच पाहिजे असे नाही. अर्थात बॉसवेल यांच्याकडे घृणेने न पाहाता त्यांच्याकडे सहानुभूतीने पाहिले, तर लॉर्ड मेकॉले यांचा निष्कर्ष चुकीचा आहे असे आढळून येईल. बॉसवेल यांची डॉ. जॉनसन यांच्याबरोबर आता जगतविख्यात ठरलेली मैत्री विकसित होण्याअगोदरच्या तरुण बॉसवेलवर अभ्यासकाने लक्ष केंद्रित केले, तर लॉर्ड मेकॉले यांचे मत चुकीचे होते हे लगेच लक्षात येईल. प्रा. टिंकर यांनी असंही दाखवून दिले की डॉ. जॉनसनंसारख्या प्रसिद्ध विद्वान माणसाबरोबर बॉसवेल यांचे जे संबंध होते, तेवढ्याचसाठी त्यांच्याकडे लक्ष द्यावे असे नाही. बॉसवेल यांच्याकडे लक्ष देण्यास त्या व्यतिरिक्त दुसरीही अनेक कारणे आहेत. ती कारणे जमेस धरता बॉसवेल यांच्याकडे लक्ष वेधले जाईल असेच ते व्यक्तिमत्त्व होते हे पटेल.

प्रा. टिंकर यांनी आपले प्रतिपादन सातत्याने चालूच ठेवले होते. अर्थात त्याच्या कक्षा अधिक विस्तारित झाल्या होत्या. इ. स. १९२४ साली बॉसवेल यांच्या खाजगी पत्रांचे दोन खंडात प्रकाशन झाले. बॉसवेल यांच्या पत्राचे ते पहिले-वहिले पुस्तक. त्याचे संपादन प्रा. टिंकर यांनीच केले होते. या प्रकाशनातला सर्वात अधिक सनसनाटी निर्माण करणारा भाग कोठचा असेल, तर ही सर्व पत्रे काहीही गाळसाळ न करता जशीच्या तशी प्रकाशित होत होती. टेंपल यांना लिहिलेल्या पत्रातील बराचसा मजकूर, तो व्हिक्टोरिया राणीच्या काळातील लोकांच्या प्रकृतीला न मानवणारा व न झेपणारा होता, म्हणून तो गाळण्यात आला होता.

आता ती सर्व पत्रे बॉसवेल यांनी लिहिली होती तशीच प्रकाशित झाली होती. बॉसवेल यांच्या पत्रांचे महत्त्व आणखी एका कारणाकरता आहे; कारण त्याचे परिणाम दूरगामी स्वरूपाचे होते. बॉसवेल यांचा बाहेरख्यालीपणा किती पराकोटीला गेलेला होता, याचे अगदी तपशीलवार वर्णन या पत्रांतून आहे. त्याचा 'प्रभाव' अर्थातच वाचकांवर पडतो. परंतु त्या पत्रातून आणखीही एक गोष्ट सिद्ध होते. ही पत्रे प्रकाशित होईपर्यंत 'लाईफ ऑफ जॉनसन' मध्ये बॉसवेल यांच्या व्यक्तित्वाचा जो भाग होता, तो लोकांना ठाऊक नव्हता. बॉसवेल यांनी खुद्द स्वतःबद्दल 'लाईफ ऑफ जॉनसन' मध्ये तसे फारसे लिहिलेले नाही. बॉसवेल यांनी आपल्या मित्रांना लिहिलेल्या पत्रांतून त्यांच्या व्यक्तित्वातील याच पैलूंवर प्रकाश पडला होता. अनेक वेळा त्यांनी केलेले आत्मताडन, त्यांच्या धार्मिक श्रद्धा व समजुती या दोन्हीतून निर्माण झालेले प्रश्न, त्यांना वारंवार येणारे खिन्नतेचे झटके, त्यांनी केलेले प्रामाणिक निश्चय आणि त्या बरोबरच्या अत्युच्च अपेक्षा, या सर्वांमुळे बॉसवेल यांचे आयुष्य नैतिक स्वरूपाच्या छाया- प्रकाशांनी व्यापलेले होते. या पत्रांच्या प्रकाशनामुळे एक गोष्ट स्पष्ट झाली होती. बॉसवेल हे डॉ. जॉनसन यांचे खुषमस्करे नव्हते. ते आपल्या स्वतःच्या आयुष्याकडे गंभीरपणे पाहाणारे, तपशीलात जाऊन आत्मसंशोधन करणारे व्यक्तित्व होते. कधीकधी ते इतक्या तपशीलात शिरत की- आत्मसंशोधन करणे ही त्यांची विकृतीच वाटावी.

तोवर, बॉसवेल यांची जी पत्रे उपलब्ध होती, त्यावरून प्राध्यापक टिंकर यांनी असे सिद्ध केले होते की बॉसवेल या व्यक्तीकडे सर्वस्वी नव्या दृष्टिकोनातून पाहून त्यांचे साहित्यजगतातील स्थान ठरविण्याच्या दृष्टीने तो पुरावा पुरेसा आहे. खरे म्हणजे, आधुनिक वाङ्मयीन अभ्यासकाच्या दृष्टीने, त्या पत्रांच्या प्रकाशनानंतर, बॉसवेल या नाट्याला सुरुवात झाली होती. आजवर जी पत्रे उपलब्ध आहेत असं समजले जात होते, त्या पत्रांचा संग्रह करून, आणि मग त्यांचे काळजीपूर्वक परिशीलन करून, तोवर ज्याची कोणालाही कल्पना नव्हती असे बॉसवेल यांचे दर्शन वाचकास झाले होते. असे जर होते, तर बॉसवेल यांच्या कागदपत्रांची प्रचंड दप्तरे, जर अस्तित्वात असली तर, त्यांच्यापासून कितीतरी अधिक ज्ञान होईल. बॉसवेल यांनी आपल्या खाजगी पत्रातून, आपले जीवन खुलेपणाने व्यक्त केले होते, हे सर्व वाचकांना ज्ञातच होते. म्हणूनच या वाचकांचे असे म्हणणे होते की, इतर प्रसिद्ध झालेल्या पत्रांपेक्षाही अधिक खाजगी अशा पत्रातून त्यांनी कोणती खाजगी कबुली दिली असेल. अशीही कल्पना करता येते की, त्यांनी यदाकदाचित रोजनिशी ठेवलीच असती तर त्यात ते आपल्या जीवनासंबंधी अधिक मोकळेपणे लिहिणारच. परंतु एबनी टेबलाच्या कप्प्यातील कागदपत्र नष्ट करण्यात आले आहेत, ही परंपरागत समजूत होती. ती अर्थातच जशीच्या तशीच सर्वांच्या- याचा अर्थ या अशा प्रकारच्या संशोधनात ज्यांना रस असतो त्या सर्वांच्या- मनात कायम घर करून होती. परंतु या परंपरागत समजुतीला धक्का देणारा एक

प्रसंग घडला. त्याचे असे झाले. न्यूयॉर्क शहरातील पिरपाँ मॉर्गन हस्तलिखित विभागात संशोधनाचे काम करीत प्रा. टिंकर बसले होते. त्यांना मालोन यांनी लिहिलेले एक पत्र आढळले. मालोन हे बॉसवेल यांचे फारच जवळचे मित्र होते. त्यांनी बॉसवेलना 'लाईफ ऑफ जॉनसन' ची मुद्रणप्रत तयार करण्याच्या कामात खूप मदत केलेली होती. शिवाय बॉसवेल यांनी मृत्युपत्रात नमूद केलेल्या गोष्टीनुसार कार्यवाही व्हावी म्हणून बॉसवेल यांनी त्यांना मुक्रर केले होते. मालोन यांनी बॉसवेल यांच्या कन्येला लिहिलेले एक पत्र, शोधता शोधता, प्रा. टिंकर यांच्या हाती आले. ते पत्र लिहिले होते त्यावेळी ऑचिनलेक येथे बॉसवेल यांची कितीतरी कागदपत्रे आहेत, बॉसवेल यांच्या मृत्युपत्रात नमूद करण्यात आलेल्या इच्छेची परिपूर्ती आणखी काही दिवस पुढे ढकलावी असा निर्णय घेण्यात आला आहे," असे त्या पत्रात मालोन यांनी लिहिले होते. या पत्रावर तारीख होती १८०९ काळातील. बॉसवेल यांचे कागदपत्र नष्ट करण्यात आले आहेत, ही अफवा गावात आणि वृत्तपत्रात या तारखेअगोदर किमान दोन वर्षे पसरविण्यात आली होती.

हा एक आशेचा किरण होता. एक बारकासा का होईना, पण एक दुवा हाती आला होता. हा दुवा तसा निर्णायक नव्हता, तसे असले तरी तो सूचक खास होता. त्यामुळे हे सिद्ध झाले की 'जेम्स बॉसवेल यांचे कागदपत्र नष्ट करण्यात आले होते ही आता जुनाट झालेली अफवा, निदान पहिल्या दोन वर्षापुरती तरी नुसती अफवाच होती. परंतु तरीही संशय कायम होताच. जेम्स बॉसवेल हा आपला मूळ पुरुष, ज्याला काहीही पोच नाही असा आणि अर्वाच्य होता, असे त्याच्या वंशजांचे मत असल्याकारणाने, त्यांनी ते कागदपत्र, दोन वर्षानंतर, कधीतरी नष्ट केले असण्याचा संभव होता. कदाचित ती कृती त्यांनी लॉर्ड मेकॉले यांनी हल्ला चढविल्यानंतर अथवा बॉसवेल यांनी टेंपलना लिहिलेली पत्रे प्रसिद्ध झाल्यानंतर, केली असण्याचीही शक्यता होती. फार प्राचीन अशा बॉसवेल घराण्याची प्रतिष्ठा व मान, जो काही अजूनही शिल्लक होता, त्याचे जतन करण्यासाठी काहोही अथवा काहीतरी करणे आवश्यक होते. ते काहीही असो, बॉसवेल वंशजांना आपल्या घराण्याची परंपरा टिकवून धरण्यापलीकडे त्यात अधिक काहीही नव्हते. त्या एबनी टेबलाच्या खणातील कागदपत्र अजून अस्तित्वात होते की नाही, या प्रश्नाचा एकदाचा सोक्षमोक्ष लावता येणार नव्हता का ?

या पुढची घटना, एखाद्या गुप्तपोलिसी चातुर्यकथेत शोभण्यासारखी आहे. प्रा. टिंकर आपले संशोधन पद्धतशीरपणे करीत होते. कागदपत्रांचा शोध घेत असताना त्यांनी आयर्लंडमधील वृत्तपत्रात जाहिरात दिली. त्या जाहिरातीला उत्तर म्हणून अनेक पत्रे आली. त्यात एक गूढ पत्र होते. त्या पत्राखाली कोणाचीही स्वाक्षरी नव्हती. त्या पत्रलेखकाने प्रा. टिंकर यांना असा सल्ला दिला की त्यांनी मालाहिड कॅसल या स्थानाचा विचार करावा. प्रा. टिंकर यांना हे ठाऊक होते की, बॉसवेल यांच्या वस्तू–यात सर्व कागदपत्र, दस्तऐवजही

आले-इ. स. १९०५ साली त्या ठिकाणी हलविण्यात आल्या होत्या. त्यांनी त्या पत्रलेखकाची सूचना विचारात घेऊन एक पत्र लिहिले. ते पत्र, वाटाघाटी, बोलणी, चौकशी कशी करावी याचा अत्यंत आदर्श असा नमुना होते. हे पत्र त्यांनी सध्या जे गृहस्थ लॉर्ड तालबोट होते त्याना लिहिलेले होते. लॉर्ड तालबोट यांनी एक त्रोटक आणि संदिग्ध अशी चिठ्ठी उत्तरादाखल पाठविली, आणि त्या ठिकाणी शोध घेण्याचा मार्ग तात्पुरता तरी बंद झाला.

परंतु या दरम्यानच्या काळात इंग्लंडमधील वाङ्मयीन वर्तुळात एक अफवा पसरली होती. या अफवेनुसार कोणीतरी मालाहिड कॅसल या ठिकाणी प्रत्यक्ष गेला होता आणि त्या एबनी टेबलाच्या कप्प्यातील ते मौल्यवान कागदपत्र स्वत: पाहिले होते. होता होता ही अफवा विलमार्थ एस. लेविस (WILMARTH S. LEWIS) यांच्या कानावर गेली. विलमार्थ हे प्रकांड पंडित होते. ही अफवा त्यांच्या कानावर गेली तेव्हा ते होरेस वॉलपोल यांच्या पत्रांच्या महान 'येल' आवृत्तीचे संपादन करीत होते. सुदैवाने विलमार्थ हे प्रा. टिंकर यांचे विद्यार्थी होते. त्यांनी या संबंधात प्रा. टिंकर यांना निरोप पाठवला. मग प्रा. टिंकर यांनी असे ठरविले की, आपण स्वत:च आयर्लंडची सफर करणे, हाच एकमेव मार्ग आहे.

इ. स. १९२५ च्या अमेरिकन उन्हाळ्यात, त्यांनी प्रस्थान ठेवले. ते स्वत: मालाहिड कॅसल या ठिकाणी हजर झाले. ब्रिटनमधील प्राचीन अशी ही इमारत. सुदैवाने त्यावेळी, त्यात कोणीतरी प्रत्यक्षात राहात होते. थोड्याच दिवसात कल्पनारम्य असे नाट्य ज्या ठिकाणी घडणार होते त्यास योग्य अशी ती पार्श्वभूमी होती. प्रा. टिंकर यांना त्या प्राचीन व आदरणीय अशा वास्तूत प्रवेश देण्यात आला. लॉर्ड तालबोट यांनी कसलेही आढेवेढे न घेता कबूल केले की आपल्याकडे बॉसवेल यांचे कागदपत्र आहेत व त्यांची संख्याही चांगली प्रचंड आहे. प्रत्यक्षात तोवर चांगलीच प्रसिद्धी पावलेले एबनी टेबल त्यांनी प्रा. टिंकर यांना दाखविले. अजूनही त्यात बॉसवेल यांचे कागदपत्र होते. प्रा. टिंकर यांनी बॉसवेल यांच्या संबंधीच अनेक वर्षे संशोधन केले असल्याकारणाने, त्यांना त्या कागदपत्रात काय असेल याची कल्पना होती. त्यांनी लॉर्ड तालबोट यांना काही विशिष्ट हस्तलिखितांबद्दल विचारले, कारण त्यांना खात्री होती की ते बॉसवेल-कागदपत्रात असलेच पाहिजेत. लॉर्ड तालबोट यांनी मोठ्या अदबीने व तत्परतेने ती हस्तलिखिते त्या कागदपत्रातून काढून प्रा. टिंकर यांच्यासमोर हजर केली आणि त्यांची तपासणी करण्यास परवानगी दिली.

एक मुद्दा प्रथमच स्पष्ट झाला. प्रा. टिंकर यांना हा शोध लागला की बॉसवेल यांचे कागदपत्र नष्ट करण्यात आले आहेत ही नुसती अफवाच होती. त्यात तथ्याचा अंशही नव्हता. याउलट ते सर्व कागदपत्र अस्तित्वात आहेत. शिवाय, पूर्वी कोणीही कल्पना केली नसेल इतकी या कागदपत्रांची संख्या प्रचंड होती. त्यांनी लॉर्ड तालबोट यांना असे सुचविले की, "हा कागद- पत्र खजिना व्यवस्थितपणे लावला जावा यासाठी व्यवस्था व्हावी म्हणून काही योजना करणे आवश्यक आहे. तसेच या प्रचंड कागदपत्रांचे चांगले संशोधन व्हावे यासाठी

काही व्यवस्था करावयास हवी.'' यावर लॉर्ड तालबोट यांनी सरळ उत्तर दिले नाही. त्यांनी आढेवेढे घेतले. अनेक अडचणी उपस्थित केल्या. थोडक्यात प्रा. टिंकर यांना अमेरिकेला रिकाम्या हाती परतावे लागले. ते इतक्या तातडीने परतले याचा आणखीही एक कारण होते. ते म्हणजे विद्यापीठाचे १९२५-२६ चे नवे वर्ष थोडक्याच दिवसांनी सुरू होणार होते. हे असे जरी झाले, तरी या आयर्लंडभेटीचा एक फायदा झाला होता. प्रा. टिंकर यांनी कोणालाही- यात ते स्वत:ही आले- कल्पना नव्हती अशा डोळे दिपवून टाकील अशा खजिन्याचे निसटते का होईना पण प्रत्यक्ष दर्शन घेतले होते. ते रिकाम्या हाताने परतले, हा मुद्दा या विवेचनात प्रस्तुत नाही.

हे सारे जरी होते तरीही या व्यवहारात आणखी एक पेचप्रसंग निर्माण झाला. त्यातून बाहेर पडण्यासाठी कोणालाही त्यावेळी तरी मार्ग दिसत नव्हता. नेमक्या याच वेळी जेम्स बॉसवेल आणि त्यांचे चहाते या दोघांनाही सुखदायी ठरणाऱ्या आणखी एका व्यक्तीने या जेम्स बॉसवेलनाट्यात प्रवेश केला. न्यूयॉर्क शहरात त्यावेळी एक प्रख्यात धनाढ्य गृहस्थ होते. ते वाङ्मयीन प्रकल्पांना नेहमीच मदत करीत. महत्त्वाचा मुद्दा हा की डॉ. जॉनसन यांच्या संबंधी जे जे काही असेल, ते आपल्याजवळ असलेच पाहिजे, या विचाराशी ते अगदी पराकोटीचे कटिबद्ध होते. या गृहस्थांचे नाव लेफ्टनंट कर्नल राल्फ हेवार्ड इशाम! यांच्या कानावर प्रा. टिंकर यांचे अनुभव आले. त्यांनी ताबडतोब निर्णय घेतला की आपण मालाहिड कॅसल या वास्तूला मोर्चे लावावयाचे, आणि आपणाला जी वस्तू- बॉसवेल कागदपत्र- हस्तगत करावयाची आहे, ती ताब्यात घ्यायची. इ. स. १९२०- ३० च्या मध्यावरती इंग्लंडमध्ये जी आर्थिक परिस्थिती होती तिने इशाम यांना हात दिला. इंग्लंडमध्ये त्या काळी प्राप्तीकर हा सगळ्यांना चांगलाच जाणवेल इतका जाचक होता. त्याचा परिणाम इंग्लंडमधल्या अनेक नामवंत जुन्या घराण्यांची आर्थिक परिस्थिती खालावण्यात आला होता. नेमके त्याचवेळी अमेरिकेत वॉल स्ट्रीटवर शेअर मार्केट तेजीत होते. बॉसवेल यांच्या-बद्दलची आत्मीयता आणि उत्तम आर्थिक परिस्थिती ही दोन 'हत्यारे' घेऊन लेफ्टनंट-कर्नल राल्फ हेवार्ड इशाम इ. स. १९२६ सालच्या जुलै महिन्यात मालाहिड कॅसल येथे येऊन दाखल झाले. त्यांची मोर्चेबंदी यशस्वी झाली. मालाहिडहून निघताना त्या भेटीची आठवण म्हणून, गोल्डस्मिथ यांनी बॉसवेलना लिहिलेले एक महत्त्वाचे पत्र त्यांना भेट म्हणून देण्यात आले. शिवाय लॉर्ड तालबोट बोलणी करावयास तयार आहेत असेही त्यास आढळून आले. ही बोलणी व वाटाघाटी चांगल्या दीड वर्षे चालू होत्या. या एवढ्या प्रदीर्घ वाटाघाटीनंतर इशाम यशस्वी झाले व ते मालाहिडहून आपल्याबरोबर बॉसवेल यांच्या कागदपत्रांपैकी बहुतेक कागदपत्र घेऊन परतले. बाकी राहिलेले कागदपत्र पुढच्या आठ महिन्यात त्यांच्या पाठोपाठ न्यूयॉर्कला पाठविण्यात आले होते.

आजवर ज्या बॉसवेल लिखाणाचे अजिवात संशोधन झाले नव्हते,असे सुमारे दहा लाख

शब्द असलेले लिखाण विकत घेण्यात कर्नल इशाम यशस्वी ठरले होते. बॉसवेल हे आपल्या स्वत:च्या लिखाणाचा दप्तरखाना अगदी परिपूर्ण आहे, अशी बढाई मारीत असत. परंतु ते कागदपत्र जपून ठेवण्याच्या बाबतीत किती कष्ट व काळजी घेत असत याबद्दल कोणालाच काहीही ठाऊक नव्हते. तसा संशयही कोणाला कधीही आला नव्हता. बॉसवेल यांनी ज्या कोणाला पत्रे लिहिली होती, त्यांची स्थळप्रत नकलून त्यांनी आपल्या दप्तरखान्यात ठेवली होती. हे काम त्यांनी फारच इमानदारीने केले होते. उच्चपदस्थ व प्रसिद्ध माणसांशी आपला परिचय व्हावा यासाठी आपल्या आयुष्यातील अनेक वर्षे त्यांनी खर्ची घातलेली होती.

या प्रदीर्घ कालखंडात त्यांनी अनेक नामवंतांना जी पत्रे पाठविली होती, त्याच्या प्रतीही त्यांनी जपून ठेवल्या होत्या. तसेच त्यांना डॉ. जॉनसन यांच्या वर्तुळात जे नामवंत भेटले होते, त्यांचीही पत्रे त्यांच्या संग्रहात होती. या कागदपत्रांपेक्षाही आश्चर्याचा मोठा धक्का देणाऱ्या आणखीही काही गोष्टी त्या कागदपत्रात होत्या. असे आढळून आले की, त्यांनी तीस वर्षांपेक्षा अधिक काळ रोजनिशी ठेवली होती. या रोजनिशीत त्यांच्या अगदी वैयक्तिक व खाजगी गोष्टींची व विचारांची नोंद होतीच. याशिवाय त्या वर्तुळात जे अनेक नामवंत होते त्यांच्या भेटीचीही नोंद त्या ठिकाणी होती. या सगळ्या नोंदींपेक्षाही आणखी काही महत्त्वाच्या नोंदी त्या रोजनिशीत होत्या. बॉसवेल यांनी आपल्या अंतर्मनातील अत्यंत गुंतागुंतीच्या विचारांची व भावनांची कमालीच्या परखडपणे व मोकळेपणाने नोंद घेतलेली होती. एवंच रा. रा. जेम्स बॉसवेल हे सर्वांना या रोजनिशीतून अगदी परिपूर्णपणे आणि वास्तव स्वरूपात पाहावयास मिळतात.

परंतु या एबनी टेबलाचे कप्पे उघडल्यानंतर हा प्रदीर्घ काळ चाललेला व गूढ असा विषय तेथेच संपला नाही. पूर्वीच्या एका कोड्याची जागा आता दुसऱ्याच एका कोड्याने घेतली होती. बॉसवेल आपले स्वत:चे कागदपत्र, दस्तऐवज कसा ठेवीत याबद्दल त्या टेबलात सापडलेल्या कागदपत्रांच्या अनुषंगाने आपल्याला ज्ञान झाले आहे. या ज्ञानाच्या प्रकाशात त्या कागदपत्रांकडे पाहिले असता, त्या कप्प्यात अपेक्षेनुसार काही कागदपत्रे होतीच, पण याशिवाय आणखी बरेच कागदपत्र होते. ते त्या कप्प्यात सापडले नाहीत. सापडलेल्या या कागदपत्रात बॉसवेल यांची नोंदवही होती. हे घबाड हाती येईल असे कोणाला स्वप्नातही वाटले नव्हते. या उलट या कागदपत्रात जे कागदपत्र सापडतील अशी अपेक्षा होती ते मात्र त्यात नव्हते. उदा, जॉनसन यांनी बॉसवेलना लिहिलेली पत्रे त्या कागदपत्रात नव्हती. लाईफ ऑफ जॉनसन या चरित्रग्रंथात विल्कस आणि गॅरिक यांना फार महत्त्वाचे स्थान आहे. त्या दोघांचे एकही पत्र त्या कागदपत्रात नव्हते. ही पत्रे नाहीशी का बरे झाली असतील? यदाकदाचित ती अस्तित्वात असली,तर ती आता कोठे असतील?

डॉ. जॉनसन – बॉसवेल यांच्या मैत्रीची आठवण कायम ठेवणारी अमोल अशी आणखी

एक गोष्ट होती. तीही या कागदपत्रात नव्हती. परंतु त्याचे कारण दुर्दैवाने अगदी स्पष्ट होते. या कप्प्यात असलेल्या अनेक खोक्यातील एक खोका उघडला तेव्हा त्यात बरीचशी धूळ होती. त्या खोक्यात धुळीशिवाय. काही अर्धवट भुगा झालेली सोळा पाने होती. ही पाने, मागाहून लाईफ ऑफ जॉनसन या चरित्रग्रंथाच्या हस्तलिखिताची पाने आहेत असे ठरले. याचा अर्थ जे काही घडले असेल ते पुढे वर्णन केल्याप्रमाणे घडले असावे : ऑचिनलेक येथून मालाहिड येथे या हस्तलिखितांचे भले मोठे भेंडोळे या खोक्यातून आणले गेले असावे. या हस्तलिखिताला अनेक दशके, हवेतील दमटपणाचा चांगलाच्च सहवास घडला असावा. त्याचा परिणाम ते हस्तलिखित अगदी विसविशीत होण्यात झाला. हे हस्तलिखित त्यावेळी ऑचिनलेक येथून मालाहिडला आणण्यात आले, तेव्हा प्रवासात या खोक्याला धक्का बसला असेल आणि या हस्तलिखितातील कागदांचा भुगा झाला. जे थोडे कागद हाती आले ते त्या भेंडोळ्यात असलेल्या बाकीच्या कागदांचे काय झाले असेल याचे द्योतक होते. (आणि या संबंधी संशय घेण्यास कोणतेही कारण नव्हते.) याचा अर्थ 'लाइफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथाचे हस्तलिखित कायमचेच गमावले गेले होते.

हे हस्तलिखित गमावले गेले हे 'ज्ञान' हा प्रचंड धक्का होता. परंतु कर्नल इशाम यांच्या हाती जो खजिना पडला होता, त्याच्याशी तुलना करता, हे हस्तलिखित गमाविले जाणे ही जवळजवळ क्षुल्लक गोष्ट होती. कर्नल इशाम यांनी आपण हस्तगत केलेल्या कागपत्रांचे अगदी बारकाईने व काळजीपूर्वक संशोधन केले जाईल याची व्यवस्था केली होती. त्यांनतर त्यांनी हे सर्व कागदपत्र छापून घेतले. घसघशीत अठरा खंडांच्या मर्यादित प्रतींच्या आवृत्तीत या सर्व कागदपत्रांचे प्रकाशन झाले. अठराव्या शतकात ज्या प्रकारचा कागद वापरला जात असे, त्याच प्रकारच्या कागदपत्रावर बॉसवेल यांच्या या कागदपत्रांची छपाई करण्यात आली होती. अमेरिकेतल्या न्यूयॉर्क राज्यातील माउंट वेरनॉन येथील विल्यम एडविन. रजा यांच्या छापखान्यात त्यांनी हे खंड छापले होते. प्रत्येक खंडाची बांधणी चकचकीत अशा लाल रंगाच्या वेष्टनात! अत्यंत महत्त्वाचे असे जे कागदपत्र होते त्यांच्या प्रतिकृतींनी हे खंड ओतप्रोत भरलेले आहेत. या अशाप्रकारे छपाई व बांधणी झालेल्या ५७०/ (पाचशे सत्तर) संचाचे जे भाग्यवान धनी असतील त्यांना या खंडाच्या वाचनाने अपरिमित आनंद होईल. तोच आनंद ज्या ज्या वाचकांना भविष्यकाळात या संचाच्या प्रती वाचनासाठी उपलब्ध होतील त्यांनाही मिळेल. या आनंदात आता खंड पडणार नाही. जॉफ्रे स्कॉट (GEOFFREY SCOTT) यांनी या संबंधात केलेले भाष्य, हे अत्यंत उद्‌बोधक व महत्त्वाचे आहे. जॉफ्रे स्कॉट हे अमेरिकेत प्रकाशित झालेल्या या अठरा खंडातल्या पहिल्या चार खंडांचे संपादन करून ते छापखान्यातून बाहेर पडून वाचकांच्या हाती कसे पडतील, याबद्दल कार्यतत्पर असलेले प्रख्यात पंडीत. त्यांनी या अठरा खंडात वाचण्यास न मिळणाऱ्या कागदपत्रांची यादी केलेली आहे. ही यादी केल्यानंतर त्यांनी असे म्हटले होते की "या अठरा खंडात जे

कागदपत्र समाविष्ट करण्यात आलेले नाहीत, ते अस्तित्वात असतील हे असंभवनीय आहे. भविष्यकाळात त्यांचा शोध घेण्यासाठी ....अगदी चमत्कारिक ठिकाणीसुद्धा....कोणीही फारसा शोध घेऊ नये.'

हे शब्द इ. स. १९२८ काळातले. हे शब्द दिवास्वप्ने पाहाणाऱ्या व्यक्तीचे नव्हते. ते शब्द ज्याचे पाय या भूमीवर आहेत व जो कसल्याही भावनांच्या, पूर्वग्रहांच्या आहारी न जाता विचार करणाऱ्या एका थंड डोक्याच्या संशोधकाने अत्यंत विचारपूर्वक निर्णय घेऊन उच्चारलेले शब्द आहेत. हे सारे जरी खरे असले, तरी या व्युत्पन्न पंडिताची एका बाबतीत गफलत झाली होती. बॉसवेलकागदपत्र ही सर्वसामान्य चमत्काराच्या क्षेत्रात येणारी गोष्ट नव्हती; याचा पुरावा स्कॉट यांना लवकरच मिळाला. या संचातला शेवटचा खंड इ. स १९३४ साली प्रकाशित झाला. हे होण्याअगोदर ज्याची कल्पना करता येणार नाही अशा दोन घटना घडल्या होत्या. या घटनाही तशा अगदी नाट्यपूर्ण अशाच आहेत. एबनी टेबलातील कप्प्यातील कागदपत्राद्वारे, बाहेरच्या जगाचा बॉसवेल यांचं जे नाट्यपूर्ण दर्शन झाले तितक्याच त्या नाट्यपूर्ण आहेत.

इ. स. १९३० च्या एप्रिल महिन्यात एक महत्त्वाची घटना घडली. क्रोक्वे (CROQUET) नावाचा एक खेळ पाश्चिमात्य जगतात आणि इंग्लंडमध्येही सामान्यपणे उमरावी घरात खेळला जातो. या खेळाला क्रिकेटच्या खेळासारख्या यष्टी आणि चेंडू मारण्याकरता लाकडी हातोडे लागतात. या लाकडी हातोड्याला मॅलेट म्हणतात. या यष्टी व हे मॅलेट ठेवण्याकरता खास खोकी असतात. लॉर्ड तालबोट यांच्या प्रचंड वाड्यात, हा खेळ वाड्याभोवती असलेल्या हिरवळीवर खेळला जात असे. या क्रोक्वे खेळाचे सामान ठेवण्याकरता, तयार केलेला एक जुनापुराणा खोका लॉर्ड तालबोट यांच्या वाड्यात होता. तो वापरात नव्हता व अनेक वर्षे त्याला कोणी हातही लावला नव्हता. एक दिवस काही कारणाने तो उघडण्यात आला. या खोक्यात क्रोक्वे या खेळात वापरले जाणारे चेंडू , त्या खेळात लागणारे मॅलेटस, यष्टी या सामानाऐवजी बॉसवेल यांचे कागदपत्र होते! या कागदपत्रात, बॉसवेल यांच्या एका गाजलेल्या पुस्तकाचं मूळ हस्तलिखित सापडले. बॉसवेल यांच्या 'लाईफ ऑफ जॉनसन' या ग्रंथाच्या खालोखाल 'जर्नल ऑफ ए टुर टु दि हेब्राईडस विथ सॅम्युअल जॉनसन' (डॉ. जॉनसन यांच्याबरोबर हेबाईडस् या मुलखातून केलेल्या प्रवासाची नोंदवही) हे प्रवासवर्णन विख्यात आहे. या प्रवासवर्णनाचे ते हस्तलिखित होते.

सामान्य वाचकास डॉ. जॉनसन व बॉसवेल यांचा परिचय करून घेण्याच्या दृष्टीने 'लाईफ ऑफ जॉनसन' यांच्यापेक्षाही हे प्रवासवर्णन हे त्याबाबतीत कितीतरी अधिक उपयुक्त आहे. अधिक जिवंत व रसरशीत असे आठवणींनी ओतप्रोत भरलेले असे हे प्रवासवर्णन आहेच. त्याशिवाय त्यात आणखी अनेक गुण आहेत. 'लाईफ ऑफ जॉनसन' हा अत्यंत वाचनीय चरित्रग्रंथ आहे, असे शिक्कामोर्तब सगळ्या जगानेच केले आहे. हा



अनुक्रमणिका

चरित्रग्रंथ वाचनीय होण्यासाठी त्यात जे गुण असावयास हवेत ते गुण त्यात आहेत आणि ते सर्व गुण या प्रवासवर्णनातही साररूपाने आहेतच. तसे पाहायला गेले तर 'लाईफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथात अनेक पाने ढिसाळ मजकुराची आहेत. त्या प्रकारचे एक पानही या प्रवासवर्णनात नाही. 'लाईफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथाचे हस्तलिखित गमाविल्याचे जे अपार दुःख होते ते या प्रवासवर्णनाचा अचानक शोध लागून ते हाती आल्याकारणाने बऱ्याच प्रमाणात हलके झाले.

हे प्रवासवर्णन इ. स. १७८५ साली प्रसिद्ध झाले होते. हे प्रवासवर्णन निश्चितपणे 'आगाऊ' आहे. डॉ. जॉनसन व बॉसवेल या दोघांनी स्कॉटलंडमधील हायलंड या विभागातून १७७३ साली प्रेक्षणीय स्थळे व वनराजी पाहाण्याच्या उद्देशाने प्रवास केला होता. या प्रवासात डॉ. जॉनसंन व बॉसवेल यांचे स्थानिक लोकांनी जे रांगडे स्वागत केले त्याबद्दल बॉसवेल यांनी अगदी परखड शब्दात टिप्पणी केलेली आहे. बॉसवेल हे 'भोळे- भाबडे' म्हणून प्रसिद्ध होते. पण त्यांचा हा भोळे- भाबडेपणा इतक्या उघड व इतक्या प्रकर्षाने यापूर्वी व यानंतरही कधीही आढळून आला नाही. ते परखडपणाच्या बाबतीत, एवढ्या पराकोटीला गेले होते की, त्यामुळे दुखावलेल्या एका स्कॉटिश उमरावाने, त्यांना द्वंद्वयुद्धाचे आव्हान दिले. हा प्रसंग मोठ्या मिनतवारीने टळला. परंतु खरी गंमत आणखीनच वेगळी आहे. या क्रोक्वे खोक्यातील हस्तलिखित हे प्रत्यक्ष प्रकाशित झालेल्या प्रवासवर्णनापेक्षाही 'फारच आगाऊ' होते. ज्यांनी बॉसवेल यांचे हे मूळ हस्तलिखित वाचले होते, त्यांनी बॉसवेल यांना धोक्याची सूचना अगोदरच दिली होती. या सूचना लक्षात घेऊन बॉसवेल. यांनी मूळ हस्तलिखितातील अनेक परिच्छेदांचा विस्तार केला. तसेच सर्वच हस्तलिखित पुन्हा एकदा काळजीपूर्वक नजरेखाली घातले आणि मग त्यातल्या काही भागाला सरळ कात्री लावली. त्याचबरोबर अनेक व्यक्तींवर, त्यांच्या वागणुकीवर जी टीका- टिप्पणी केली होती, त्यांनी त्यात अनेक आमूलाग्र असे बदल केले. बॉसवेल यांच्या काळात, इंग्लंड हे तसे फारच कर्मठ होत चालल्याच्या प्राथमिक व अस्पष्ट खुणा दिसू लागल्या होत्या. हे सारे लक्षात घेऊन बॉसवेल यांनी काही बदल केले. त्यावेळी हयात असलेले उमराव, आपले नाव बॉसवेल यांनी घेतले व आपल्याविषयी त्यांनी जे काही लिहिले असेल, त्या कारणाने रागवणारच होते. हे त्यांचे रागावणे अजिबात चुकीचे नव्हते. तसे. ते रास्तच होते. या सर्वांविषयी, बॉसवेल यांना अगदी परिपूर्ण नसली, तरी थोडी कल्पना होतीच. म्हणूनच त्यांनी आपल्या मूळ हस्तलिखितात दुसरेही अनेक बदल केले.

या क्रोक्वे खोक्यात जे कागदपत्र होते, ते कर्नल इशाम यांनी हस्तगत केले. या विकत घेतलेल्या नव्या साहित्याची भर पूर्वी हस्तगत केलेल्या साहित्यात पडली. जॉफ्रे स्कॉट पूर्वीचे संपादक हे १९२९ साली मरण पावले. त्यांच्या जागी 'येल' विद्यापीठाला प्राध्यापक फ्रेडरिक ए पोट्टल यांची नेमणूक झाली होती. ते नामवंत प्राध्यापक असून शिवाय बॉसवेल

कालखंडावर अधिकारी व्यक्ती समजले जात होते. कर्नल इशाम यांनी हस्तगत केलेल्या 'जुन्या' व 'नव्या' बॉसवेलसाहित्याचे संपादन करण्याची जबाबदारी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली. प्रा. पोट्टल आणि त्यांचे सहकारी या सर्वांना हे कागदपत्र तपासताना आणखी अनेक नवे शोध लागले.

त्यापैकी एक असा होता की, बॉसवेल आपल्या मूळ हस्तलिखितातील अनेक परिच्छेद रद्दबादल ठरविण्यासंबंधी कमालीचे उत्सुक होते. या उत्सुकतेपोटी त्यांनी हे रद्दबादल ठरविलेले परिच्छेद पुन्हा कोणाला वाचता येऊ नयेत अशाप्रकारे खोडण्याची काळजी घेतली होती. पण बॉसवेल याबाबतीत चकले होते. एक तर त्यांना विसाव्या शतकात संशोधक किती चिकाटीने काम करतात याची कल्पना नव्हती. दुसरे खोडलेल्या मजकुरापाठीमागे कोठचा मजकूर होता हे आधुनिक साधने सांगतात. खोडलेला मजकूर मुळात होता तसाच पुन्हा एकत्र वाचता येतो. प्रा. पोट्टल यांच्या समूहाने अत्यंत चिकाटीने खोडण्यासाठी वापरण्यात आलेल्या शाईचा भेद करून अक्षराअक्षरांनी हा मजकूर लावला, वाचून काढला आणि मग नवी आवृत्ती तयार केली. बॉसवेल यांनी गाळलेला व खोडलेला मजकूर पुन्हा एकदा नव्याने उपलब्ध करून दिल्याकारणाने त्यांनी इंग्लिश साहित्यजगताची फारच मोठी सेवा केली होती. म्हणूनच हे सारे अथक श्रम सार्थकी लागले असेच म्हणावे लागेल. बॉसवेल यांनी गाळलेल्या व आता उपलब्ध झालेल्या मजकुरातून त्यांचे एक नवे दर्शन वाचकास होते. कोठचाही निर्बंध न मानणारे आणि त्याचबरोबर मनोरंजन करणारे, आनंद देणारे बॉसवेल, यांची भेट त्यांनी स्वत:च गाळलेल्या मजकुराद्वारे आपणास होते.

अशा रीतीने या अनेक वर्षे दुर्लक्षित राहिलेल्या क्रोक्वे खोक्याने सर्वस्वी कल्पनातीत असे घबाड मिळवून दिले होते. यापुढे आणखी काय सापडणार होते? मालाहिड कॅसल या वाड्यातल्या कागदपत्रांचे संशोधन पोट्टल व त्यांचे सहकारी करीत होते. या संशोधकांना असे आढळून आले की या कागदपत्रांचे जेवढे अधिक खोलात जाऊन संशोधन करावे, तेवढ्या अधिक प्रमाणात आपल्याकडे एकमेव असे कागदपत्र व हस्तलिखिते आहेत याची जाणीव त्यांना होत होती. एका माणसाचे जीवनदर्शन करण्याबाबत ते कागदपत्र व हस्तलिखिते एकमेवच होती. तथापि त्यांना एका गोष्टीचा कधीही विसर पडत नव्हता. त्यांनी त्या एबनी टेबलाच्या कप्प्यातून ज्या अनेक गोष्टींची अपेक्षा केली होती, त्या सर्व काही त्यांना प्राप्त झाल्या नव्हत्या. कर्नल इशाम यांनी जमा केलेल्या कागदपत्रांची प्रा. पोट्टल यांनी सूची तयार केली होती. त्या सूचीला प्रा. पोट्टल यांनीच प्रस्तावना लिहिली आहे. त्या प्रस्तावनेत प्रा. पोट्टल यांनी म्हटले होते :

"मालाहिड कागदपत्रात पुढील गोष्टी नाहीत. डॉ. जॉनसन यांचे एकही पत्र नाही. विल्कसचे एकही पत्र नाही, गॅरिक यांचे एकही पत्र नाही. 'लाईफ ऑफ जॉनसन' मध्ये बॉसवेल यांनी ज्या कागदपत्रांचे संदर्भ दिले आहेत– बॉसवेल यांनी आपल्या पत्रांच्या

स्वत:च नकला केल्या होत्या, हे आपणास नोंदवहीवरून समजते. तीही पत्रे जवळ जवळ नाहीत. अनेक फारशा अथवा अजिबात प्रसिद्ध नसलेल्या पत्रलेखकांची अनेक पत्रे या कागदपत्रात आहेत. परंतु ही पत्रे संख्येने कितीही प्रचंड असली, तरी बॉसवेल यांच्या मूळ दप्तरातील सर्वच पत्रे त्यात आली आहेत असे नाही.''

प्रा. पोट्टल यांच्या मतानुसार, ''मालाहिड येथून खरीदलेल्या कागदपत्रात फक्त नोंदवह्या एवढाच विभाग जवळजवळ संपूर्णपणे उपलब्ध होता. या नोंदवह्यातील फक्त एकच नोंदवही त्या नोंदवह्यात नव्हती. ती वही संख्येने एकच असली, तरी ती नसणे म्हणजे अत्यंत महत्त्वाची व गंभीर अशी त्रुटी होती. याचे कारण त्या नोंदवहीत बॉसवेल– जॉनसन यांची भेट झाल्यानंतरच्या कालखंडातील नोंदी होत्या. म्हणजे त्या विभागात बॉसवेल यांनी त्यांच्या दैवताचा आपल्यावर प्रथमदर्शनी आणि सुरुवातीच्या काळात काय व किती प्रभाव पडला याची अगदी तपशीलवार नोंद त्या वहीत असण्याची शक्यता होती.''

वर उदधृत केलेला परिच्छेद प्रा. पोट्टल यांनी इ. स. १९३० साली लिहिलेला आहे. प्रा. पोट्टल यांची ही खात्री होती की,– जे कागदपत्र उपलब्ध नाहीत याचे त्यांना वाईट वाटत होते– ते कागदपत्र आता कायमचेच गमावलेले आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की त्यांनी या गैरहजर असलेल्या कागदपत्रांविषयी एक सिद्धांत बसविला होता. या सिद्धांतानुसार बॉसवेल याच्या धाकट्या मुलाने या कप्प्यातून अनेक कागदपत्र काढून घेतले असावेत– विशेषत: ''त्याला ज्या कागदपत्रात व पत्रव्यवहारात जास्त रस होता, अशा प्रकारच्या विविध पत्रव्यवहारांचे रुमाल– त्यांनी त्या कप्प्यातून घेतले असावते. या धाकट्या मुलाचा व बॉसवेल यांचे ज्येष्ठ चिरंजीव अलेक्झांडर या दोघांचाही मृत्यू झाल्यानंतर जो गोंधळ झाला होता, त्या गोंधळात हे कागदपत्र कोठेतरी गळफटले असावेत.

परंतु नेमका याच ठिकाणी अत्यंत विस्मयकारक असा उपरोध आहे. प्रा. पोट्टल हे वर उदधृत केलेला मजकूर लिहीत होते, जवळ जवळ त्याच वेळी सुमारे साडेसात हजार किलोमीटर अंतरावर संशोधन करीत असलेल्या संशोधकाला नेमक्या याच कागदपत्रांचा शोध लागला. प्रा. पोट्टल यांनी जे कागदपत्र कायमचेच गमावल्यासारखे आहेत असे वाटत होते, त्यांची यादीच पेश केली होती. हे सर्व कागदपत्र तो इंग्लडमधला संशोधक प्रथमच प्रकाशात आणीत होता.

क्लोद कोल्लेएर आब्बोट्ट (claud colleer abbott) हे स्कॉटलंड मधील आबरडिन विद्यापीठात इंग्लिश वाङ्मय या विषयाचे प्राध्यापक म्हणून इ. स. १९३० साली काम करीत होते. प्रा. आब्बोट्ट हे सर विल्यम फोर्बस यांच्यासंबंधीच्या कागदपत्रांचा तपास लावण्याच्या प्रयत्नात होते. फोर्बस हे प्रख्यात स्कॉटिश बँकर होते. तसेच त्यांचे स्नेही जेम्स बेआट्टी (BEATTIE) या अठराव्या शतकातील तत्त्वज्ञाचे चरित्रही त्यांनी लिहिलेले होते. बॉसवेल हेही फोर्बस यांचे स्नेही होते. बॉसवेल यांनी जे वाङ्मयीन कागदपत्र मागे ठेवलेले होते त्याची

व्यवस्था लावण्याचे काम बॉसवेल यांनी त्यांच्यावर सोपविलेले होते. आपल्या मुलांचे पालक म्हणूनही बॉसवेल यांनी त्यांची नेमणूक केलेली होती. ही वस्तुस्थिती होती, म्हणून हेही तर्काला धरून होते की, फोर्बस यांच्या कागदपत्रात बॉसवेल यांची काही पत्रे सापडावीत. परंतु प्रा. आब्बोट्ट यांच्या तावडतोबीच्या संशोधनाचा विषय फोर्बस हा होता.

स्कॉटलंडमधील लॉर्ड क्लिंटन यांचा वाडा फेट्टरकेर्न (FETTERCAIRN) हाउस या ठिकाणी फोर्बस यांचे कागदपत्र ठेवलेले होते. या घरमालकाची परवानगी घेऊन त्या अस्ताव्यस्त पसरलेल्या वास्तूत, प्रा. आब्बोट्ट यांनी कागदपत्रांचा शोध घेण्यासाठी पद्धतशीरपणे सुरुवात केली. बॉसवेल यांच्याप्रमाणेच सर विल्यम आणि त्यांचे चिरंजीव हे दोघेही आपल्या दप्तरखान्यातील कागदपत्र, अत्यंत काळजीपूर्वक जतन करणारे लोक होते. प्रा. आब्बोट्ट यांना आपण अठराव्या शतकातील कागदपत्रात आकंठ बुडालेले आहोत असे आढळून आले. बघावे तिकडे कागदपत्रांच्या चळती होत्या. मोठ्या लाकडी पेट्यातून गच्च भरलेले, पत्र्याच्या डब्यातून ठेवलेले, मेजावर रचून ठेवलेले आणि जमिनीवर सर्वत्र पसरलेले अशा अवस्थेत ते सर्व कागदपत्र होते. तत्त्वज्ञ जेम्स बेआट्टी यांच्यासंबंधी तर तेथे अमापच साहित्य उपलब्ध होते. तसेच फोर्बस यांचे जे इतर परिचित होते, त्यांचा पत्रव्यवहार व इतर कागदपत्रेही तेथे होती. या फोर्बस यांच्या परिचितांपैकी काही जण अठराव्या शतकातील उत्तरार्धात नामवंत व्यक्ती ठरल्या होत्या, परंतु प्रा. आब्बोट्ट यांच्या एक गोष्ट लगेच लक्षात आली. ती म्हणजे त्या प्रचंड वाड्यात बेआट्टी आणि फोर्बस यांच्यासंबंधी त्यांनी कल्पना केली नव्हती, त्यापेक्षा कितीतरी पटीने विपुल कागदपत्र उपलब्ध आहेत.

पण तो तसा दुय्यम स्वरूपाचा खजिना होता. प्रा. आब्बोट्ट यांनी त्या कागदपत्रांच्या महासागरात हात घातल्यानंतर, जो पहिलाच कागदपत्रांचा जुडगा हाती आला, त्या जुडग्याच्या तळाशी त्यांच्या हाताला एक चांगले भरभक्कम हस्तलिखित लागले. हे हस्तलिखित इतर कोठल्याही कागदपत्रांपेक्षा फारच वेगळे होते. ते हस्तलिखित होते, बॉसवेल यांच्या नोंदवहीतला तो हरविलेला भाग. या भागात, बॉसवेल यांचा डॉ. जॉनसन यांच्याबरोबर परिचय झाल्यानंतरच्या सुरुवातीच्या काळातील पहिल्या महिन्याची ती नोंदवही होती. प्रा. आब्बोट्ट यांनी त्या प्रसंगाबद्दलच्या भावना पुढील शब्दात व्यक्त केल्या आहेत. "या प्रसंगी माझ्या मनात मुख्य विचार एकच होता. ही नोंदवही हरवली आहे असे आजवर मानले जात होते. ती नोंदवही येथे आहे, याचा अर्थ एबनी टेबलाच्या कप्प्यात जे जे काही सापडले नाही ते सारेच या ठिकाणी असण्याची शक्यता आहे."

प्रा. आब्बोट्ट हे मोठ्याच शृंगापत्तीत सापडले होते. फारच थोडे संशोधक अशा पेचात येतात. परंतु या पेचाने निर्माण होणारा मानसिक त्रास काही वेळा इतका जबरदस्त असतो की तो सहन करणे जवळ जवळ अशक्य असते. प्रा. आब्बोट्ट यांच्यापुढे नेमका काय प्रश्न होता? त्यांच्या अवती-भोवती अक्षरशः लाखो कागदपत्र पसरलेले होते. तसेच या कागदपत्रांचे वर्गीकरण तोवर झालेले नव्हते. त्याचबरोबर या प्रचंड वाड्यात अगदी सगळ्यात वरच्या मजल्यावरच्या

स्वत:च नकला केल्या होत्या, हे आपणास नोंदवहीवरून समजते. तीही पत्रे जवळ जवळ नाहीत. अनेक फारशा अथवा अजिबात प्रसिद्ध नसलेल्या पत्रलेखकांची अनेक पत्रे या कागदपत्रात आहेत. परंतु ही पत्रे संख्येने कितीही प्रचंड असली, तरी बॉसवेल यांच्या मूळ दप्तरातील सर्वच पत्रे त्यात आली आहेत असे नाही."

प्रा. पोट्टल यांच्या मतानुसार, "मालाहिड येथून खरीदलेल्या कागदपत्रात फक्त नोंदवह्या एवढाच विभाग जवळजवळ संपूर्णपणे उपलब्ध होता. या नोंदवह्यातील फक्त एकच नोंदवही त्या नोंदवह्यात नव्हती. ती वही संख्येने एकच असली, तरी ती नसणे म्हणजे अत्यंत महत्त्वाची व गंभीर अशी त्रुटी होती. याचे कारण त्या नोंदवहीत बॉसवेल- जॉनसन यांची भेट झाल्यानंतरच्या कालखंडातील नोंदी होत्या. म्हणजे त्या विभागात बॉसवेल यांनी त्यांच्या दैवताचा आपल्यावर प्रथमदर्शनी आणि सुरुवातीच्या काळात काय व किती प्रभाव पडला याची अगदी तपशीलवार नोंद त्या वहीत असण्याची शक्यता होती."

वर उदधृत केलेला परिच्छेद प्रा. पोट्टल यांनी इ. स. १९३० साली लिहिलेला आहे. प्रा. पोट्टल यांची ही खात्री होती की,- जे कागदपत्र उपलब्ध नाहीत याचे त्यांना वाईट वाटत होते- ते कागदपत्र आता कायमचेच गमावलेले आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की त्यांनी या गैरहजर असलेल्या कागदपत्रांविषयी एक सिद्धांत बसविला होता. या सिद्धांतानुसार बॉसवेल याच्या धाकट्या मुलाने या कप्प्यातून अनेक कागदपत्र काढून घेतले असावेत- विशेषत: "त्याला ज्या कागदपत्रात व पत्रव्यवहारात जास्त रस होता, अशा प्रकारच्या विविध पत्रव्यवहारांचे रुमाल- त्यांनी त्या कप्प्यातून घेतले असावते. या धाकट्या मुलाचा व बॉसवेल यांचे ज्येष्ठ चिरंजीव अलेक्झांडर या दोघांचाही मृत्यू झाल्यानंतर जो गोंधळ झाला होता, त्या गोंधळात हे कागदपत्र कोठेतरी गळफटले असावेत.

परंतु नेमका याच ठिकाणी अत्यंत विस्मयकारक असा उपरोध आहे. प्रा. पोट्टल हे वर उदधृत केलेला मजकूर लिहीत होते, जवळ जवळ त्याच वेळी सुमारे साडेसात हजार किलोमीटर अंतरावर संशोधन करीत असलेल्या संशोधकाला नेमक्या याच कागदपत्रांचा शोध लागला. प्रा. पोट्टल यांनी जे कागदपत्र कायमचेच गमावल्यासारखे आहेत असे वाटत होते, त्यांची यादीच पेश केली होती. हे सर्व कागदपत्र तो इंग्लडमधला संशोधक प्रथमच प्रकाशात आणीत होता.

क्लोद कोल्लेएर आब्बोट्ट (claud colleer abbott) हे स्कॉटलंड मधील आबरडिन विद्यापीठात इंग्लिश वाङ्मय या विषयाचे प्राध्यापक म्हणून इ. स. १९३० साली काम करीत होते. प्रा. आब्बोट्ट हे सर विल्यम फोर्बस यांच्यासंबंधीच्या कागदपत्रांचा तपास लावण्याच्या प्रयत्नात होते. फोर्बस हे प्रख्यात स्कॉटिश बँकर होते. तसेच त्यांचे स्नेही जेम्स बेआट्टी (BEATTIE) या अठराव्या शतकातील तत्त्वज्ञाचे चरित्रही त्यांनी लिहिलेले होते. बॉसवेल हेही फोर्बस यांचे स्नेही होते. बॉसवेल यांनी जे वाङ्मयीन कागदपत्र मागे ठेवलेले होते त्याची

व्यवस्था लावण्याचे काम बॉसवेल यांनी त्यांच्यावर सोपविलेले होते. आपल्या मुलांचे पालक म्हणूनही बॉसवेल यांनी त्यांची नेमणूक केलेली होती. ही वस्तुस्थिती होती, म्हणून हेही तर्काला धरून होते की, फोर्बस यांच्या कागदपत्रात बॉसवेल यांची काही पत्रे सापडावीत. परंतु प्रा. आब्बोट्ट यांच्या ताबडतोबीच्या संशोधनाचा विषय फोर्बस हा होता.

स्कॉटलंडमधील लॉर्ड क्लिटन यांचा वाडा फेट्टरकेर्न (FETTERCAIRN) हाउस या ठिकाणी फोर्बस यांचे कागदपत्र ठेवलेले होते. या घरमालकाची परवानगी घेऊन त्या अस्ताव्यस्त पसरलेल्या वास्तूत, प्रा. आब्बोट्ट यांनी कागदपत्रांचा शोध घेण्यासाठी पद्धतशीरपणे सुरुवात केली. बॉसवेल यांच्याप्रमाणेच सर विल्यम आणि त्यांचे चिरंजीव हे दोघेही आपल्या दप्तरखान्यातील कागदपत्र, अत्यंत काळजीपूर्वक जतन करणारे लोक होते. प्रा. आब्बोट्ट यांना आपण अठराव्या शतकातील कागदपत्रात आकंठ बुडालेले आहोत असे आढळून आले. बघावे तिकडे कागदपत्रांच्या चळती होत्या. मोठ्या लाकडी पेट्यातून गच्च भरलेले, पत्र्याच्या डब्यातून ठेवलेले, मेजावर रचून ठेवलेले आणि जमिनीवर सर्वत्र पसरलेले अशा अवस्थेत ते सर्व कागदपत्र होते. तत्त्वज्ञ जेम्स बेआट्टी यांच्यासंबंधी तर तेथे अमापच साहित्य उपलब्ध होते. तसेच फोर्बस यांचे जे इतर परिचित होते, त्यांचा पत्रव्यवहार व इतर कागदपत्रेही तेथे होती. या फोर्बस यांच्या परिचितांपैकी काही जण अठराव्या शतकातील उत्तरार्धात नामवंत व्यक्ती ठरल्या होत्या, परंतु प्रा. आब्बोट्ट यांच्या एक गोष्ट लगेच लक्षात आली. ती म्हणजे त्या प्रचंड वाड्यात बेआट्टी आणि फोर्बस यांच्यासंबंधी त्यांनी कल्पना केली नव्हती, त्यापेक्षा कितीतरी पटीने विपुल कागदपत्र उपलब्ध आहेत.

पण तो तसा दुय्यम स्वरूपाचा खजिना होता. प्रा. आब्बोट्ट यांनी त्या कागदपत्रांच्या महासागरात हात घातल्यानंतर, जो पहिलाच कागदपत्रांचा जुडगा हाती आला, त्या जुडग्याच्या तळाशी त्यांच्या हाताला एक चांगले भरभक्कम हस्तलिखित लागले. हे हस्तलिखित इतर कोठल्याही कागदपत्रांपेक्षा फारच वेगळे होते. ते हस्तलिखित होते, बॉसवेल यांच्या नोंदवहीतला तो हरविलेला भाग. या भागात, बॉसवेल यांचा डॉ. जॉनसन यांच्याबरोबर परिचय झाल्यानंतरच्या सुरुवातीच्या काळातील पहिल्या महिन्याची ती नोंदवही होती. प्रा. आब्बोट्ट यांनी त्या प्रसंगाबद्दलच्या भावना पुढील शब्दात व्यक्त केल्या आहेत. "या प्रसंगी माझ्या मनात मुख्य विचार एकच होता. ही नोंदवही हरवली आहे असे आजवर मानले जात होते. ती नोंदवही येथे आहे, याचा अर्थ एबनी टेबलाच्या कप्प्यात जे जे काही सापडले नाही ते सारेच या ठिकाणी असण्याची शक्यता आहे."

प्रा. आब्बोट्ट हे मोठ्याच शृंगापत्तीत सापडले होते. फारच थोडे संशोधक अशा पेचात येतात. परंतु या पेचाने निर्माण होणारा मानसिक त्रास काही वेळा इतका जबरदस्त असतो की तो सहन करणे जवळ जवळ अशक्य असते. प्रा. आब्बोट्ट यांच्यापुढे नेमका काय प्रश्न होता? त्यांच्या अवती–भोवती अक्षरशः लाखो कागदपत्र पसरलेले होते. तसेच या कागदपत्रांचे वर्गीकरण तोवर झालेले नव्हते. त्याचबरोबर या प्रचंड वाड्यात अगदी सगळ्यात वरच्या मजल्यावरच्या

पोटमाळ्यापासून तो तळघरापर्यंत, अनेक पिढ्या परंपरेने आणि वारसाहक्काने चालत आलेल्या वस्तू होत्या. शिवाय आजवर ज्याची कोणाला शंकाही आली नव्हती असा बॉसवेल-कागदपत्रांचा खजिना, त्या वाड्यात सर्वत्र पसरलेल्या जुन्या सामानात व कागदपत्रात कोठेतरी होता, याची त्यांना खात्री होती. अशा परिस्थितीत नेमकी सुरुवात कोठे करावयाची? या विचाराने त्यांचे डोके चांगलेच चक्रावून गेले होते. इ. स. १९३०-३१ या दोन वर्षांच्या शिशिर ऋतूत व हिवाळ्यात 'फेट्टरकेर्न हाउस' या वास्तूला त्यांनी अनेक वेळा भेट दिली होती. प्रत्येक वेळी ते तेथे थोडेच दिवस राहात असत. या सर्व वास्तव्यांचा त्यानी वृतांत लिहून ठेवला आहे. त्यात त्यांनी आपल्यापुढे असलेल्या पेचप्रसंगाचे अगदी तपशीलवार वर्णन केलेले आहे. हे वर्णन केल्यानंतर, त्यांनी एक निष्कर्ष काढला व त्याची कारणेही विस्ताराने नमूद केलेली आहेत. त्यांचे म्हणणे थोडक्यात असे होते की, एकाच वेळी सर्व दिशांनी मुसंड्या मारण्याचा मोह झाला; तरी आपल्या इच्छाशक्तीतली शेवटच्या कणापर्यंतची ताकद पणाला लावून, त्या मोहाला लगाम घालणे आवश्यक असते. पद्धतशीरपणे काम करण्याची त्यांनी स्वत:वर सक्ती केली.

कागदपत्रांचा प्रत्येक रुमाल त्यांनी तपासला. प्रत्येक खोका उघडून पाहिला. हे सारे खोके व रुमाल त्यांच्यासमोर ज्या क्रमाने आले, त्यानुसारच त्यांची तपासणी त्यांनी केली. कपाटामागून कपाटे त्यांनी तपासली. हे सारे करीत असताना, ज्या पोटमाळ्यात त्यांनी पाउल टाकले नव्हते, त्यांचा विचारही मनात न आणण्याचे त्यांनी भगीरथ प्रयत्न केले. सरतेशेवटी या पराकोटीच्या कडव्या शिस्तीने, त्यांच्या त्या भगीरथ प्रयत्नाला साजेसे 'पारितोषिक' त्यांना दिले. त्याचे असे झाले की, ते या कागदपत्रांची ज्या काळात तपासणी करीत होते, त्या सर्वच काळात, थोड्या थोड्या दिवसांच्या अंतरानी ते 'शोध' लावीत होते.

एका भल्या मोठ्या लाकडी पेटाऱ्याच्या तळाशी त्यांना एक कागदपत्रांचे पुडके मिळाले. दमट हवेने, या पेटाऱ्यातील अनेक गोष्टींचा पार भुगा झाला होता. सुदैवानें एक पुडके अशा एका कोपऱ्यात होते की दमट हवेने त्यातील कागदपत्रांचा भुगा होण्याच्या अवस्थेपासून ते वाचले होते. या पुडक्यात बॉसवेल यांनी फोर्बसना लिहिलेल्या पत्रांचा शोध लागला. ही पत्रांची मालिका तशी फारच बोलकी होती. टेंपल-बॉसवेल यांच्यातील, फ्रान्समधील बुलोन्य गावातील एका छोट्या दुकानात प्रथम प्रकाशात आलेल्या पत्रव्यवहाराचा उल्लेख यापूर्वीच येऊन गेला आहे. ती पत्रमालिका किती बोलकी होती हेही आपण पाहिले आहे. बॉसवेल- फोर्बस ही पत्रमालिकाही तितकीच बोलकी होती. या पत्रांच्या पुडक्या शेजारीच आणखी एक पुडके होते. इ.स. १८७४ सालच्या लंडन टाईम्सच्या फाटक्या पानात गुंडाळलेल्या अवस्थेत ते प्रा. आब्बोट यांना सापडले.

या पुडक्यात शंभराहून अधिक पत्रे होती. ही सर्व पत्रे डॉ. जॉनसन यांनी अनेक प्रकारच्या व्यक्तींना लिहिलेली होती. या पत्रांचा उपयोग बॉसवेल यांनी आपल्या 'लाईफ ऑफ जॉनसन'

या ग्रंथात सढळ हाताने केलेला आहेच. वेळप्रसंगी यातल्या काही पत्रांना, त्या चरित्रग्रंथात महत्त्वाचे स्थान आहे. प्रा. आब्बोट्ट यांना सापडलेले सर्वच कागदपत्र महत्त्वाचे होतेच. पण त्याच्या अस्तित्वामुळे दुसरे अनेक त्याहीपेक्षा अधिक मौल्यवान कागदपत्र त्या अथांग खजिन्यात सापडतील असा विश्वास निर्माण झाला होता. प्रा. आब्बोट्ट यांच्या मनात असा विचार येऊन गेला की या अत्यंत आश्चर्यकारक आणि चक्रावून टाकणाऱ्या कागदपत्रांच्या कोठारात, कुठेतरी आजवर जी पत्रे कायमचीच हरवलेली आहेत. असे समजले जाते, ती डॉ. जॉनसन यांनी बॉसवेलना लिहिलेली पत्रें सापडतील का? तशी शक्यता आहे असे आपण मानावे का?

या वाड्यात असलेल्या कागदपत्रांचे वजन अक्षरश: हजारांवर किलोग्राम झाले असते. हे सारे कागदपत्र तपासण्याचे काम प्रा. आब्बोट अगदी धीमपणाने करीत होते. डॉ. जॉनसन यांनी बॉसवेलना लिहिलेली पत्रे या रुमालात कोठेतरी आहेत ही आशा असल्यानें, प्रा. आब्बोट्ट यांच्या अथक परिश्रमाला जरी यश प्राप्त झाले नाही, तरी ते खचून गेले नाहीत. या कागदपत्रातील बहुतेक कागदपत्र त्या फोर्बस कुटुंबाचा जमीनजुमला, आणि इतर व्यवसाय यांच्याशीच जास्त करून संबंधित होते. तथापि या कागदपत्रात मधूनच बॉसवेल व त्यांचे वर्तुळ यांच्याशी अगदी प्रत्यक्षपणे संबंधित असलेले कागद सापडत. या अशा प्रकारे हाती आलेल्या कागदपत्रात फोर्बस यांनी बॉसवेलना लिहिलेली पत्रे सापडली. बॉसवेल यांनी लिहिलेल्या 'क्रिमिनल ऑपेरा' या कलाकृतीचा तर्जुमा सापडला. 'लाईफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथाशी संबंधित असलेले अनेक कागदपत्रही मिळाले आणि अजूनही पोटमाळ्यावरचे कागदपत्र तपासावयाचे शिल्लक होतेच.

खालच्या सर्व मजल्यावरील, प्रत्येक पुडके, प्रत्येक रुमाल, आणि प्रत्येक खण यात असलेल्या कागदपत्रांची स्थूलमानाने पाहाणी पूर्ण झाल्यानंतर अधिक काळजीपूर्वक व तपशीलवार करावयाची तपासणी तूर्त मागे ठेवण्यात आली होती. प्रा. आब्बोट्ट आता पोटमाळ्यावरील कागदांची पाहाणी करण्यासाठी सिद्ध झाले होते. या अंधकारमय प्रदेशाने प्रा. आब्बोट्ट यांचे स्वागत करण्यासाठीच म्हणून की काय आपल्याकडे असलेल्या खजिन्यातला काही भाग त्याना ताबडतोब नजर केला. या पोटमाळ्यावर, या जुन्या प्रख्यात उमरावी कुटुंबाने, टाकून दिलेल्या अनेक गोष्टी होत्या. मोडक्या खुर्च्या, बाद ठरविलेल्या शोभेच्या वस्तू व दागिने, टोपल्या, इत्यादी वस्तू त्या भंगार सामानात होत्याच. पण त्याच रद्दीत प्रा. आब्बोट्ट यांना बॉसवेल यांनी अनेक प्रख्यात व्यक्तींनां पाठविलेल्या पत्रांचे एक भले मोठे पुडके सापडले. परंतु या आरंभीच्या भाग्यानंतर मात्र नशिबाने त्यांना हुलकावणी दिली. अनेक दिवस या जुन्या कागदपत्रांच्या रद्दीतून ते सातत्याने जात होते, तरी काहीही हाती आले नाही. फुफ्फुसात जाणारी धूळ, वजनदार गोष्टी इकडच्या तिकडे हलविल्याने होणारे 'स्नायूवर्धन' या दोनच गोष्टी अथक परिश्रमाचे पारितोषिक म्हणून त्यांच्या हाती आल्या होत्या. मोठे- मोठे प्रचंड खोके आजूबाजूच्या प्रचंड भंगार सामानापासून अलग करून ते उघडण्यासाठी चांगलेच कष्ट करावे लागत. पण ते उलगडल्यानंतर मात्र त्यात पिवळ्या रंगाचे वॉलपेपरच सापडले. त्यासंबंधी ते लिहितात –

" मी कान असलेले एक टेबल मोठ्या कष्टाने हलविल्यानंतर, मला दोन फर्निचरसारख्या वस्तूंमध्ये कोंबलेली एक छोटी गोणी आढळली. ही छोटी गोण टपालखात्यात वापरतात तशी होती. या छोट्या गोणीला अनेक ठिकाणी चांगलेच भोसके पडलेले होते. अनेक पत्रे, या भोसक्यातून त्या गोणीबाहेर पडण्याच्या अगदी तयारीत आहेत, अशाप्रकारे डोकावत होती. मी ही गोण अगदी चपळाईने बाहेर काढली. तसे करताना त्यातून एक पत्र बाहेर पडलेच. हे पत्र बॉसवेलना लिहिलेले होते. मी चक्राकार जिन्यावरून ती गोण घेऊन झटपट खालच्या मजल्यावर आलो. ही गोण खाली घेऊन येत असताना, मी स्वत:शीच विचार करीत होतो. त्या विचारांनी मी चांगलाच चक्रावून गेलो. या गोणीतली सर्वच्या सर्व पत्रे बॉसवेलसंबंधी असतील का? ही गोण रिकामी करण्याअगोदर, मी त्या गोणीतून एक सुटे असलेले पत्र बाहेर काढले. ते बॉसवेलसंबंधीच होते. हा फारच आशादायक शकून होता. लवकरच मला वस्तुस्थितीचे चांगलेच भान आले. ही गोण बॉसवेलसंबंधित कागदपत्रांनी अगदी गच्च भरलेली होती. बहुतेक सारे कागद पुडक्यात बांधलेले होते. काही कागद इकडे-तिकडे फाटलेले, धुळीने माखलेले होते. तसे होते तरी त्यातले बहुतेक उत्तम स्थितीत होते. दमट हवेने त्यांच्यावर परिणाम केलेला नव्हता. वाळवीने त्यांना खाल्लेले नव्हेते. उंदरांनी कुरतडलेले नव्हते. माझ्या नशिबाने मला चांगलाच हात दिला होता."

आजवर बॉसवेलसंबंधित कागदपत्रांचा वेगवेगळ्या ठिकाणी जो खजिना संशोधकांच्या हाती आला होता, त्यांच्याशी तुलना करता हे फारच मोठे घबाड होते. ही गोण बि-बियाणे साठविण्यासाठी एकेकाळी वापरात असलेली, चांगली पंचवीस इंच लांब व एकोणीस इंच रुंद या मापाची. या गोणीत आजवर जी पत्रे कायमची हरवली आहेत. असे समजले जात होते, अशा पत्रांनी अगदी ठेचून भरलेली होती. या गोणीतील कागदपत्रात कॉर्सिकन देशभक्त जनरल पाओली आणि बॉसवेल यांच्यातील पत्रव्यवहार, विल्कस आणि एडमंड बर्क यांनी बॉसवेल यांना लिहिलेली पत्रे, इत्यादी पत्रे, आणि विल्यम जॉनसन टेंपल यांनी बॉसवेल यांना लिहिलेली पत्रे इत्यादी सर्व साहित्य होते. बुलोन्य येथे सापडलेल्या पत्रांचा उल्लेख या पूर्वी आलाच आहे. या गोणीत सापडलेली टेंपल यांची पत्रे, ही त्या पत्रव्यवहाराचा दुसरा व पूरक भाग होता.

एवढे मोठे घबाड हाती आले होते तरी मुख्य व मौल्यवान असे कागदपत्र हाती आले नव्हते. याही परिस्थितीत प्रा. आब्बोट्ट हे निराश झाले नाहीत. संशोधकाला अनेक वर्षे संशोधन केल्यानंतर काही गोष्टींची अटकळ बांधता येते. तसेच प्रा. आब्बोट्ट यांचे होते. त्यांना खात्री होती हवे असलेले ते 'मौल्यवान' कागदपत्र आपणास सापडणारच आहेत. इंग्रजी पाकशास्त्राच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास केकवर जे आच्छादन असते, ते लोकांना केक खावयास देण्याअगोदर एक मिनिटच केकवर पसरवायचे असते. तसेच या कागदपत्रांच्या बाबतीत घडेल अशी प्रा. आब्बोट्ट यांची श्रद्धा होती.

मालाहिड कॅसल या वास्तूत बॉसवेलसंबंधित अनेक कागदपत्र मिळाले पण त्यात अनेक

मिळालेही नव्हते. हे न मिळालेले कागदपत्र कायमचेच गमाविलेले आहेत अशी भावना सुरुवाती सुरुवातीला होती. ते जवळ जवळ सर्वच कागदपत्र फेट्टरकेर्न वाड्यात सापडले होते. हे कागदपत्र जमेस धरल्यानंतर त्या 'गमाविलेल्या कागदपत्रांचा' हिशेब जवळ जवळ पुरा होत होता. याला अर्थातच अपवाद होता. तो डॉ. जॉनसन-बॉसवेल यांच्या पत्रव्यवहाराचा. ही एक अत्यंत हवी हवीशी गोष्ट होती.

तो पत्रव्यवहार फेट्टरकेर्न कागदपत्रात नव्हता. इतक्या भगीरथ प्रयत्नानंतरही तो पत्रव्यवहार हाती आला नाही तेव्हा प्रा. आब्बोट्ट यांना तो आपणास सापडला नाही असा अहवाल तयार करणे भाग पडले. तो पत्रव्यवहार कोठे आहे, हे आजतगायत गूढच राहिले आहे. बॉसवेल यांचे व त्यांच्यासंबंधीचे कागदपत्र फेट्टरकेर्न या वाड्यात कसे येऊन पोहोचले हे सहज समजावून सांगता येते. सर विल्यम फोबर्स, हे बॉसवेल यांचे मृत्युपत्र कार्यवाहीत आणण्यासाठी नेमलेल्या विश्वस्तांपैकी एक होते. बॉसवेल यांच्या कागदपत्रांची तपासणी त्यांनी करावी, या हेतूने कागदपत्रांचे रुमालामागून रुमाल त्यांच्याकडे पाठविण्यात आले होते. त्यांची तपासणी पुरी झाल्यानंतर त्या कागदपत्रांचे संपादन होऊन सरतेशेवटी ते प्रकाशित करण्यात येणार होते. टेंपल हे आणखी एक विश्वस्त. त्यांना मधल्या काळात मृत्यू आल्यानंतर हे कागदपत्र तपासणीचे कार्यच स्थगित झाले. सर फोर्बस यांच्याकडे जे कागदपत्रांचे रुमाल होते, ते त्यांनी बॉसवेल कुटुंबीयांकडे कधीही परत केलेच नाहीत. सर फोर्बस इ. स. १८०५ साली मृत्यू पावले. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या सर्वच कागदपत्रात बॉसवेल यांचे कागदपत्र जे मिसळले गेले ते सुरुवातीपासूनच वेगळे ठेवलेले नसणार. सर फोर्बस यांच्या मृत्यूनंतर फेट्टरकेर्न वाड्यात, त्यांचे सर्व कागदपत्र (यात बॉसवेल यांचेही कागदपत्र होते) नेण्यात आले, कारण त्या वाड्यात सर फोर्बस यांचे चिरंजीव राहात असत. या चिरंजिवांनी फेट्टरकेर्न वाड्याचे मालक सर जॉन स्टुअर्ट यांच्या एकुलत्या एका कन्येशी विवाह केला होता. अशा रीतीने बॉसवेलसंबंधित कागदपत्र फेट्टरकेर्न वाड्यात अनेक वर्षे पडून होते. त्यांच्या अस्तित्वाची कोणसही माहिती नव्हती. सुदैवाने त्यातले बहुतेक कागदपत्र दमटपणा व घुशींचा हल्ला या दोन्हीपासून सुरक्षित राहिले, हे इंग्लिश भाषाप्रेमिकांचे नशीब. दुसरा सुदैवाचा भाग प्रा. आब्बोट्ट हे सर विल्यम फोर्बस यांच्यासंबंधी माहिती गोळा करीत असताना आकस्मिकपणे त्यांच्या हाती हे सर्व कागदपत्र आले हा आहे.

फेट्टरकेर्न वाड्यातले हे कागद सापडण्यातले नाट्य जगाला जाहीर झाले. पण त्या कागदपत्रांची मालकी कोणाची हा जटिल व नाजूक असा प्रश्न उपस्थित झाला. हे सर्व कागदपत्र जगातील अभ्यासकांस संशोधनासाठी उपलब्ध होण्याअगोदर या प्रश्नाचा निकाल लागणे आवश्यक होते. बॉसवेल यांच्या वारसांकडे या सर्व कागदपत्रांची मालकी होती हे स्पष्टच होते. परंतु कर्नल इशाम यांनी लॉर्ड तालबोट यांच्याकडे असलेल्या सर्व कागदपत्रांचे हक्क खरेदी केलेले होते. म्हणजेच कालांतराने सापडलेल्या कागदपत्रांची मालकी प्रत्यक्ष लॉर्ड तालबोट यांच्याकडे नसली, तरी ते कायद्यानुसार त्यांच्या मालकीचे होते; याचे कारण ते ऑचिनलेक-

इस्टेटीचे एकमेव वारस होते. सरतेशेवटी या कागदपत्रांसंबंधी स्कॉट न्यायालयात खटला दाखल करण्यात आला. इ. स. १९३९ साली या खटल्याचा निकाल लागला. न्यायाधिशांनी निकाल दिला तीही एक न सुटणारी गॉर्डीयन गाठ होती. या खजिन्यातल्या अर्ध्या संपत्तीचे मालक लॉर्ड तालबोट होते. याचा अर्थ प्रत्यक्षात त्यांची मालकी कर्नल इशाम यांच्याकडे होती, कारण लॉर्ड तालबोट यांनी ते कागदपत्र कर्नल इशाम यांना अगोदरच विकलेले होते. दुसऱ्या अर्ध्या भागाची मालकी होती, कंबरलँड इन्फरमरी या संस्थेकडे. कंबरलँड परगण्यानजीक विकलांगांची देखभाल करणारे ते रुग्णालय होते. बॉसवेलनंतरच्या अखेरच्या ऑचिनलेक बॉसवेलने आपल्या मृत्युपत्रानुसार या संस्थेकडे या कागदपत्रांचे हक्क सुपूर्द केले होते. हे सर्व कागदपत्र एके ठिकाणी राहावेत असे असेल तर या दोघांपैकी एकाने, दुसऱ्याकडे असलेला अर्धा भाग विकत घेण्याची तयारी दर्शविणे जरूर होते. पण तसे करण्यास या दोघांपैकी एकजणही तयार नव्हता. हा घोळ चालू असताना दुसऱ्या महायुद्धास सुरुवात झाली. मग सारीच हालचाल थंडावली. याचा परिणाम फेट्टरकेर्न येथे सापडलेले कागदपत्र कडी-कुलूप लावून ठेवण्यात आले. यावद्दलची माहिती बाहेरच्या जगास होती. या कागदपत्रांचे स्वरूप काय होते ते त्यांना प्रा. आब्बोट्ट यानी छापून प्रसिद्ध केलेल्या सूचीवरून समजले होते. या सूचीत अत्यंत वेचक आणि वेधक अशा सोळाशेहून अधिक कागदपत्रांची नोंद करण्यात आली होती. ही नोंदही इतक्या नेटकेपणे करण्यात आली होती की, या क्षेत्रातील सर्वच संशोधकांची जिज्ञासा त्यामुळे चाळवली गेली होती. हे सर्व कागदपत्र आपणास प्रत्यक्षात पाहावयास व तपासावयास मिळालेच पाहिजे, याविषयीची त्यांची उत्कंठा अगदी शिगेला पोहोचली होती.

परंतु दुसरे महायुद्ध चालू होते तरीही– किंबहुना महायुद्धामुळेच– बॉसवेल यांच्या कागदपत्रांच्या अद्‌भुत तपासाचे काम तसेच पुढे चालू राहिले. त्याचे असे झाले दुसऱ्या महायुद्धात धान्य साठविण्यासाठी सरकारला जागा हवी होती. तशी जागेची चणचणच होती. म्हणूनच आयर्लंडमधील ज्या कोठच्या इमारती वापरात नव्हत्या किंवा रिकाम्या होत्या, त्यातली प्रत्येक इमारत धान्य साठविण्याच्या कामासाठी उपयोगात आणणे जरुरी होते. त्याच कामासाठी मालाहिड एस्टेटीत अंतर्भूत असलेला एक जुना व मोडकळीस आलेला गुरांचा गोठा होता, त्याचा सरकारने ताबा घेतला. या सर्वच इस्टेटीचा अखेरच्या काळातला इतिहास हा विस्मयकारकच होता. हे लक्षात घेता, त्या गोठ्याची जेव्हा तपासणी झाली तेव्हा त्या ठिकाणी काहीतरी नाट्यपूर्ण घटना घडली नसती तरच त्याच्याबद्दल आश्चर्य व्यक्त करावे लागले असते. लोकांना चकित करून टाकायचे ही या एस्टेटीची आजवरची परंपरा होती, त्याला तो गुरांचा गोठाही जागला. या गोठ्याला एक पोटमाळा होता. त्यात अठराव्या शतकांतील कागदांचे आणखी काही रुमाल सापडले. त्यातील काही रुमालात बॉसवेल - जॉनसन कागदपत्रांपैकी आजवर हाती न आलेल्या कागदपत्रांचा खजिना होता.

लॉर्ड तालबोट यांनी हे कागदपत्र सापडले आहेत याविषयी कर्नल इशाम यांना कळविले.

अनेक दिवस वाटाघाटी केल्यांनतर कर्नल इशाम यांनी हे नुकतेच सापडलेले व प्रकाशात आलेले कागदपत्रही खरेदी केले. १९४६ फॉलमध्ये (शिशिर ऋतूत) हे घबाड न्यूयॉर्कला आणण्यात आले. या मध्यंतरीच्या काळात कर्नल इशाम फेट्टरकेर्न वाड्यात सापडलेल्या कागदपत्रासंबंधी बोलणी करीतच होते. सरतेशेवटी तेही कागदपत्र त्यांनी विकत घेतले. अशा रीतीने बॉसवेल –जॉनसन यांच्यासंबंधातले तोवर जे कागदपत्र उपलब्ध होते, ते सर्व कागदपत्र खरेदी करण्यात कर्नल इशाम यशस्वी झाले होते. सर्वात प्रथम मालाहिड वाड्यात सापडलेला खजिना, त्यांनतर क्रोक्वे खोक्यात सापडलेले घबाड, फेट्टरकेर्न वाड्यातले रुमाल आणि सरतेशेवटी गुरांच्या गोठ्याच्या पोटमाळ्यावर सापडलेली कागदपत्रांची गोण – हे सर्व कागदपत्र तब्बल दीडशे वर्षांच्या ताटातुटीनंतर आता अखेरीस पुन्हा एका जागी आले होते.

इ.स. १९४८ च्या नोव्हेंबर महिन्यात कर्नल इशाम यांनी आपण नुकत्याच खरेदी केलेल्या बॉसवेल–जॉनसनसंबंधित कागदपत्रांचे, अठराव्या शतकातील वाङ्मय व संस्कृती यांचे जे अभ्यासक व पंडित होते, त्यांच्यासाठी प्रदर्शन भरविले. या प्रदर्शनास तसे म्हटले तर तत्कालीन परिस्थिती तशी अनुकूल नव्हती. एकतर आतंरराष्ट्रीय परिस्थिती अतिशय तणावाची होती. अमेरिकेत नुकतीच राष्ट्रीय निवडणूक होऊन गेलेली असल्यांकारणाने अशा निवडणुकीपाठोपाठ येणारे हेवे–दावे, राग–लोभ हे सारे जिवंत होते. तसेच वाङ्मय–साहित्य या विषयासंबंधी आमजनतेला काहीही कर्तव्य नाही, त्यात तिला रस नाही अशी समजूत होती. परंतु अहो आश्चर्यम्! कर्नल इशाम यांनी आपला खाजगी खजिना लोकांसमोर औपचारिकपणे खुला केल्यानंतर वर्तमानपत्रातून त्यासंबंधीच्या चर्चेला अगदी आश्चर्यकारक असे उधाण आले. न्यूयॉर्क टाईम्स या वजनदार दैनिकाने दैनंदिन बातम्या देणारे, जे त्या वृत्तपत्राचे पहिले पान होते, त्यातला फारच मोठा रकाना हा खजिना, त्याची बातमी व त्यासंबंधीचे लेख यांच्यासाठी वापरला होता. या बातम्यांतून व लेखातून या खजिन्याचा शोध किती नाट्यपूर्णपणे व अद्भुतपणे लागला, आणि हे सापडलेले कागदपत्र, चरित्रलेखक आणि साहित्यिक या दोघांच्या दृष्टीने किती पराकोटीच्या महत्त्वाचे आहेत याचे वर्णन व स्पष्टीकरण त्या लेखात करण्यात आले होते. न्यूयॉर्क टाईम्स हे तसे पुरोगामी आणि मोठ्या शहरात प्रसिद्ध होणारे दैनिक, म्हणून त्यांनी या प्रसंगाला महत्त्व दिले होते असे म्हणता येणार नाही. अमेरिकेतल्या सर्वच वृत्तपत्रांनी आपल्या पहिल्या पानावर या ऐतिहासिक प्रसंगाचे वर्णन करणारी व त्याचे महत्त्व विशद करणारी चांगली विस्तृत अशी बातमीपत्रे छापली होती. या असंख्य वृत्तपत्रातून लेखन करणारे जे स्तंभलेखक होते, त्या सर्वांनी तोवर कोणालाही शंका आली नसती अशी जाणकारी दाखविली. वाङ्मयाच्या क्षेत्रात आपण व्युत्पन्न पंडित आहोत हे त्यांनी बॉसवेल –जॉनसन यांच्यावर चांगले भले मोठे निबंध लिहून जगास दाखवून दिले.

कर्नल इशाम यांनी पुढील गोष्टी स्पष्ट केल्या होत्या : एक, त्यांनी जो पत्रव्यवहार विकत घेतला होता त्यात बॉसवेल – जॉनसन यांची व त्यांच्यासंबंधी जेवढी पत्रे होती, त्याच्या किमान

तिप्पट इतर पत्रे त्यांच्याकडे -अन्य मार्गांनी मिळविलेली होती. उदा, बॉसवेल यांना एडमंड मालोन, सर जोशुआ रेनाल्डस आणि डेव्हिड गॅरिक इत्यादी, यासारख्या विविध क्षेत्रातील मान्यवरांकडून आलेली २२०० (बावीसशे) पत्रे आणि बॉसवेल यांनी या सर्वांना लिहिलेली ६०० पत्रे, डॉ. जॉनसन यांना, बॉसवेलना नव्हेत, तर अन्य व्यक्तींना लिहिलेली - यांचे अस्तित्व तोवर कोणासही माहीत नव्हते - शंभर पत्रे.

दुसरे आजवर कोणालाही ज्ञात नसलेले डॉ. जॉनसन यांनी आपल्या पौगंडावस्थेत केलेले काव्य, तसेच जॉनसन यांनी लिहिलेल्या पुस्तकांच्या प्रती -अशा प्रती इतरत्र कोठेही अस्तित्वात नव्हत्या -या सर्व गोष्टी त्या प्रदर्शनात होत्या. याशिवाय दुसऱ्या अनेक गोष्टी होत्या. उदा, रेनाल्डस यांची अनेक महत्त्वाची हस्तलिखिते होती; या हस्तलिखितात ऑलिव्हर गोल्डस्मिथ या प्रख्यात इंग्लिश लेखकासंबंधीचे अठ्ठावीस पानांचे शब्दचित्र. हे शब्दचित्र अस्तित्वात आहे, असा पुसटता संशयही कोणास नव्हता. कर्नल इशाम यांनी प्रकट केलेल्या या दस्तऐवजापेक्षाही, आणखी एक महत्त्वाची गोष्ट त्यात होती. तोवर असे समजले जात होते की 'लाईफ ऑफ जॉनसन' या हस्तलिखिताचे मूळ हस्तलिखित हे काळाच्या (Time) भक्षस्थानी पडलेले आहे. त्याबद्दल हळहळही व्यक्त करण्यात येत असे. पण हे अज्ञान होते व ते अपरिपक्वतेचे लक्षण आहे असे सिद्ध करणारा पुरावा त्या प्रदर्शनात होता. तो सर्वच बॉसवेल - डॉ. जॉनसन प्रेमिकांना, तो आपल्या हृदयाला चटका लावणारा असा दिलचस्प पुरावा वाटला होता. हे हस्तलिखित, ज्या खोक्यात काही महत्त्वाचं हाती लागेल असे वाटले होते, त्या खोक्यात नव्हते. त्या खोक्यात फक्त धूळ सापडली. ते काहीही असो, ते हस्तलिखित कर्नल इशाम यांच्याकडे होते. चांगले तीनशे पानांचे. बॉसवेल आपली सर्वसामान्य अशी एक जी दैनंदिनी वा नोंदवही ठेवीत असत, त्या वहीतून फाडलेल्या पानांवर लिहिलेले ते हस्तलिखित होते. एवढेच, नव्हे तर बॉसवेल यांनी त्या हस्तलिखिताचे अगदी खोलात जाऊन, फार तपशीलवार संशोधन केलेले होते आणि त्यानंतर छापावयास पाठविलेली ती मुद्रणप्रत होती.

कर्नल इशाम यांनी कोणाचाही विश्वास बसणार नाही एवढा प्रचंड दस्तऐवज जमा केला होता. एका अत्यंत उत्साही संशोधकाने, ते जमा केलेले कागदपत्र पाहून असे म्हटले की, येती पन्नास वर्षे, किमान पन्नास संशोधकांना भरपूर काम पुरविण्यास पुरेसे ठरेल, एवढे ते साहित्य आहे. त्या संशोधकाचे हे विधान कोणाला अतिशयोक्त वाटेल. पण ती वस्तुस्थिती होती. हे असे असण्याची कारणेही अनेक आहेत. एक तर बॉसवेल यांचा आपल्या स्वत:च्या काळातील महत्त्वाच्या व प्रमुख अशा वाङ्मयीन आणि बौद्धिक या दोन्ही क्षेत्रातील व्यक्तींशी घनिष्ट परिचय होता. या मंडळीत फक्त ब्रिटनमधील मंडळीच होती असे नव्हे, तर उर्वरीत युरोप खंडातील व्यक्तींचाही त्यात समावेश होता. आणखी एक कारण असे होते की बॉसवेल यांनी या सर्व महान व्यक्तींबद्दल ज्या काही बारीकसारीक माहिती त्यांच्या हाती आली होती, तिचा त्यांनी संग्रह केला होता.

निदान त्यांनी मागे ठेवलेल्या कागदपत्रांकडे नजर टाकल्यानंतर त्या संशोधकाचे ते विधान अतिशयोक्त नाही, याची खात्री पटेल. या कागदपत्रांचा आणखी एक परिणाम होणार होता. या कागदपत्रांच्या आधारे केवळ बॉसवेल या व्यक्तीची खरी ओळख होणारच होती. परंतु त्या कागदपत्रात ज्यांची नोंद होती, अशा अनेक व्यक्तींच्या स्वभावावर, प्रकृतीवर आणि त्यांच्या एकंदर कर्तृत्वावर नवा प्रकाश पडणार होता. या साऱ्या व्यक्तीत, इंग्लिश वाङ्मयाचे जे जे इतिहास आजवर लिहिले गेले आहेत, त्यात अंतर्भूत असलेले अनेक स्त्री व पुरुष आहेत. बॉसवेल यांनी त्या एबनी टेबलाच्या कप्प्यात ठेवलेल्या– मुळात ठेवलेल्या– कागदपत्रांचा महिमा इतका मोठा होता.

कर्नल इशाम यांनी जमविलेले कागदपत्र आम जनतेला पाहावयास मिळाल्याकारणाने, वाङ्मयक्षेत्रातील सार्वजनिक उत्साह व आश्चर्य यांना उधाण आले होते. पण या सर्व जल्लोशात, सर्वच संशोधकांना, एका गंभीर प्रश्नाने चांगलेच सताविले होते. या अस्वस्थतेमागे, कर्नल इशाम यांनी आपण जमा केलेला हा अभूतपूर्व दस्तऐवज व कागदपत्र यांचा सर्वच्या सर्व संग्रह आपण विकून टाकणार आहोत असे जाहीर केले होते. असा आगळावेगळा, एकमेव असा संग्रह सुरक्षितपणें कायम राहील या दृष्टीने दोनच आदर्श जागा होत्या. येथे खासकरून भावी संशोधकांचा दृष्टिकोन विचारात घेतला जात आहे. एक, एखादे मान्यवर अमेरिकन विद्यापीठाचे वाचनालय, अथवा एखादी निम– सरकारी अमेरिकन संस्था. या दोन्ही संस्था संशोधकांच्या दृष्टीने आदर्श संस्था होत्या. याची कारणे दोन. एक, या दोन्ही संस्थांत या संग्रहाचे फारच काळजीपूर्वक जतन केले गेले असते. दोन, या दोन्ही संस्थांत या संग्रहातील कागदपत्रांची वेगवेगळ्या प्रकारे वर्गवारी केली गेली असती. सर्वात महत्त्वाचा मुद्दा वेगळाच होता. या कागदपत्रांचे जतन व त्यांचे वर्गीकरण होणे हे महत्त्वाचे होतेच.

पण या संस्थात कर्नल इशाम यांचा संग्रह राहिल्याने, सर्व संशोधकांना, आपल्या संशोधनासाठी हे सर्व कागदपत्र नेहमीच उपलब्ध झाले असते. संशोधकांच्या दृष्टीने हा मुद्दा फारच महत्त्वाचा होता. या अभूतपूर्व कागदपत्रांच्या संग्रहाची किंमत काय असेल यासंबंधी अनेक वावड्या उठत होत्या. कोट्यावधी रुपये, ही त्या संग्रहाची किंमत आहे, असे सांगण्यात येत होते. ही किंमत ऐकूनच कोणत्याही सामान्य व्यक्तीची छाती हबकली असती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, या अडचणीतून बाहेर पडण्यासाठी आनंददायी असा मार्ग त्यावेळी तरी दिसत नव्हता. वर उद्देशिलेल्या दोन प्रकारच्या संस्थांनी हा संग्रह विकत घेतला नसता, तर अर्थातच हा संग्रह वेगवेगळ्या व्यक्तींना विकावा लागला असता. थोडक्यात हा संग्रह अनेक ठिकाणी गेल्या कारणाने, तो विभागला जाणार होता.

म्हणजेच गेल्या काही दशकातल्या अत्यंत विस्मयकारक अशा घटना, व त्यातून झालेला संशोधनक्षेत्रातील विकास, या सर्वालाच रामराम ठोकावा लागला असता. या संग्रहातील एकएक तुकडा अनेक ठिकाणी जाणार होता. याचा अर्थ, कर्नल इशाम यांनी हे कागदपत्र एके ठिकाणीं

आणण्यापूर्वी जी परिस्थिती होती, तीच नव्याने प्रस्थापित होणार होती. म्हणजे पूर्वी या संग्रहातील एकही कागद संशोधकाला उपलब्ध नव्हता, तसेच पुन्हा झाले असते. निदान त्यातल्या काही कागदपत्रांच्या बाबतीत, ही चिंता वास्तव ठरली असती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास अनेक कागदपत्र सामान्यपणे संशोधकास पाहावयास मिळाले नसते. सुदैवाने, संशोधकांच्या ह्या चिंतेचा निचरा लवकरच झाला. पॉल मेलन, या दानशूर धनाढ्य व्यक्तीने एका प्रतिष्ठानाची स्थापना केली होती.

त्याचे नाव, ओल्ड डोमिनियन फाउंडेशन. या प्रतिष्ठानाने कर्नल इशाम यांनी जमा केलेले सर्व कागदपत्र विकत घेतले आणि इ. स. १९४९ साली ते 'येल' या प्रख्यात अमेरिकन विद्यापीठास भेट दिले. त्याचबरोबर हे सर्व कागदपत्र प्रकाशित व्हावेत, यासाठी प्रख्यात अमेरिकन प्रकाशन– संस्था मॅकग्राह हील बुक कंपनीबरोबरही करार केला. अशा तऱ्हेने, या प्रतिष्ठानाच्या औदार्यामुळे येल विद्यापीठाला, हा अभूतपूर्व असा, कर्नल इशाम यांनी आपले बुद्धिचातुर्य, अथक परिश्रम, आणि व्यावहारिक ज्ञान यांच्या मदतीने जमा केलेला बॉसवेल – कागदपत्रांचा संग्रह प्राप्त झाला. बॉसवेल कागदपत्रासंबंधी, हा सरतेशेवटी झालेला निर्णय, आणखी एका दृष्टीने उचित होता. कर्नल इशाम हे स्वत: येल विद्यापीठाचे विद्यार्थी होते. तसेच बॉसवेल सापडण्याचे जे महाभारत झाले, त्यातल्या दोन प्रमुख व्यक्ती चोन्सी ब्रेवस्टर टिंकर (CHAUNCEY BREWSTER TINKER) आणि प्रा. फ्रेडरिक ए. पोट्टल हे दोघेही येल विद्यापीठात प्राध्यापक होते.

बॉसवेल यांचे कागदपत्र संख्येने प्रचंड आहेत. या सर्व कागदपत्रांचा अभ्यास करावयाचा, त्यांच्यावर भाष्य करायचे, त्यातले महत्त्वाचे कोठचे हे निवडून काढावयाचे, यासाठी अठराव्या शतकातील इंग्लिश साहित्याची चांगलीच जाण असणाऱ्या व्यक्तीची जरुरी होती. म्हणूनच येल विद्यापीठाने सल्लागार आणि संपादक यांचे एक मंडळ नियुक्त केले. या मंडळाला पद्धतशीरपणे काम करता यावे, यासाठी तपशीलवार नियमावली तयार करण्यात आली. या मंडळाचे सर्वच सदस्य त्या क्षेत्रातील तज्ज्ञ व मशहूर व्यक्ती आहेत. या सभासदांना त्या कागदपत्रांचे वर्गीकरण, त्यांचे संपादन आणि सरतेशेवटी त्यातील बहुतेक सर्व दस्तऐवजाचे प्रकाशन यावर देखरेख करावयाची आहे. इतकी वर्षे झाली तरी अजूनही ते काम संपलेले नाही.

मालाहिड–फेट्टरकेर्न येथे सापडलेल्या कागदपत्रांमुळे डॉ. जॉनसन, किंवा गोल्डस्मिथ, किंवा गॅरिक किंवा रेनाल्डस या सर्व प्रख्यात व्यक्तींसंबंधी आपल्या ज्या भावना अथवा कल्पना असतील त्यात कदाचित आमूलाग्रपणे फरक होईलही; पण त्याहीपेक्षा एक महत्त्वाची गोष्ट आहे. ती म्हणजे या कागदपत्रातून मि. जेम्स बॉसवेल एसक्वायर यांचे आश्चर्यकारकपणे तपशीलवार आणि नजरेत भरेल इतके स्पष्ट असे जे शब्दचित्र आपणासमोर येते, त्यातच त्या कागदपत्रांना महत्त्व आहे. नव्याने सापडलेले कागदपत्र तपासून पाहाण्याअगोदर प्रा. पोट्टल

यांनी पुढील उद्गार काढले होते : "या नोंदवहीतही पेपी यांच्या नोंदवहीत जशी मोकळी ढाकळी व स्पष्ट विधाने आहेत तशीच आहेत."

समकालीन घटनांचा तो अत्यंत विश्वसनीय असा वृत्तांत आहे. भविष्यकाळात होणाऱ्या विकासाचा संदर्भ लक्षात घेऊन बेतलेले ते वृत्तांत नाहीत आणि बॉसवेल वयात आल्यानंतरच्या जीवनाने ही नोंदवही व्यापलेली आहे." बॉसवेल यांची अगदी मनापासून खात्री होती की आपल्या दैनंदिन संवेदनांतील चढ आणि उतार यांच्या अगदी तपशीलवार ठेवलेल्या नोंदीत सर्वसामान्यांना रस असणारच. बॉसवेल यांची ही मनोधारणा उपजत प्रवृत्तीसारखी होती. न्यूरॉटिक लोकांत सामान्यपणे ही भावना आढळते. बॉसवेल त्याला अपवाद नव्हते. बॉसवेल यांनी 'लाइफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथात स्वत:चे शब्दचित्र रेखाटले आहे. त्या शब्दचित्रात व या नोंदवहीत ज्या गोष्टी स्पष्टपणे लिहिलेल्या आहेत, त्यात मूलत: काहीही फरक केलेला वा झालेला नाही. लॉर्ड मेकॉले यांनी त्यांच्यावर जे आरोप केले आहेत त्यातून ते म्हणूनच दोषमुक्त होत नाहीत. उलट ते आरोप किती बरोबर व योग्य होते याबद्दल अगदी नको इतका दस्तऐवजी पुरावा आपल्या हाती या नोंदवहीद्वारा आलेला आहे. पण हे झाले, त्या नोंदवहीचे अगदी वरवरचे वाचन करणारांच्या बाबतीत.

परंतु या नोंदवहीच्या अनुषंगाने बॉसवेल यांच्या आयुष्यातील घटनांचा नव्याने अर्थ लावण्याची आवश्यकता आहे. लॉर्ड मेकॉले यांच्या दृष्टीने बॉसवेल हा एक निव्वळ मूर्ख मनुष्य होता. परंतु प्रा. पोट्टल यांनी असे दाखवून दिले आहे की निव्वळ आणि मूर्ख हे दोन्हीही शब्द बॉसवेल यांना लागू पडत नाहीत. त्यांच्या मते वस्तुत: आजवरच्या इतिहासात बॉसवेल हे अत्यंत गुंतागुंतीचे व्यक्तित्व होते. अनेक परस्परविरोधी प्रवृत्ती बॉसवेल यांनी प्रकट केल्या आहेत. त्यासुद्धा अस्वस्थ करील असा समतोल साधून बॉसवेल हे मूर्ख नव्हतेच. याउलट ते तसे चाणाक्षच होते. अनेक व्यक्तींच्या आणि खुद्द स्वत:च्याही हृदयात अगदी खोलवर डोकावून पाहाण्याची किमया त्यांच्याकडे होती. त्यांच्याकडे एक वेगळीच व खास प्रकारची तरलता व कुशाग्रता होती. चांगल्या प्रकारची विश्लेषणशक्ती असणारे आणि बौद्धिक दृष्ट्या तळात जाऊन शोध घेणारे ते व्यक्तित्व होते.

एवंच 'लाईफ ऑफ जॉनसन' हा चरित्रग्रंथ लिहिणारी व्यक्ती ही अशी होती. लॉर्ड मेकॉले यांना वाटले तसा तो दाखवेगिरी करणारा आणि दारूच्या नशेत भावनावश होणारा विदूषक नव्हता. बॉसवेल यांची काही वर्षापूर्वी सांपडलेली नोंदवही आणि 'लाईफ ऑफ जॉनसन' या चरित्रग्रंथाची तयार केलेली मुद्रणप्रत यांची तुलना केली असता, बॉसवेल यांनी आपला तो महान ग्रंथ सिद्ध करण्यासाठी काय काय केले ते समजते. त्या दोन संहितात जो फरक आहे, त्यात बॉसवेल यांच्या प्रयत्नांचे हुबेहूब प्रतिबिंब पडलेले आहे. डॉ. जॉनसन यांच्या मुखातून शब्द बाहेर पडत असताना, ते बॉसवेल यांनी झेलले आणि मग ते आपल्या चरित्रग्रंथात खरडले, असा अनेक वर्षे जो समज होता, तो या नोंदवहीने दूर केला. बॉसवेल यांनी

चरित्रलेखनासाठी पुढील पद्धतीचा अवलंब केला होता. बॉसवेल यांनी या कामासाठी आपली स्वत:ची लघुलिपी तयार केली. त्या लघुलिपीत तशी फारशी व्यवस्था नव्हती. पण ती कामचलाऊ खासच होती. एखाद्या घटनेनंतर लगेच बॉसवेल त्या लघुलिपीत त्या प्रसंगाचे टिपण करून ठेवीत असत. अनेक दिवस, किंवा महिने किंवा वर्षे लोटल्यानंतर त्या टिपणाच्या मदतीने त्या प्रसंगाचा ओघवता वृत्तांत लिहून काढीत.

प्रतिभेची चमक दाखविणारी ती निर्मिती होती. त्यांच्या नोंदवहीत असलेल्या अनेक कच्च्या टिपणांच्या आधाराने आणि अत्यंत परिश्रमपूर्वक जमविलेल्या इतर साहित्याची त्या टिपणात भर घालून बॉसवेल यांनी तो आपला महान चरित्रग्रंथ सिद्ध केला. या चरित्रग्रंथात आपण एखादा 'डॉ. जॉन्सनीय' प्रसंग वाचतो. तो प्रसंग लिहिला जाईपर्यंत, त्यातल्या मधल्या टप्प्यांचा शोध घेण्याची सोय बॉसवेल कागदपत्रांनी केलेली आहे. बॉसवेल यांनी त्या प्रसंगाच्या केलेल्या कच्च्या टिपणापासून, तो प्रसंग मुद्रित स्वरूपात वाचकांसमोर येईपर्यंतचा सर्व प्रवास आता आपणास माहिती झाला आहे. बॉसवेल हे केवळ एक किरकोळ वार्ताहर नसून ते प्रतिभावान साहित्यिक होते, याची जाणीव या नोंदवहीच्या मदतीशिवाय आपणास कधीही झाली नसती.

बॉसवेल यांनी आपल्या कागदपत्रांच्या संपादनाबद्दल आणि प्रकाशनाबद्दल अगदी स्पष्ट व तपशीलवार सूचना लिहून ठेवल्या होत्या याचा उल्लेख यापूर्वी आलेला आहे. तसे करताना, वरील परिच्छेदात सांगितलेल्या सर्व गोष्टी सर्वांस माहीत व्हाव्या हा हेतू त्यांच्या मनात असला पाहिजे. बॉसवेल यांची डॉ. जॉनसन यांच्याबरोबर घनिष्ट मैत्री होती. ही मैत्री पाहून अनेकांच्या मनात असूयाही निर्माण झाली होती. विशेषत: हे असे व इतरही लोक आपल्याकडे कोठच्या दृष्टिकोनातून पाहातात हे बॉसवेल यांना चांगले ठाऊक होते. वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास आपण त्या मैत्रीस किती लायक आहोत हे सिद्ध करण्यासाठी त्यांनी आयुष्य खर्ची घातले होते. अठराव्या शतकातील लंडनमध्ये बॉसवेल यांच्यासंबंधी अनेक अशक्य व अश्लील विनोद प्रसिद्ध होते. ते लक्षात घेता बॉसवेल यांची मनोवृत्ती कशी तयार झाली असेल हे कोणासही समजून येईल. म्हणूनच बॉसवेल यांना जगास असे दाखवून द्यावयाचे होते की त्यांना नुसतीच कीर्तीची हाव नव्हती, तर ज्या कीर्तीस आपण सर्वस्वी लायक आहोत अशा कीर्तीपाठीमागे ते होते.

आपल्या शत्रूंची तोंडे बंद व्हावीत, हा त्यांचा हेतू सिद्ध होण्यास केवळ काही अपघातामुळे दीडशे वर्षांचा काळ गेला. पण ते त्यांचे दुर्दैव ! कारण असे काही अपघात होतील याची अटकळ त्यांना नव्हे कोणालाच असणे शक्य नव्हते. एबनी– टेबलाचा कप्पा, क्रोक्वे खोका, मालाहिड एस्टेटीत असलेला गुरांचा गोठा – फेट्टरकेर्न वाड्यात सापडलेली अनेक पुडकी, या सगळ्या कागदपत्रांनी बॉसवेल यांच्या कीर्तीचे चांगल्याप्रकारे रक्षण केलेच. त्याचबरोबर लॉर्ड मेकॉले आणि इतर जे टीकाकार होते त्यांची तोंडे बंद करण्याचे काम या कागदपत्रांनी चांगल्याप्रकारे केलेले आहे. बॉसवेल सध्या जेथे कोठे असतील, तेथे ते हे सारे पाहून

खुशालतील व सुखावतीलही. याचे कारण ते आता स्वत:च्या अस्तित्वाची जाणीव कोणासही होऊ नये असे 'लाईफ ऑफ जॉनसन'चे चरित्रकार नाहीत किंवा लॉर्ड मेकॉलेने वर्णन केले होते, तसेही ते नाहीत. आपणास आज ते, बॉसवेल एक महान लेखक म्हणून परिचित आहेत.

(प्रा. फ्रेडरिक पोट्टल, लॉर्ड मेकॉले व इतर नामवंतांच्या लिखाणावर आधारीत)

---

**जगातील प्राचीनतम लेखन**

प्राचीनकाळी दगडावर, लाकडावर, पायप्रसवर किंवा शेळ्यामेंढ्यांच्या कातडीवर अक्षरे कोरली जात. त्यातील प्राचीनतम शिलालेख हा इजिप्शियन हायरोग्लीफिक्समध्ये लिहिलेला असावा. (ऑक्सफर्डमधील अॅश्मोलियन म्युझियममध्ये तो जतन करून ठेवलेला आहे) हा लेख थडग्यावरच्या कृत्रिम दाराच्या चौकटीवर कोरलेला आहे. त्या दरवाजाची चौकट अजूनही कैरोमधील बौलक (Baulak) म्युझियममध्ये अस्तित्वात आहे आणि त्याचा एकच तुकडा – ज्यावर शिलालेख आहे – डॉ. हटिंग्टन यांनी १६८३ मध्ये ऑक्सफर्ड विद्यापीठाला भेट दिला होता. त्याच्या एका बाजूला 'शेरा' ची बैठी आकृती आहे. शेरा म्हणजे सेंद (कदाचित सैंद – Send असावे) धर्मगुरू. दुसऱ्या बाजूला एका स्त्रीची बैठी आकृती आहे. दोघांमध्ये एक टेबल आहे. त्या टेबलावर व टेबलाखाली सैंदला दिलेल्या भेटी आहेत. सैंद म्हणजे द्वितीय वंशातील राजा होता. त्याचे घराणे १००० वर्षे राज्य करीत होते असे धरले तरीही त्या शिलालेखाचा काळ जवळजवळ ख्रि. पू. ४००० असा मानावा लागेल. यात सर्वाधिक आश्चर्याची गोष्ट अशी की इतक्या पुरातनकाळी कोरला गेलेला हा शिलालेख केवळ काही आकृती वा चिन्हे दाखवीत नसून चक्क वर्णाक्षरे दाखवतो. (महत्त्वाचा भाग वरच्या बाजूस कोरलेला आहे) त्यावरील राजाचे नाव सांगणारी मुद्रा वर्णाक्षरयुक्त आहे. ती अशी –

N

S = Send

D

या शिलालेखावरून स्पष्ट होणारी आणखी एक मनोरंजक गोष्ट अशी की, इजिप्शियन हायरोग्लीफिक्स हे आताच्या वर्णाक्षर मालेची पूर्व परंपराच दाखवीत आहे.

---

पुस्तके जेवढ्या काळजीपूर्वक प्रयत्नांनी लिहिली जातात तेवढ्याच गांभीर्याने व जाणीवपूर्वक ती वाचली गेली पाहिजेत.

–हेन्री डेव्हिड थोरो.

---





अनुक्रमणिका

# लेखमाला

## प्रेमपुजारी डी. एच्. लॉरेन्स

– श्रीकृष्ण कामत

### सहा

न्यूमोनियानं लॉरेन्सची मूळचीच दुबळी प्रकृती अधिकच खिळखिळी करून टाकली होती. त्याला क्षयाची बाधा झाली असल्याचे तो आणि त्याची बहीण अॅडा जाणून होती. एक ही गोष्ट गुपित ठेवण्याची सावधगिरी त्या दोघांनोही बाळगलेली होती. क्षयी व्यक्तींना समाजापासून खड्यागत बाजूला काढण्यात येतं, नोकरीचाकरीतून त्यांना दूर करण्यात येतं याची पुरेपूर कल्पना त्या दोघांना होती. शाळेत रुजू होणं, या अवस्थेत, परिस्थितीत त्याला शक्य नव्हतं. काय करावं हा प्रश्न त्याच्यापुढे आ वासून खडा होता. त्याची मावशी अॅडा हिचे यजमान प्राध्यापक फ्रिट्झ क्रेनकोव यांनी त्याला सुचवलं की जर्मन विद्यापीठात लेक्चररच्या जागेसाठी त्यानं प्रयत्न करावा. त्यांची कल्पना लॉरेन्सला पसंत पडली. पण तो मुलुख होता परका, तिथं ना ओळखदेख, जर्मन विद्यापीठात आपली वर्णी लागायची कशी? त्याला प्राध्यापक अर्नेस्ट वीकलींची आठवण झाली. 'नॉटिंगहॅम कॉलेज'मधील ते त्याचे शिक्षक. त्याच्या साहित्यिक गुणांचं त्यांना कौतुक होतं. त्यांच्या ओळखीची बरीच माणसं जर्मनीत होती. शिवाय तिथल्या काही विद्यापीठात त्यांनी लेक्चरर म्हणून कामही केलेलं होतं. लॉरेन्सला वाटलं, त्यांची मदत होईल, मार्गदर्शनही लाभू शकेल. आपला बेत त्यानं वीकलींपाशी व्यक्त केला. पदवी नसल्यामुळे लेक्चररची जागा आपल्या विद्यार्थ्याला मिळणं कठीण आहे याची जाणीव प्राध्यापक महाशयांना असली, तरी त्याला एकदम नाउमेद करणं त्यांच्या जीवावर आलं. त्या संदर्भात बातचीत करण्यासाठी त्यांनी त्याला घरी बोलावलं, भोजनाचं आमंत्रण दिलं. त्यावर लॉरेन्सकडून काहीच हालचाल झाली नाही तेव्हा मिसेस फ्रीडा वीकली हिनं त्याला चिठ्ठी पाठवून भोजनाचं पुन्हा एकवार आमंत्रण दिलं. एका 'लेडी'कडून आलेलं आमंत्रण! नकार देणं लॉरेन्सच्या स्त्रीदाक्षिण्याला शोभणारं नव्हतं. तिच्या आमंत्रणाला मान देऊन तो वीकलींच्या घरी पोचला. १९१२च्या मार्चच्या प्रारंभी. इथंच फ्रीडा त्याला प्रथम भेटली, प्रथम दर्शनीच ती त्याच्या मनात भरली.

लॉरेन्स आपल्या प्रेमात कसा पडला याबद्दल फ्रीडा नेहमीच आश्चर्य व्यक्त करत असे. त्याच्याहून ती सहा वर्षांनी मोठी. तीन मुलांची आई. थोरला मुलगा मॉंटेग्यू बारा वर्षांचा.



अनुक्रमणिका

त्याच्या पाठच्या दोन मुली एल्सा आणि बार्बरा अनुक्रमे दहा आणि आठ वर्षांच्या. देह थोडासा स्थूल पण अद्यापही पुरुषांना लैंगिक आकर्षण वाटावं असा काहीतरी लोभसपणा तिच्या व्यक्तिमत्वात होता. काहीशी वर आलेली गालाची हाडं. हिरवेगार डोळे. सौंदर्याला मिळालेली बिनधास्तपणाची जोड. बोलत असताना समोरच्या पुरुषाच्या नजरेला नजर भिडवण्याची तिची धिटाई. या पहिल्या भेटीनंतर लॉरेन्सनं तिला पत्र लिहून कळवलं की अख्ख्या इंग्लंडमध्ये ती सर्वात आकर्षक स्त्री आहे. आपल्यासारख्या घरंदाज विवाहितेला एका परक्या पुरुषानं, असं उघडपणे लिहावं याचा राग फ्रीडाला आला नाही. कपाळाला आठ्याही तिनं घातल्या नाहीत. किंबहुना तो विचारही तिच्या मनाला स्पर्शून गेला नसेल. तिनं उलट टपाली खट्याळ प्रश्न केला: 'इंग्लंडमधल्या बऱ्याच स्त्रिया तुझ्या ओळखीच्या नाहीत, मग तुला हे कसं काय कळलं?' तिच्याही काळजात लॉरेन्सनं अलगद शिरकाव केला होता.

फ्रीडा ही पूर्वाश्रमीची फॉन रिखठोफेन या जर्मन उमराव घराण्यातली. या घराण्याचा खानदानीपणा दोनअडीच शतकांचा. बॅरन ही किताबत वंशपरंपरेनुसार. फ्रीडाचे वडील फ्रेडरिक १८६२मध्ये वयाच्या सतराव्या वर्षी सैन्यात दाखल झाले. त्यानंतर आठ वर्षांनी झालेल्या फ्रांसबरोबरच्या युद्धात त्यांनी आपला उजवा हात गमावला. त्यांच्या मर्दुमकीबद्दल त्यांना 'आयर्न क्रॉस' मिळाला. मेट्झमधील लष्कराच्या कचेरीत 'ॲडमिनिस्ट्रेशन' विभागात त्यांना एक जागा देण्यात आली. त्यांचं लग्न झालं पण त्यांचा संसार सुखाचा मात्र झाला नाही. त्यांना तीन मुली झाल्या. एल्सा, फ्रीडा आणि जोहान्ना. एल्सा फ्रीडाहून पाच वर्षांनी मोठी तर जोहान्ना फ्रीडाहून तीन वर्षांनी लहान. एल्स बुद्धिमान. फ्रीडा वांड, देखणी. जोहान्ना सुमार बुद्धीची पण लावण्यवती.

मेट्झमधील सॅबलॉन या उपनगरातील एका टुमदार वाड्यात फ्रीडाचं सुखी बालपण गेलं. कुटुंब प्रॉटेस्टंट असूनही फ्रीडा आणि जोहान्ना यांचं शिक्षण कॅथॉलिक शाळेमधून झालं. फ्रीडा जात्याच उनाड. तिला वठणीवर आणणं नन्सनाही जमलं नाही. फ्रीडाच्या प्रगती-पुस्तकात तिच्या वर्तणुकीबाबत नेहमीच कडक शब्दात नाराजी व्यक्त केलेली असे. त्या शेऱ्यांची फ्रीडाला कधी दिक्कत वाटली नाही. तिला हवा असलेला मार्ग ती बिनदिक्कत चोखाळत असे. मुलींपेक्षा मुलांबरोबर हुंदडणं तिला मनापासून पसंत. घरात जोहान्नाशी तिचं विशेष सख्य. दोघींची बेडरूम एकच. तिथं दोघींची दंगामस्ती, हसणं खिदळणं, बाहुल्यांशी खेळणं, पियानोवर बीथोव्हेन बडवणं, भरपूर वाचणं.

वडील हे फ्रीडाचं परमदैवत. कैसरच्या एका वाढदिवशी १८७० मध्ये फ्रांसवर मिळवलेल्या विजयाची स्मृती साजरी करण्यासाठी एक समारंभ आयोजित करण्यात आला होता. त्या समयी सोजिर तिच्या वडलांना खांद्यावरून आदरानं वाहून नेताना पाहून तिचा ऊर अभिमानानं भरून आला होता. पण त्यांच्या देखण्या आणि करारी चेहऱ्याआड आत्मविश्वास

नसलेली व्यक्ती दडलेली आहे याची जाणीव वय वाढत गेलं तशी फ्रीडाला प्रकर्षानं होत गेली. आपल्या आईबरोबर त्यांची अधूनमधून उडत असलेली खडाजंगी ती पाहात होती. एक प्रसंग तिच्या स्मरणात कायमचा घर करून राहिला होता. रात्र झाली तरी वडील घरी परतले नव्हते. त्यांची वाट पाहात आई रात्रभर जागत बसली होती. शेवटी त्यांचं काय झालं आहे हे पाहाण्यासाठी तिनं एका चाकराला गावात पाठवलं. वडील परतले. त्यांचा फिकुटलेला, मानखंडनेनं शरमिंदा झालेला चेहरा फ्रीडाच्या मनात कायमचा ठसला. अधिकाऱ्यांच्या 'मेस'मध्ये मित्रांबरोबर सारी रात्र जुगार खेळण्यात त्यांनी घालवली असल्याचं उघडकीला आलं होतं. शेवटी व्हायचं तेच झालं. त्यांच्या जुगाराच्या नादापायी त्यांचं वडिलोपार्जित घर गहाण पडलं. त्या दिवसापासून आईवडिलांमध्ये दुष्मनी निर्माण झाली आणि ती मुलींदेखत उघड न करण्याची खबरदारी घ्यावी असं त्या दोघांनाही कधी वाटलं नाही. या पडत्या काळात आपल्याला माया मिळावी म्हणून ते मुलींकडे वळले. त्यांनी मुलींना सांगितलं की त्या कुणाशी लग्न करतात याची फिकीर त्यांना नाही, फक्त तो ज्यू, इंग्रज वा जुगारी नसावा. त्यांची ही इच्छा पुरी व्हावी असं विधिलिखित नव्हतं. थोरली मुलगी एका ज्यूची 'मिस्ट्रेस' बनली. मधलीनं इंग्रज पकडला, तर धाकटीचा नवरा जन्मजात जुगारी निघाला. आणि हे सगळं त्यांच्या हयातीत घडलं.

फ्रीडा सतरा आणि जोहान्ना पंधरा वर्षांच्या असताना ब्लॅक फॉरेस्टमधील मोराव्हिअन बंधूंच्या शाळेत त्यांना दाखल करण्यात आलं. आपलं घर सोडून जाण्यास फ्रीडा अजिबात तयार नव्हती. पण वडीलधाऱ्यांच्या इच्छेपुढं तिला नमावं लागलं. या शाळेतील एका शिक्षिकेबद्दल शाळकरी मुलीला असते तशी ओढ तिला वाटू लागली पण शिक्षिकेकडून उत्कट प्रतिसाद मिळताच मात्र ती घाबरून गेली. वर्षभरानं शाळा सोडताना ती भलतीच खूष झाली. त्यानंतर वर्षभर तिचे बर्लीनमधील चुलत काका ओसवाल्ड यांच्या घरी ती राहिली. उच्चभ्रू समाजात वावरावं कसं याचे पाठ घेण्यासाठी. ओसवाल्ड तेव्हा राज्याचे उप-सचिव होते. एका देखण्या तरुण मुलीच्या आयुष्यातील हा वर्षभराचा काळ विसरू म्हणता विसरता येणं अशक्य होतं : टिएरगार्टनमधील तिच्या चुलत्याचा प्रशस्त प्रासाद, बर्लीनच्या वस्तीमधून गाडीनं हिंडणं, उन्तेन देन लिन्देनमधील कॅफे आणि मद्यालये, संगीताच्या सुरावटीनं भारलेली नाट्यगृहे, रॉयल ऑपेरा हाऊसमधील वॅग्नरचे नाट्यप्रयोग, राजवाड्यातील नृत्यसमारंभ. अशाच एका नृत्यसमारंभात, तेव्हा जोहान्नाही बर्लीनला गेलेली होती, कैसरने विचारणा केली, ''त्या दोन तरुणी कोण?'' आणि प्रश्नाचं उत्तर मिळाल्यानंतर सम्राट उद्गारले, ''छान, उप-सचिवाला फार देखण्या पुतण्या आहेत.''

वयाच्या सोळाव्या वर्षी फ्रीडा कुर्ट फॉन रिखटोफेनच्या प्रेमात पडली. तो तिचा दूरचा चुलत भाऊ होता. 'मिलीटरी स्कूल'मध्ये शिकायला तो मेट्झला आला होता. हे प्रकरण

औटघटकेचं ठरलं, प्रेमभऱ्या चुंबनांच्या देवाणघेवाणीपुरतंच मर्यादित राहिलं. त्यानंतर दोन वर्षांनी लेफ्टनंट कार्ल फॉन मारबाहर तिच्या आयुष्यात आला. त्याचा जीव तिच्यात गुंतला पण तिचं चुंबन घेण्याचं, तिला लग्नाची मागणी घालण्याचं धैर्य मात्र त्याला झालं नाही. चाळीसएक वर्षांनंतर तिच्याबरोबरच्या लग्नाचा योग हुकल्याचा विषाद त्यानं तिला लिहिलेल्या पत्रात व्यक्त केला. लॉरेन्स तेव्हा हयात नव्हता.

फ्रीडाच्या लग्नाचा योग जुळून आला तेव्हा ती वीस वर्षांची होती. तिचा नवरा प्राध्यापक अर्नेस्ट वीकली यांचं वय होतं पस्तीस. त्यांचं बालपण लंडनमध्येच गेलेलं. त्यांचे वडील एका धर्मादाय संस्थेत तुटपुंज्या पगारावर नोकरीला. आई शाळेत शिक्षिका. काटकसरीनं संसार करणारी बाई. तिला नऊ मुलं झाली. त्यातील वीकली हे दुसरे. त्यांची शिकण्याची जिद्द दांडगी. शिक्षणासाठी त्यांनी कष्ट उपसले. लंडन विद्यापीठाची 'एक्सटर्नल' पदवी संपादन केली. केंब्रीज आणि सॉरबॉन येथे 'आधुनिक भाषे'चं शिक्षण घेतलं. जर्मनीतील फ्रीबर्गच्या विद्यापीठात इंग्रजीचे लेक्चरर म्हणून अल्पकाळ नोकरी केल्यानंतर ते इंग्लंडला परतले. 'नॉटिंगहॅम युनिव्हर्सिटी कॉलेज'च्या आधुनिक भाषाविभागात त्यांची नेमणूक झाली. तिथंच ते प्राध्यापक झाले. आर्थिक परिस्थिती सुधारली. १८९८मध्ये ते 'ब्लॅक फॉरेस्ट'ला सुट्टीत गेले असताना तिथं त्यांना फ्रीडा भेटली. फ्रीडाची ज्वानी तेव्हा ऐन बहरात होती. पण तिचं लावण्य पाहून ते तिच्यावर फिदा झाले आणि ते आपल्या प्रेमात अष्टांगी बुडालेले पाहून फ्रीडा भारावून गेली. त्यांचा देखणेपणा, भारदस्तपणा, नैतिक बाबींविषयींची त्यांची आस्था या गुणांवर ती लुब्ध झाली. वीकली मध्यमवर्गीय पण त्यांच्या मागणीला फ्रीडाच्या घरच्यांनी हरकत घेतली नाही. आपल्या इभ्रतीला साजेसा खानदानी नवरामुलगा मिळवण्याइतपत पैसा आपल्यापाशी नाही ही गोष्ट ते नजरेआड करू शकत नव्हते. २९ ऑगस्ट १८९९ रोजी फ्रीबर्ग येथे वीकली आणि फ्रीडा विवाहबद्ध झाली. लुसर्नला ते हनीमूनला गेले.

इ. डब्ल्यू. टेडलॉक ज्युनियरच्या 'फ्रीडा लॉरेन्स द मेम्वाअर्स (Memoirs) अँड कॉरस्पाँडन्स' मध्ये हनीमून एपिसोडचे दोन वेगवेगळे प्रसंग फ्रीडानं लिहिलेले आहेत. त्यातील एक 'कोमो सरोवरा'वरील आणि दुसरा लुसर्नमधला. या दोन्ही प्रसंगी नववधू कपाटाच्या टपावर चढून बसल्याचं वर्णन करण्यात आलं आहे. एका तजुर्म्यात दोन तासानंतर स्वत:विषयी अगदी जागरूक असलेल्या भेदरट इंग्रजांकडून कौमार्यभंग झाल्यानंतर,ती हॉटेलच्या बाल्कनीत जाऊन उभी राहाते, समागमाचा भयानक अनुभव आठवत. पुढील काळात एका पत्रातून फ्रीडानं कळवलं : "नुकताच विवाह झाला होता आमचा, चिंचोळ्या जिन्यातून मी धडपडत खाली उतरत होते, तो त्याच्या अभ्यासिकेतून बाहेर पडला, म्हणाला,"माय गॉड ! धरणीकंपाशी मी लग्न करून बसलोय !'' लॉरेन्सच्या 'फाइट फॉर बार्बरा' या नाटकात फ्रीडाच्या सुहागरातीचे पडसाद उमटलेले आढळतात.



अनुक्रमणिका

जेम्स वेसोन हा खाणकामगाराचा मुलगा बार्बरा ट्रेस्सिडेर या विवाहित तरुणीबरोबर पळून जातो. बार्बराचा नवरा फ्रेडरीक. वय वर्ष चाळीस. रूपानं देखणा. तो मार्ग काढत या प्रेमी युगलापाशी येऊन पोचतो. बार्बरा त्याला सुनावते की त्याच्या सान्निध्यात तिचं रक्त पेटून उठत नाही. "मला वाटलं होतं, आपलं लग्न म्हणजे सुखद गंमत – मला वाटलं होतं, माझ्या पुरुषाबरोबर मी छान छान रतिक्रीडा करीन. तुला आठवतं, लुसर्नमध्ये मी कपाटाच्या टपावरून खाली उतरले होते. मला वाटलं होतं, तू मला शोधशील आणि हसशील, आणि मला खाली उतरवशील. नाही, तू भेदरून गेला होतास. खोलीत यायलाही तू घाबरत होतास. तू दारात उभा राहिलास, चेहऱ्यावर मरणप्राय भीती. आणि मी खाली उतरले आणि नेहमी असंच घडत होतं – मलाच खाली उतरून यावं लागत होतं. मी अंतर्वस्त्रात होते माझे पाय हालवत,आणि तू भ्यालेला. मला खाली उतरावं लागलं. मी सांगते तुला, माझ्या लेखी ते माघार घेणं होतं." फ्रेडरीक तिला विचारतो की लहान पोरागत ती कपाटावर चढून बसली होती, तिथून त्यानं तिला खाली उतरवली नव्हती म्हणून ती त्याला सोडून गेली होती! ती उत्तर देते की तिला वाटत असतं की तिनं त्याच्यावर प्रेम करायला हवं, पण तिचं त्याच्यावर कधीच प्रेम नव्हतं.

नाटकातील वरील संवादाला वस्तुस्थितीचा आधार आहे हे नि:संशय. फ्रीडाची सुहाग-रात तिनं कल्पनेनं रंगवल्याप्रमाणं आनंदाच्या डोही डूब घेण्याजोगी निश्चितच नव्हती.

हनीमूनहून वीकली सहकुटुंब नॉटिंगहॅमला परतले. मॅप्पर्ली या उपनगरातील भक्कम घरात त्यांचा संसार सुरू झाला. फ्रीडाला घरात करण्याजोगं फारसं काही नव्हतंच. घरकामाची तिला सवय नव्हती, किंबहुना नावडच होती. स्वयंपाकीणबाई स्वयंपाकघर सांभाळत असल्यामुळं ती खूष होती. मुलांना सांभाळायला जर्मनीहून नानी आणली होती. वीकलींना मोकळा असा फारच थोडा वेळ मिळत होता. आधुनिक भाषा विभागप्रमुख म्हणून कराव्या लागणाऱ्या कामाव्यतिरिक्त आठवड्यातून तीन संध्याकाळी कामगारांच्या संस्थेत ते शिकवत होते. शनिवारी लेक्चर द्यायला केंब्रिजला जात होते. शिवाय लेखन होतंच. आपल्या पत्नीला एकटेपणाचा कंटाळा येऊ नये म्हणून शिलरच्या गीतांच्या छोट्या संग्रहाचं संपादन करायला त्यांनी तिला प्रोत्साहन दिलं होतं आणि हे काम आपल्या आवडीचं असल्याचं तिनं बोलूनही दाखवलं होतं. पण असल्या कामात तिचा जीव रमणारा नव्हता. सकाळी बाजारहाट, दुपारी पाहुण्यांच्या गाठीभेटी, फुटकळ घरकामं, बागकाम, कादंबऱ्यांचं वाचन, संध्याकाळी पियानोवादन. सकाळपासून रात्रीपर्यंत दर दिवशी तेच ते, तेच ते. काहीही 'चार्म' नसलेलं जीवन ! उलट तिच्या वहिणींचं आयुष्य कसं बहुरंगी ! बहुढंगी ! स्वछंद ! मुक्त !

१९००मध्ये फ्रीडाला मुलगा झाला. त्याच वर्षी जोहान्ना विवाहबद्ध झाली. तिचं वय होतं अठरा. तिचा नवरा होता तिच्याहून दुप्पट वयाचा लष्करी अधिकारी. या लग्नामुळं बर्लीनमधील उच्चवर्गीयात वावरणं, बड्याबड्यांच्या पार्ट्यांमधून मिरवणं तिला सहज शक्य

झालं होतं. शिवाय 'अफेअर्स' ना भरपूर वाव !

एल्स जात्याच तल्लख बुद्धीची. समाजशास्त्राचा प्रख्यात प्राध्यापक मॅक्स वेबर यांच्या मार्गदर्शनाखाली तिनं हायडलबर्ग विद्यापीठात 'सोशल इकॉनॉमिक्स'वर प्रबंध लिहून डॉक्टरेट मिळवली. ही पदवी संपादन करणाऱ्या मोजक्याच स्त्रियांमधील ती एक होती. तिच्या रूपगुणांवर भाळून तिच्यामागे बरेच इच्छुक होते. त्यांना नाकारून तिनं नवरा म्हणून निवड केली, डॉ. एडगर जाफ्फे या हायडलबर्गमधील तिच्या शिक्षकाची. त्याच्यावर तिचं प्रेम नव्हतं. तिनं त्याची श्रीमंती पाहिली. त्यायोगे वडिलांना आर्थिक साहाय्य करणं तिला शक्य होणार होतं. शिवाय तिच्या प्रेमप्रकरणांचा बाऊ करण्याचा मिस्टर जाफ्फेचा स्वभाव नव्हता. पुरोगामी विचारवंताच्या यजमानीणपदाची धुरा ती यशस्वीपणे सांभाळत होती.

आपल्या दोन्ही बहिणींच्या सौख्याचा, सुरस जीवनाचा फ्रीडाला हेवा वाटू लागला, स्वत:ची कीव वाटली. आपलं हे एकसूरी, रटाळ आयुष्य थोडंफार सुसह्य करण्यासाठी ती विवाहबाह्य अफेअर्सकडे वळली. जगात स्वत:चं स्थान निर्माण करण्याची जिद्द बाळगणाऱ्या, लैंगिक संबंधांना कमी लेखणाऱ्या, लॉरेन्सच्या इतर मैत्रिणींप्रमाणं फ्रीडा नव्हती. तिला कुठलीच महत्त्वाकांक्षा नव्हती. बौद्धिक गोष्टींमध्ये तिला अजिबात रुची नव्हती. मादाम एम्मा बोवरीप्रमाणं जीवन सर्वांगानं जगायचं एवढीच तिची इच्छा होती.

तिचा पहिला प्रियकर होता विल डॉसन. एक सुखवस्तू लेस-उत्पादक. तो राहात होता त्या भागात पहिली मोटर आली होती ती त्याची. आपल्या मोटरमधून तो फ्रीडाला शेरवूड फॉरेस्ट या संकेत स्थळी गुपचूप घेऊन जात होता. या प्रकरणात ती भावनिकदृष्ट्या गुंतलेली नव्हती. त्यांच्या संगतीत दुपार घालवल्यानंतर मुलांच्या ओढीनं ती लगबगीनं घरी परतत होती. फ्रीडाच्या या प्रकरणाचा संशय वीकलींना कधी आला नाही.

१९०७ला फ्रीडा म्युनिचला गेली तेव्हा एका नव्या प्रकरणामध्येच गुंतली गेली. या वेळचं तिचं हे प्रकरण तसं धाडसाचं होतं.

फ्रीडाची बहीण एल्स आपल्या बाळपणीची मैत्रीण फ्रीडा ग्रॉस हिच्याकडे या काळात राहात होती. या मैत्रिणीचा नवरा ऑटो ग्रॉस. ग्रॉस मानसशास्त्रवेत्ता होता. अभिव्यक्तीवादी कवी, चित्रकार, समलिंगसंभोगी आदी रूढी झुगारून देणाऱ्यांच्या वर्तुळात त्याचा वावर असे. या वर्तुळात फ्रांझ वेडेकिन्ड अधूनमधून हजेरी लावत असे. लैंगिक बाबी खुल्लंखुल्ला बोलणारा, प्रतिभावंत नाटककार म्हणून त्याची ख्याती होती. या वर्तुळात ग्रॉसलाही प्रतिभावंत म्हणून मान्यता लाभलेली होती. तीस वर्षाचा ग्रॉस तसा सुंदर म्हणता येण्याजोगा नव्हता. पण स्त्रिया त्याच्यावर भाळत एवढं बरीक खरं होतं. फ्रीडाही त्याच्यावर भाळली.

ग्रॉस हा सिगमंड फ्रॉइडचा शिष्य होता. फ्रॉइडचं नाव फ्रीडानं प्रथम ऐकलं ते ग्रॉसच्या तोंडून. फ्रॉइडचे काही सिद्धांत त्यानं तिला समजावून सांगितले. मानवी अनुभवाच्या केंद्रस्थानी लैंगिक परिपूर्तीची ओढ असते आणि लैंगिक सुख देता येणं, घेता येणं ही माणूस म्हणून

लायक असल्याची खूण आहे अशी त्याची धारणा होती. मुक्तीच्या या साक्षात्कारानं भारून जाऊन फ्रीडानं त्याचा प्रियकर म्हणून स्वीकार केला आपलं कुणीतरी कौतुक करायला हवं ही तिची फार दिवसांची इच्छा पहिल्यांदाच फलद्रूप झाल्यामुळं ती आनंदित झाली आणि एल्सला डावलून त्यानं आपल्याला जवळ केल्यानं तिचा आनंद द्विगुणित झाला. एल्सचं आधीपासून ग्रॉसबरोबर 'अफेअर' होतं. त्याच्यापासून तिला गर्भ राहिला होता. आपण बाजी मारल्याच्या कैफात फ्रीडा स्वगृही परतली तेव्हा तिच्यात लक्षणीय बदल झालेला होता. हा बदल तिच्या छोट्या मुलांच्या नजरेतूनही सुटला नव्हता. एकजण म्हणालंही : "आमची पूर्वीची आई तू नव्हेस. आमच्या पूर्वीच्या आईचं कातडं तेवढं तुझ्यावर आहे, पण जी इथून गेली होती ती आमची आई तू नव्हेस.''

घरी परतल्यानंतरही फ्रीडा ग्रॉसला पत्रं लिहीत होती. त्याचीही उत्तरं तिला येत होती. पत्रं खाजगी होती पण ती वाचून झाल्यानंतर ती जाळून टाकण्यास तिच्या मनाची तयारी होत नव्हती. तिनं ती जपून ठेवली होती. दैवी देणगी अशा शब्दात तिच्या लैंगिक जोषाचं कौतुक त्यानं आपल्या पत्रांमधून केलं होतं. फ्रीडा सांगते : 'या मित्रानं माझ्यासाठी खूप केलं. रूढीप्रिय जीवनात मी झोपेत चालणाऱ्या व्यक्तीप्रमाणं जगत होते आणि त्यानं माझ्यामधील अस्सल स्वत्वाला जाग आणली.

'जन्माला येणं आणि पुनर्जन्म होणं ही सरळसोपी गोष्ट नाही, आणि जे स्वत्व इतरांहून तुम्हाला एकट्याला वेगळं काढतं त्या तुमच्या अंगभूत स्वत्वामध्ये तुमचा पुनर्जन्म होणं ही प्रक्रिया क्लेशकारक आहे.

'माणसं कामभावनांविषयी जेव्हा बोलतात, तेव्हा त्यानं काय म्हणायचं असतं मला ठाऊक नाही. जणू काही कामभावनेनं वेडकाप्रमाणं स्वत:हून उडी मारलेली आहे. जणूकाही कामभावनेचा जीवनाशी, स्वत:च्या वाढीशी, स्वत:च्या परिपक्वतेशी काहीही संबंध नाही. कामभावना म्हणजे लोक काय समजतात हे नेहमीच माझ्या आकलनाच्या बाहेरच राहील,पण माझ्या लेखी कामभावना हे एक गूढ आहे.'

जीवन सिद्धांतांच्या चौकटीत बसवणं उचित नव्हे. मी असं ठाम समजत होते की जर कामभावनेला मुक्त वावरू दिलं तर जगाचं तत्काळ स्वर्गात रूपांतर होईल. समाजाच्या विरोधात मी क्लेश भोगले, झगडले, आणि मी अगदी एकाकी पडल्याचं मला जाणवलं. या प्रकियेत माझा तोल बिघडला. मला एकाकीपणा जाणवला. माझ्याहून वेगळा विचार करणारे एवढे लाखो लोक असताना मी एकटी काय करू शकणार होते! पण मी हार मानली नाही, शरणागती पत्करली नाही. माझी भावना शत्रुत्वाची नव्हती, त्यांच्याहून मी वेगळी असल्याची भावना होती. समाजापुढं मान तुकवणं मला अशक्य होतं आणि लॉरेन्सचं आगमन झाले.

१९१२च्या एप्रिलमध्ये लॉरेन्सनं फ्रीडाच्या आयुष्यात पाऊल टाकलं तेव्हा ऑट्टो ग्रॉस प्रकरण संपुष्टात येऊन पाच वर्षं उलटून गेली होती. रटाळ दैनंदिन जीवनाचा तिला मनस्वी

कंटाळा आलेला होता. आपलं स्वत:चं जिणं म्हणजे 'झोपेतलं चालणं' असं ती म्हणत असे. तिचा नवरा तिला चांगलं वागवत होता. आपल्या मुलांवर तिचं निरतिशय प्रेम होतं. परंतु तिची जीवनतृष्णा तृप्त व्हावी असं काही तिच्या आयुष्यात घडत नव्हतं. आणि ही गोष्ट लॉरेन्सनं चट्कन हेरली होती.

वीकलींनी तिला लॉरेन्सचं काही लिखाण – बहुधा 'पॉल मोरेल'ची काही पानं – – – दाखवलेलं असावं. अंथरुणात पडून ते वाचत असताना पाहिल्याचं स्मरतं असं तिचा मुलगा मॉंटेग्यू सांगतो. आणि तिची मुलगी बार्बरा म्हणते की 'आपल्या संध्याकाळच्या वर्गामधला एक प्रतिभावंत' असा त्याचा उल्लेख वीकलींनी फ्रीडापाशी केला होता. म्हणूनच लॉरेन्सचं व्यक्तिमत्त्व छाप पाडण्याजोगं असणार असं ती समजून चालली होती. पण त्याचं प्रथम दर्शन झालं तेव्हा तिच्या नजरेला पडला, सरळसोट तंगड्याचा एक उंच हाडकुळा देह. पण त्याच्या हालचालींमधला आत्मविश्वास तिला जाणवला, त्याची शारीरिक दुर्बलताही तिच्या नजरेतून निसटली नाही. 'नजरेला पडत होतं त्याहून अधिक असं त्याच्यापाशी होतं. कुठल्या जातीचा हा पक्षी आहे?'

लॉरेन्स वीकलींच्या घरी भोजनाला गेला होता. जेवायला बसण्याआधी अर्धा तास तो आणि फ्रीडा तिच्या खोलीत बोलत बसले. मुलं बाहेर हिरवळीवर खेळत होती. लॉरेन्स त्याच्या नेहमीच्या हातवाऱ्यांसकट त्याच्या आयुष्यात आलेल्या स्त्रियांविषयी बोलला, त्यांचा आपल्याला किती वीट आला आहे हेसुद्धा सांगून तो मोकळा झाला. पहिल्या भेटीतच त्यानं आपल्याशी असं तळमळून बोलावं याचा फ्रीडाला विस्मय वाटला. तिला आजवर भेटलेल्या कुठल्याही इंग्रजांपेक्षा तो तिला अधिक आवेशी वाटला. त्यांचं इडिपसविषयी बोलणं झालं असल्याचं फ्रीडानं नमूद केलं आहे, पण त्यांचं हे बोलणं मानसशास्त्राच्या संदर्भात झालं की सोफोक्लीजच्या नाटकाच्या संदर्भात हे मात्र स्पष्ट नाही. भोजनानंतरही काळोख दाटेपर्यंत तो वीकलींच्या घरी होता. त्यानं वीकलींचा निरोप घेतला तेव्हा फ्रीडाच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी त्याच्यावर पडलेली होती. भारावलेल्या अवस्थेतच त्यानं घरची वाट धरली. रात्र अंधेरी होती. वाट आठेक मैलांची होती. पण हे अंतर त्यानं केव्हा पार केलं हे त्याचं त्यालाही कळलं नाही.

जेवत असताना फ्रीडा तिच्या नवऱ्याकडे नीट लक्ष देत नसल्याचं लॉरेन्सच्या लक्षात आलं होतं. तिला तो दुसऱ्यांदा भेटला तेव्हा त्यानं तिला सुनावलं, "तुझ्या नवऱ्याचा तू विचारही करत नाहीस, त्याला तू खिजगणतीतही घेत नाहीस." त्याचं हे रोखठोक बोलणं तिला रुचलं नाही.

त्यानंतर ईस्टरच्या रविवारी लॉरेन्स फ्रीडाकडे पोचला. मोलकरणी कामानिमित्त बाहेर गेल्या होत्या. मुलं बाहेर बागेत ईस्टर अंडी शोधत होती. पाहुण्यासाठी चहा करावा म्हणून ती स्वयंपाकघरात गेली. पण गॅस चालू कसा करायचा हेच मुळी तिला ठाऊक नव्हतं. तिच्या

या अज्ञानाबद्दल लॉरेन्सनं तिची कानउघाडणी केली. बॅरनची मुलगी, प्रोफेसराची पत्नी, -असली बोलणी ऐकायची सवय तिच्या मानी मनाला नव्हती.

'लॉरेन्सनं मला खरोखरीच ओळखलं. अगदी सुरुवातीलाच त्यानं माझा आरपार वेध घेतला. चेहरा हसरा ठेवण्यासाठी मी किती शिकस्तीनं प्रयत्न करत होते. मी समजत होते, दुःखी असणं फार तिरस्करणीय, लज्जास्पद आणि ओंगळ आहे. परंतु त्यानं माझ्या कठीण कवचाचा वेध घेतला.'

त्यांच्यामधली जवळीक हळूहळू वाढीला लागली.

'एक दिवस डर्बिशायरमधील स्टेशनवर आम्ही भेटलो. माझ्या दोन छोट्या मुली आमच्या बरोबर होत्या. वसंतात बहरलेल्या वनराईमधून, शेतमळ्यांतून आम्हीं खूप खूप चाललो. मुली इकडे तिकडे धावपळ करत होत्या.

'आम्ही एका छोट्या ओढ्यापाशी आलो. त्यावर एक छोटासा दगडी पूल होता. लॉरेन्सनं मुलांसाठी कागदाच्या होड्या बनवल्या, त्यात काड्या ठेवल्या आणि पुलाखालून उताराकडे वाहाणाऱ्या प्रवाहात सोडून दिल्या. नंतर त्यानं डेझीची फुलं ओढ्यात ठेवली. ऊर्ध्वमुखी फुलं तरंगत जाऊ लागली. ओढ्याकाठी गुडघे टेकून तो वाकला होता, तिथं मुलांबरोबर खेळत होता, लॉरेन्सला माझा पूर्णपणे विसर पडला होता.

'तत्क्षणी मला कळून चुकलं माझं त्याच्यावर प्रेम आहे. माझ्यामधील अनोख्या हळुवारपणाला त्यानं स्पर्श केला होता.'

एका रविवारी लॉरेन्स फ्रीडाच्या घरी गेला. वीकली आणि मुलं बाहेरगावी गेली होती. तिनं लॉरेन्सला सुचवलं की आजची रात्र त्यानं तिच्या संगतीत घालवावी. तो म्हणाला, "तुझा नवरा बाहेरगावी गेला असताना त्याच्या घरात मी राहाणार नाही, पण तू त्याला सत्य परिस्थिती सांगायला हवीस. मग आपण दोघंही मिळून दूर कुठंतरी जाऊ, कारण माझं तुझ्यावर प्रेम आहे.'"

लॉरेन्सला जाणवलं होतं की फ्रीडाच्या डोक्यात 'सेक्स'नं बजबजपुरी माजवलेली असली, तरीही, त्याला हवी तशी एक स्त्री तिच्या रूपात त्याला अखेर आढळली होती. तिच्या चोरट्या प्रेमसंबंधाला आपण संमती दिली तर आपण अप्रामाणिक,नीच ठरू ही टोचणी त्याला होती. ज्या स्त्रीची ओळख होऊन सहा आठवडेही झाले नव्हते तिला तिचं सुखासीन आयुष्य आणि तो यातून निवड करायला आपण सांगत आहोत, हा निर्णय घेणं किती अवघड आहे याचं भान त्याला होतं, फ्रीडालाही होतं. बायको सोडून गेल्याचं कळून येताच आपला नवरा कोलमडून पडेल याची जाणीव तिला होती. शिवाय मुलांपासून अलग होण्याचा विचारही ती सहन करू शकत नव्हती. लॉरेन्सच्या सांगण्यानुसार पाऊल उचलणं जोखमीचं होतं. तरीही अखेर तिनं ती जोखीम पत्करली. तिनं त्याला सुचवलं की त्यानं तिला जर्मनीत सोबत करावी. तिचे वडील लष्करात दाखल झाले या घटनेला पन्नास वर्षं होत होती.

त्यानिमित्त होणाऱ्या समारंभाला ती ४ मे रोजी निघणार होती. तिच्या प्रवासाची तयारी पूर्ण झाली होती. तिनं त्याला आश्वासन दिलं की ती वैवाहिक जीवनात किती दुःखी आहे हे ती नवऱ्याला सांगेल.

फ्रीडाच्या मनात काय चाललं आहे याचा काहीच थांगपत्ता लागत नसल्यानं लॉरेन्सचा जीव टांगणीला लागला होता. दिल्या शब्दाला ती जागेल याची त्याला खात्री नव्हती. 'निदान एक आठवडा तरी आपण एकत्र राहू' असं समाधान त्यानं गार्नेटला लिहिलेल्या पत्रात व्यक्त केलं होतं. जर्मनीला निघायच्या आधी फ्रीडाला घेऊन तो गार्नेटच्या घरी गेला होता. तत्पूर्वी त्यानं गार्नेटला लिहून कळवलं होतं : 'मिसेस वीकली जनरूढी ठोकरणारी आहे, पण खरंच चांगली आहे. तिच्यासारखी स्त्री अद्याप तुझ्या पाहाण्यात आली नसेल, यावर मी पैज मारतो.'

प्रयाण तीन दिवसावर येऊन ठेपलं आणि लॉरेन्सच्या जीवाची तगमग सुरू झाली :

'मला फार उद्विग्न आणि असाहाय्य वाटत आहे. एकूण घडामोडींनी तुलाही त्रस्त केल असणार--- आजारी असल्याची ही भावना. ओठ घट्ट मिटून घेणं आणि भिंतीकडे पाहात प्रतीक्षा करत राहाणं यावाचून अन्य काही करणं अशक्य.

'---मला ट्रेनसंबंधी माहीत असायला हवं : जर्मनीला तू केव्हा जायला निघणार आहेस, कोणत्या दिवशी, किती वाजता, कुठल्या रेल्वेनं, कुठल्या वर्गानं? तुला शक्य असेल तेवढ्या लौकरात लौकर मला सांग, मी तरी आणखीन काय करू शकतो? तू सांगशील त्या वेळेला मी येईन, पण मला ती माहीत असायला हवी.

'तुझ्या मनात पागल भिंगरी भिरभिरत असेल. मला असाहाय्य आणि सुकाणू नसल्यागत वाटत आहे, एक महामूर्ख. कृपा करून, मला काहीतरी सांग आणि निश्चित असं काहीतरी. पृथ्वीवर जे शक्य असेल ते काहीही मी तुझ्यासाठी करीन आणि काहीही करू शकणार नाही--मातीतून बाहेर पडून चावा घेणाऱ्या आणि दात घट्ट रोवून लोंबकळत राहाणाऱ्या ईल माशागत माझी अवस्था झाली आहे. माझा उत्साह ओसरून जाण्याची मला भीती वाटते.'

'उद्या १. २५ ला मी किंग्ज क्रॉसला पोचतो. चालेल ना? हे बघ, मी आज येऊ शकणार नाही. कारण लाँड्रीच्या कपड्यांची मी वाट पाहात आहे. शिंप्याकडूनही काही कपडे मिळायचे आहेत. मी शुक्रवारची तयारी केलेली आहे. गुरुवारी अशक्य आहे. हे सारं तापदायक होतं आहे, क्षमस्व.'

'तू किंवा दुसरं कुणी मला किंग्ज क्रॉसला भेटेल का? शक्य नसल्यास भल्या पहाटे मला तार कर, काय करणार, आपण ज्या परिस्थितीत आहोत ती जीवघेणी आहे.'

'मला सतत तुझीच चिंता वाटते. हा अपमान नाही ना? पण तुला भेटेपर्यंत मोकळेपणानं श्वास घेणं मला मुष्कील आहे. यावेळी, उद्या, निश्चितपणे, मी लंडनमध्ये असेन.'

तुझ्या खर्चासाठी काही पैसे तुझ्यापाशी असतील अशी आशा करतो. मला फक्त अकरा पौंड मिळू शकले ------ अकरा पौंड आपल्याला मेट्झपर्यंत घेऊन जातील, नंतर माझ्या मेंदूला मला त्रास द्यावा लागेल.'

फ्रीडानं लॉरेन्सला दिलेला शब्द थोड्या फार प्रमाणात पाळला. प्रयाणाच्या अगदी शेवटच्या घटकेला आपल्या वैवाहिक जीवनातल्या व्यथेची तिनं तिच्या नवऱ्यापाशी वाच्यता केली, विल डॉसन आणि ऑट्टो ग्रॉस यांच्या नावांचा उल्लेख करून आपण त्याच्याशी बेईमानी केली असल्याची कबुली दिली, पण लॉरेन्सबरोबर आपण जर्मनीला जात आहोत हे सांगण्याचं मात्र तिनं टाळलं. त्याहूनही विशेष म्हणजे आपण त्याला कायमचे सोडून जात आहोत याची गंधवार्ताही त्याला लागू दिली नाही. आपल्या मुलाला तिनं त्याच्या वडिलांकडेच ठेवलं आणि दोन्ही मुलींना त्यांच्या आजोबांकडे, हॅम्पस्टेडला नेऊन पोचवलं. आपल्या मुलांच्या ताटातुटीच्या दु:खानं ती व्यथित झाली. पण आपले अश्रू तिनं गिळले आणि शुक्रवार ३ मे १९१२ रोजी लॉरेन्सबरोबर खाडी पार केली. इंग्लंड दृष्टीआड होईपर्यंत दोघंही दोरखंडावर बसून राहिले. निळ्याभोर समुद्रावर आपण दोघंच आहोत, एकमेकांच्या सन्निध्यात, या भावनेनं त्यांचा जीव लहान मुलांगत सुखावला. भविष्यात काय वाढून ठेवलं आहे याचा विचारही त्यांच्या मनाला स्पर्शून गेला नाही.

मेट्झला पोचताच लॉरेन्स आणि फ्रीडा एकाच हॉटेलमध्ये उतरले. पण दोघांच्या खोल्या वेगवेगळ्या होत्या. समारंभासाठी आलेल्या नातलगांनी, मित्रांनी वडिलांचं घर भरून गेलं होतं म्हणून, तद्वतच लॉरेन्सचा जास्तीत जास्त सहवास लाभावा या हेतूनं फ्रीडानं हॉटेलमधली खोली घेतली. परंतु वडिलांच्या घरीच बराच वेळ घालवावा लागत असल्यानं त्यांच्या भेटीगाठी तुरळक होत्या. तिची घालमेल, अस्वस्थता त्याच्या नजरेतून सुटलेली नव्हती. आपल्या बहिणींशी त्याची ओळख करून देण्यासही ती कचरत होती. आपल्याहून कितीतरी पटीनं यशस्वी ठरलेल्या त्या दोघी आपल्याला हिणवतील ही धास्ती तिला छळत होती.

वीकलींच्या तारापत्रांनी फ्रीडाचा जर्मनीपर्यंत पाठपुरावा केला. काहीतरी गडवडगुंडा असल्याचं तिच्या आईवडिलांना जाणवलं. तिनं लॉरेन्सचा उल्लेख न करता नवऱ्याला सोडचिठ्ठी देण्याचा आपला विचार असल्याचं त्यांच्या कानावर घातलं. तिच्या वडिलांना धक्का बसला. ते म्हणाले,''तू समजूतदार आहेस असं मी समजत होतो.'' तिनं फक्त एल्सच्या कानात सांगितलं,''माझ्याबरोबर एका पुरुषाला आणलं आहे.''

आणि लॉरेन्सना प्रथम भेटली ती एल्सच. मेट्झ रेल्वे स्टेशनवर. तिला तो लाजराबुजरा वाटला. तो सद्गृहस्थ असल्याचंही तिला जाणवलं. त्यानंतर काही दिवसांनी जोहान्नाशी त्याची गाठ पडली. मेट्झमधील एका मेळ्यात कापडी टोपी आणि रेनकोट घालून तो भटकत होता. त्या मेळ्याला जोहान्नाही आली होती. हिंडताहिंडता अकस्मात दोघंही

एकमेकांसमोर आले. ज्या भेटीला फ्रीडा घाबरत होती ती भेट अशी अवचित घडून आली होती. जोहान्ना बर्लीनच्या उच्चभ्रू समाजातील अधिकाऱ्यांसमवेत मिरवणारी, लॉरेन्सच्या गावंढळ पोषाखावरून तिचं त्याच्याबद्दलचं मत प्रतिकूल झालं तर ? त्याचा गावंढळपणा, त्याचं दारिद्र्य तिच्या नजरेनं टिपलं. तो पक्का इंग्रज असल्याचं तिच्या ध्यानी आलं, त्याचबरोबर त्याचा आत्मविश्वासही तिला जाणवला. तिनं फ्रीडाला सांगितलं : "तो कधीही तुला अंतर देणार याविषयी खात्री बाळग." फ्रीडा निर्धास्त झाली.

आयुष्यात प्रथमच परक्या देशात आलेला लॉरेन्स खोलीत एकटाच बसून राहात होता. जीव कंटाळला की एकटाच हिंडत होता. असं चोरून चोरून राहाण्या-वावरण्यानं तो उद्विग्न झाला होता. 'पॉल मोरेल' कादंबरीवर परीष्करण करण्यात त्याचं लक्ष लागत नव्हतं. ७ मे ला त्यानं फ्रीडाला लिहिलं : 'आता आणखीन सोसणं मला अशक्य आहे. गेले दोन तास मी जागचा हाललेलो नाही. नुसता बसून आहे, विचार करतो आहे.' त्यानं आग्रह धरला की वीकलींना तिनं सत्य परिस्थिती सांगावी, त्यानं स्वतःही त्यांना पत्र पाठवलेलं आहे. 'आणखीन बेइज्जती नको. आणखीन छक्केपंजे नकोत. त्यांना काय हवं ते करू दे--- पण आणखीन बेईमानी नको, फसवणूक नको--- नाही मला हे सहन करणं शक्य नाही, कारण हे औचित्याला धरून नाही. माझं तुझ्यावर प्रेम आहे. कुठल्याही परिस्थितीला आपण तोंड देऊ, काहीही करू, काहीही सोसू. पण खातेऱ्याखाली हे सरपटणं सहन करणं मला अशक्य आहे.' ही परिस्थिती म्हणजे त्याच्या छातीभोवती आवळलेला दोरखंड त्याला मोकळेपणानं श्वास घेऊ न देणारा अडसर. तो स्वत: दु:खी कष्टी होता. तरीही फ्रीडानं कष्टी होऊ नये म्हणून तिची समजूत घालत होता. 'माझं तुझ्यावर प्रेम नसतं तर तुझं खोटंनाटं करणं मी मनावर घेतलं नसतं. पण माझं तुझ्यावर प्रेम आहे,आणि प्रभो, त्याची किंमत मला मोजावी लागते आहे.'

लॉरेन्स आणि फ्रीडा चोरून एकमेकांना शक्य होईल तेव्हा भेटत होते. असेच एकदा ते हिंडत असताना, त्यांच्या इंग्रजी संभाषणावरून पोलीसाला संशय आला. त्याच्या मनानं घेतलं की लॉरेन्स हा ब्रिटिश हेर आहे. लॉरेन्स तुरुंगातच जायचा पण फ्रीडाच्या वडिलांनी फ्रीडाच्या सांगण्यावरून रदबदली केली आणि लॉरेन्सचा बंदिवास चुकला. पण त्यांचं अस्तित्व फ्रीडाच्या कुटुंबीयांसमोर उघडकीला आलं. पोलिसांचा ससेमिरा त्याच्या मागे लागायला नको म्हणून मेट्झपासून पन्नास मैलावर असलेल्या त्रिएरमध्ये (Trier) त्यानं जाऊन राहावं असं ठरवण्यात आलं. पण तिथं निघण्यापूर्वी फ्रीडानं त्याला वडिलांच्या घरी चहाचं निमंत्रण दिलं. 'त्यांनी एकमेकांकडे रागानं धुमसत पाहिलं– माझे वडील शंभर नंबरी बॅरन. लॉरेन्स, खाणकामगाराचा मुलगा. माझ्या वडिलांनी, शत्रू असल्यागत लॉरेन्सला सिगारेट ऑफर केली. त्या रात्री मला स्वप्न पडलं की त्यांची मारामारी जुंपली आणि लॉरेन्सनं माझ्या वडिलांचा पराभव केला.'

त्रिएरमध्ये लॉरेन्सलाही स्वप्न पडत होती. एका स्वप्नात अर्नेस्ट वीकली त्याच्यावर भयंकर संतप्त झाले होते. नंतर ते शांत झाले. लॉरेन्सला त्यांचं सांत्वन करावं लागलं. स्वप्नातल्या या भेटीचा एवढाच वृत्तांत त्यानं फ्रीडाला कळवला. 'तपशील मी तुला सांगणार नाही' असं लिहिलं. त्यावरून स्वप्नामधलं हे भांडण निव्वळ शाब्दिक नसावं !

मेट्झ लॉरेन्सच्या मस्तकात गेलं होतं. जर्मन सोजिरांनी गजबजलेल्या तिथल्या रस्त्यांवरून हिंडणं त्याला नकोसं वाटे. त्रिएर त्याला आवडलं. इथं बराकी फारशा नव्हत्या. इथं सोजिरांपेक्षा पाद्रीच अधिक होते. ११-१२ मेच्या विकएन्डला फ्रीडा काही दिवसांसाठी त्रिएरला जाऊन त्याला भेटली. पुढील भेट म्युनिच येथे ठरली. तिथं एल्स राहात होती आणि तिला भेटायला फ्रीडा जाणार होती.

लॉरेन्सनं वीकलींना लिहिलेलं पत्र १० मेला त्यांच्या हाती पडलं. अठरा महिन्यानंतर हे पत्र घटस्फोट प्रकरणाच्या प्रारंभीच्या काळात कोर्टापुढं सादर करण्यात आलं. त्याच वेळी काही वर्तमानापत्रामधूनही ते प्रसिद्ध केल्याचं पुढं आढळून आलं. या पत्रात लॉरेन्सनं लिहिलं होतं-----

'मिसेस वीकलींनी तुम्हाला सर्व काही सांगितलं असेल, पण क्लेश भोगणारे तुम्ही एकटेच नाहीत. आपण तिघे आहोत, अर्थात तुमच्या क्लेशाची तुलना माझ्या क्लेशाशी मी करत नाही. या परिस्थितीत राहाणं म्हणजे निव्वळ छळ आहे. इथं एक दूरचा स्नेही म्हणून आहे, यात लांडीलबाडी किती आहे याची कल्पना तुम्ही करू शकता. याचा मिसेस वीकलीला तिटकारा आहे, पण इलाज नाही. तुमच्या पत्नीवर माझं प्रेम आहे आणि तिचं माझ्यावर प्रेम आहे. मी छचोर वा उद्धट नाही. आपली वाढ खुरटली जात आहे, आपला विकास होऊ दिला जात नाही ही चिंता मिसेस वीकलीला आहे,यास्तव तिचं स्वत:चं आयुष्य तिला जगायला मिळायला हवं. स्त्रियांची प्रकृती बलाढ्य देवतेगत असते; त्या सर्व अडथळे निपटून टाकतील आणि स्वत:च्या मर्जीनुसार स्वत:चं आयुष्य जगू लागतील---

'तुम्हाला हे लिहिलं या औधत्यासाठी मला बोल लावू नका; सांप्रत आपण दोघंही समदु:खी आहोत. माझ्याबद्दल तुम्हाला काहीही वाटो, परिस्थिती बदलत नाही. यातून उत्तम तोडगा काय काढता येईल याचा विचार करताकरता माझं काळीज फाटून जातं. कुठल्याही परिस्थितीत आपण कुणावर अन्याय होऊ देता कामा नये. मिसेस वीकलीला मुक्तपणे जगायला मिळायला हवं: तिचा तो स्वभावधर्म आहे. माझ्या लेखी ते भवितव्य आहे. मला वाटतं जणू काही माझी जगण्याची धडपड तिच्यासाठी आहे. आपण सारे थोडंफार विसरू शकणार नाही का?'

दरम्यान लॉरेन्सनं त्रिएर येथील मुक्काम हलवला आणि व्हाईनलँडमधील वाल्डब्राऊन (Waldbroun) येथे क्रेनकोव या आपल्या नातलगाकडे राहायला गेला. ऐंशी मैलाच्या या

प्रवासात त्याला चार वेळा ट्रेन बदलावी लागली. या प्रवासात त्यानं फ्रीडाला लिहिलेल्या पत्रांपैकी दोन पोस्टकार्ड तेवढी आज उपलब्ध आहेत. यातील एक हेन्नेफ (Hennef) येथून लिहिलेलं आहे. 'एका रमणीय, किलबिल करणाऱ्या छोट्या नदीच्या काठी एखाद्या दुःखी प्रेमिकागत तो बसला आहे, आणि माझी शेवटची ट्रेन यायची आहे---दिवसभरात आता पहिल्यांदाच, माझा अलिप्तपणा पार लोप पावला आहे,आणि मला जाणवतं माझं तुझ्यावर निखळ प्रेम आहे. इतर सारं काही फिजूल आहे. आणि तुझ्याबरोबरच्या आयुष्याचं अभिवचन म्हणजे सुखसमृद्धी आहे. या क्षणी मला कळून आलं आहे.'

याच त्याच्या भावना त्याच्या 'बेई (Bei) हेन्नेफ' या कवितेत व्यक्त झालेल्या आढळतात. पुढील वर्षी प्रसिद्ध झालेल्या त्याच्या 'लव्ह पोएम्स' या संग्रहात ती समाविष्ट करण्यात आली.

'The little river twittering in the twilight,
The wan, wondering look of the pale sky,
This is almost bliss.

And everything shut up and gone to sleep,
All the troubles and anxieties and pain
Gone under the twilight.

Only the twilight now, and the soft " sh !" of the river
That will last for ever.

And at last I know my love for you is here;
I can see it all, it is the whole like the twilight,
It is large, so large, I could not see it before,
Because of the little lights and fickers and interuptions,
Troubles, anxieties and pains.
You are the call and I am the answer,
You are the wish, and I the fulfilment,
you are the night, I the day.
What else? it is perfect enough,
It is perfectly complete,

you and I, what more - ?

Strange, how we suffer in spite of this !'

ही कविता आपल्या आयुष्यातील एका नव्या पर्वाचा प्रारंभ सूचित करते असे उद्‌गार लॉरेन्सनं सोळा वर्षांनंतर काढले आहेत. १९२८मध्ये प्रकाशित झालेल्या त्याच्या 'कलेक्टेड पोएम्स' या संग्रहाला त्यानं एक टिपण लिहिलं होतं. त्यात त्यानं म्हटलं होतं : 'लुक ! वुइ हॅव कम थ्रू' या नव्या कवितामालिकेचा प्रारंभ 'बेई हेन्नेफ'नं होतो. त्या आधीच्या कविता लंडन आणि मृत्यूच्या अनुभव यांच्याशी संबंधित' आहेत. इंग्लंड, मेट्झ आणि त्रियेर या ठिकाणच्या फ्रीडाबरोवरच्या अनुभवांच्या तीन अवस्थांतरानंतर ऱ्हाईनलॅंडमध्ये नव्या लॉरेन्सचा उदय झाला, काहीसा भारदस्त प्रेमिक. त्याला कळून चुकलं, जीवन सुंदर असतं, परंतु जीवनात काय आणि प्रेमात काय यातना भोगाव्याच लागतात. लॉरेन्स भूतकाळामधून बाहेर पडत होता आणि ही प्रक्रिया नेहमीच अपूर्ण असते. भूतकाळानं त्याच्या व्यक्तिमत्त्वाला पांगळं केलं होतं. आता फ्रीडावरोबरची त्याची गुंतवणूक आणि 'सन्स अँड लव्हर्स'चं लेखन यामुळं या पांगळेपणावर मात करून आयुष्याला सामोरं जाण्याचं बळ त्याला लाभलं.

वाल्डब्राऊन तसं खेडंच होतं. तिथल्या परिसरात लॉरेन्स सुखावला होता. 'सन्स अँड लव्हर्स' वर परीष्करण करत होता, फ्रीडाला पत्रं लिहीत होता.

'---तुला शक्य असल्यास मला सांग अ(र्नेस्टां)चा अंतिम निर्णय काय आहे. मला वाटतं ते घटस्फोट देतील, कारण माझ्याबरोबर तुझं लग्न व्हायला हवं असं त्यांना वाटत असणार. मी त्यांना लिहिलेल्या पत्राचा हा परिणाम --- आणि सहा महिन्यानंतर, आपलं लग्न होईल – करशील ना?--- आपण काय करणार आहोत हे निश्चितपणे आपण ठरवायला हवं --- माझं मानधन येईपर्यंत आपण कशीत्रशी गुजराण करू शकू का? तुला घटस्फोट मिळेपर्यंत मी माझ्या माणसांना काहीही सांगणार नाही. आर्थिकदृष्ट्या, पहिले तीनचार महिने आपण नीट काढू शकलो तर, मला वाटतं आपले पुढले दिवस ढकलणं मला शक्य होईल. मुलांचा विचार करू नकोस. ते जन्माला आलं तर आपल्याला आनंद होईल, आणि त्यांचं संगोपन करण्यासाठी आपल्याला हातपाय हलवायला हवेत– आणि ते जन्माला आलं नाही, कधीच– मला वाईट वाटेल. जेव्हा माणसं एकमेकांवर प्रेम करतात, तिथं मुलं होऊ न देणं मला मंजूर नाही. तो दुष्टपणा आहे अशी माझी धारणा आहे. माझ्यापासून तुला मुलं व्हायला मला हवीत– किती लौकर, मला पर्वा नाही---मुलांच्या जबाबदारीची जोखीम आपल्याला उचलायची असेल तर आपल्याला थोडीफार स्थैर्यता हवी--'

त्यानं गार्नेटला लिहिलं. 'माझी मावस बहीण हॅन्नाह (Hannah) – नुकतंच लग्न झालं आहे तिचं– पण समजून चालते ते झालेलंच नाही. माझ्यावर ती प्रेम करू लागली आहे.

स्त्रिया माझ्या प्रेमात का पडतात, कळत नाही. माझा डोळा तिच्यावर अजिबात नाही.' फ्रीडालाही कळवलं : 'हॅन्नाह माझ्याशी अदबीनं वागते.' तिचा नवरा "भला माणूस" आहे– त्याच्याविषयी आस्था वाटणं कठीण. तिचं त्याच्यावर कधीच प्रेम नव्हतं. त्याच्याशी लग्न केलं कारण ती तिशीची झाली होती आणि वर्ष तशीच सरकत होती. माझा तिला फार लळा लागला आहे– पण चिंता नको, तिचं वागणं मर्यादशील आहे.' पुढं असा निर्वाळा दिला की तो 'फ्लर्टिंग' करील, पुरता झिंगलेला असेल तेव्हाच.

तिथं मेट्झमध्ये फ्रीडानं हेन्रिंग या जुन्या ओळखीच्या लष्करी अधिकाऱ्याबरोबर 'फ्लर्टिंग' सुरू केलं होतं. तिनं या प्रकरणाचा उल्लेख लॉरेन्सच्या पत्रात केला होता. तिला चिमटा घेणं हॅन्नाह-प्रकरणामुळं त्याला शक्य झालं. तथापि, त्याहून महत्त्वाचं, हॅन्नाहबरोबरच्या त्याच्या निरुपद्रवी चाळ्यांनी प्रेमाचं खरं स्वरूप त्याच्या निदर्शनास आणून दिलं : 'गंमतीदार गोष्ट आहे ती, आपल्या वासना-कामवासना– ह्या भरकटत जाणाऱ्या नाहीत, तर स्थिर असतात, शांत असतात. मला वाटतं, जेव्हा एखादा प्रेम करतो, तेव्हा त्याची कामवासना, खळखळ करत नाही; ती तुफान नसते, संयमित प्रेरणा असते. एखाद्याला भडकावणारी कामवासना सच्च्या प्रेमापासून कित्येक योजनं दूर असते. माझ्या लक्षात येतील असं मला कधी वाटलं नव्हतं त्या गोष्टी माझ्या लक्षात यायला लागल्यात.'

फ्रीडाच्या हेन्रिंगबरोबरच्या प्रकरणाची लॉरेन्सनं खिल्ली उडवली. आपल्या लैंगिक सुखासाठी ती करत असलेल्या पुरुषाच्या वापराची तुलना त्यानं अफूच्या डोसाशी केली. 'तुझ्यावरून मला मोपासाची कथा आठवते. एक इटालियन तरुण माणूस ट्रेनमधून फ्रांसला चालला होता, आणि त्याच्यापाशी पैसे नव्हते, आणि बराच काळ त्यानं काही खाल्लेलं नव्हतं. नंतर तिथं एक बाई आली, दुधानं भरलेले तिचे स्तन– फ्रान्सला चालली होती ती ओली दाई म्हणून. दुधानं भरलेले तिचे स्तन तटतटत होते. तरुण माणूस भुकेनं कासावीस झाला होता. त्यांनी एकमेकांची सोडवणूक केली आणि ते आपापल्या वाटेनं गेले. फक्त हे(न्रिंग)ला पुढील खुराक कुठं मिळणार आहे!'

फ्रीडाशी लग्न करणं ही लॉरेन्सच्या लेखी एक महान गोष्ट होती. घाईघाईनं, वासनावेगानं एकत्र येणं नव्हे. मला आतून जाणवत आहे "हा माझा विवाह आहे."

पण फ्रीडाला घटस्फोट देण्याबाबत अद्याप वीकलींनी काहीच हालचाल केलेली नव्हती. फ्रीडानं स्वतःच्या गुन्ह्याची स्पष्ट कबुली दिल्याखेरीज काही कारवाई करण्यास ते राजी नव्हते. पण एक गोष्ट त्यांनी स्पष्ट केली होती की काहीही झालं तरी मुलांचा ताबा ते फ्रीडाला देणार नव्हते.

आणि त्यांचा हा घाव फ्रीडाच्या जिव्हारी लागला होता.

## सात

२४ मेला लॉरेन्स म्युनिचला निघाला. फ्रीडा तिथं आधीच पोचली होती. एक रात्र तिथं घालवून दोघंही ब्यूएरबेर्ग (Beurberg) ला गेली. एका आठवड्याच्या हनीमूनसाठी, इति लॉरेन्स.

या हनीमूनच्या काळात लॉरेन्सनं 'फर्स्ट मॉर्निंग' ही कविता लिहिली. ही कविता त्याचा समागम अपेशी ठरला असल्याचे सूचित करते. तो म्हणतो :

'The night was a failure
but why not ––– ?
In the darkness
with the pale dawn seething at the window
through the black frame
I could not be free,
not free myself from the past, those others -
and our love was a confusion,
there was a horror,
you recoiled away from me.'

'गतकाळ, त्या बाकीच्या–' यांच्यापासून स्वत:ला मुक्त करता आलं नाही या असमर्थपणावर लॉरेन्स या अपेशाचं खापर फोडतो. परंतु फ्रीडाच्या शय्येमध्ये अन्य स्त्रियांच्या विचारांनी त्याला का पछाडून टाकावं वा त्याला गोंधळून टाकावं याविषयी तो मौन पाळतो. बहुधा तो समजत असावा की त्याच्या आईची स्मृती कामेच्छा हिरावून नेत असावी, जसं जेसीबरोबरच्या समागमासमयी घडत होतं. पण 'त्या बाकीच्या' हा अनेकवचनी शब्दप्रयोग या संदर्भात त्यानं का वापरावा हे स्पष्ट होत नाही.

फ्रीडा म्हणजे कामवासनेचा धगधगता ज्वालामुखीच होता आणि त्या आगीचं शमन करण्यास लॉरेन्स दुबळा ठरला होता. परंतु या अपयशानं त्यांच्या एकमेकांच्या प्रेमात बाधा आणली नाही. वर उद्धृत केलेल्या कवितेत कवी सांगतो –

'Now, in the morning
As we sit in the sunshine on the seat by the little shrine,
And look at the mountain- walls,
Walls of blue shadow,
And see so near at out feet in the meadow

Myriads of dandelion pappus
Bubbles ravelled in the dark green grass

Held still beneath the sunshine -
It is enough, you are near -
The mountains are balanced,
The dandelion seeds stay half- submerged in the grass;

You and I together
We hold them proud and blithe
On our love.

They stand up right on our love,
Everything starts from us,
We are the source.'

इंग्लंड सोडल्यापासून लॉरेन्सनं फ्रीडाबरोवर जी भ्रमंती केली त्या कालखंडावर आधारित एक कादंबरी लॉरेन्सनं १९२०-२१ मध्ये लिहिली : 'मिस्टर नून.' या कादंबरीचं हस्तलिखित उपलब्ध होऊन ती प्रकाशित व्हायला १९८४ साल उजाडावं लागलं. तोवर या कादंबरीचं अस्तित्व अंधारातच होतं.

या कादंबरीतील गिल्बर्ट नून हा लॉरेन्स आणि जोहान्ना ही फ्रीडा. कादंबरीत जोहान्ना गिल्बर्टच्या लैंगिक जोमाचं कौतुक करते :'माहीत आहे तुला? तू चांगला प्रियकर नसशील म्हणून मी थोडीशी घाबरलेलीच होते. पाऊण तासात एवढ्या चांगल्या प्रकारे तीन वेळा समागम करणं प्रत्येक पुरुषाला शक्य होणार नाही, होईल?' जोहान्नाचे हे उद्‌गार लॉरेन्सच्या संदर्भात खात्रीलायक वाटत नाहीत. हे उद्‌गार त्यानं तिच्या तोंडी घातले ते दहा वर्षांनंतर. तोवर त्या दोघांमधल्या विरत चाललेल्या अनुबंधाच्या स्वरूपावर भर देण्याची गरज त्याला भासत असावी. समागमसौख्य देण्याच्या त्याच्या पात्रतेपेक्षा त्याच्या ज्वानीचा जोष हे उद्‌गार अधोरेखित करतात असं फार तर म्हणता येईल. आजवर 'स्वत:च्या भावनांच्या ज्वालामुखीच्या तोंडावर' तो ताठरून बसला होता. आता फ्रीडाच्या सान्निध्यात 'स्वत:ला थोडसं सैल सोडून देणं' तो शिकला. त्याबद्दल त्यानं फ्रीडाला धन्यवाद दिले.

फ्रीडाच्या आसक्तीनं लॉरेन्सला वेळोवेळी कामातुर केलं असेल,पण त्या आसक्तीची तृप्ती तिला लाभू देण्यामध्ये काही समस्या उद्‌भवत होत्या. प्रारंभीच्या महिन्यात त्याच्या मृत आईवरील एका कवितेवरून त्या दोघांचं भांडण झालं. आपली प्रेयसी म्हणून त्यानं आपल्या आईचा उल्लेख केला होता, त्या पंक्तींच्या बाजूला, चिडून लिहिलं : 'मला तिटकारा वाटतो याचा.' त्या पानाच्या अखेरीस तिनं स्वत:चं भाष्य नमूद केलं त्यावरून तिच्या संतापाचं कारण ध्यानी येतं :

'मी प्रयत्न केला आहे, मी झगडले आहे. माझ्याशी आणि इतर लोकांशी तुझे संबंध जुळून यावेत यासाठी दिलेल्या झगड्यात स्वत:ला अर्धमेलं करून घेतलं आहे. दुर्दैवानं, मी मला पटवून दिलं आहे की मी प्रेम करू शकते, पण तुझ्यावर मात्र कदापीही नाही. आता काही दिवस मी तुला एकटाच राहू देईन आणि मी पाहीन, मी जशी आहे. तशी पाहाण्याला तुला मदत होईल का ? मी स्वत:च माझ्यावर पुन्हा इलाज करीन, मला तू मदत करू शकणार नाहीस, तू एक दु:खद गोष्ट आहेस. तुझं गुपित आणि तुझं नैराश्य मला ठाऊक आहे. शरमिंदा झालेला मी तुला पाहिलं आहे– मी तुझ्यात सुधारणा घडवून आणली आहे, ते श्रेय माझं आहे.'

गुपित आणि शरम हे शब्द फ्रीडानं लैंगिकतेच्या संदर्भात वापरले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. काही वर्षांपूर्वी फ्रीडाचं कामक्रीडेमधलं नैपुण्य ग्रॉसनं वाखाणलेलं होतं. त्या नैपुण्याच्या बळावर लॉरेन्समधले दोष तिनं दूर केले असतील. काहीही असो, आदल्या रात्रीची निराशा असूनही दुसऱ्या दिवशी एकमेकांच्या संगतीत सुखी होते. 'मिस्टर नून'-मधील प्रेमिकांच्या बावतीतही नेमकं असंच घडतं. ग्रॉसबरोबर जे सुरतसुख आपण अनुभवलेलं होतं ते लॉरेन्सबरोबर अनुभवणं कदापीही शक्य होणार नाही या कटू सत्याचा फ्रीडानं स्वीकार केला, प्राप्त परिस्थितीशी जुळवून घेतलं. पण मुलांना कायमचं अंतरावं लागेल या धास्तीनं ती कासावीस होत होती. आणि त्यावरून लॉरेन्स तिची कानउघाडणी करत होता. स्वत:च्या आईबद्दल त्याला आत्यंतिक प्रेम होतं, असं असूनही फ्रीडामधल्या मातृत्वाचा तो उद्धार करत होता.

'The mother in you, fierce as a murderess, glaring to England,
Yearing towards England, towards your young children,
Insisting upon your motherhood, devastating.'

पुढे म्हणतो –

'I have cursed motherhood because of you,
Accursed, base motherhood !'

तो स्वत:चं समाधान करून घेतो; समजूत घालतो :



अनुक्रमणिका

'That you are with me in the end.

That you never look quite back ; nine- tenths, ah, more

You look round over your shoulder ;

But never quite back.

पण लागलीच कडवटपणे उद्‌गारतो:

'Nevertheless the curse against you is still in my heart

Like a deep, deep burn.

The curse against all mothers.'

वरील काव्यपंक्ती त्याच्या 'She Looks Back' मधील आहेत. ही कविता या आठवड्याभराच्या वास्तव्यातच लिहिली होती.

त्यांच्या जीवनाला विसंवादी सूर उमटत होते. पण कटुता मागे राहात नव्हती. दिवस तसे सुखाचे होते.

ब्यूएरबेर्ग येथे आठवडा काढल्यानंतर लॉरेन्स फ्रीडासहवर्तमान इसार नदीवरील Icking या गावी आला. ऑगस्टपर्यंत तो इथं राहिला. एल्सनं आग्रह धरल्यामुळं मॅक्स वेवरचा भाऊ आल्फ्रेड यानं आपल्या घरातील वरच्या मजल्यावरील फ्लॅट दिला. चार छोट्या खोल्या आणि एक स्वयंपाकघर. भाडेकरू बाल्कनीमध्ये जेवण घेत असत. लॉरेन्स तिथं बसून लिखाणही करत असे. ड्रेसिंग गाऊनमध्ये बाल्कनीत ब्रेकफास्ट घेणं त्याला खानदानीपणाचं वाटे. पण नाईटगाऊनमध्ये फ्रीडामात्र खानदानी दिसत नसे ही त्याची तक्रार असे.

आल्याआल्या २ जूनला त्यानं सॅली हॉपकीनला पत्र लिहिलं. आनंदाची बातमी कळवली:'मी जर्मनीला मिसेस वीकलीबरोबर आलो. तिच्याबरोबर मेट्झला गेलो.' आणि प्रांजळपणे कबुली दिली : 'माझं फ्रीडावर एवढं प्रेम आहे,त्यासंबंधी बोलणं मला आवडत नाही. प्रेम म्हणजे काय हे यापूर्वी मला ठाऊक नव्हते.'

त्याच दिवशी गार्नेटला लिहिलं,'फ्रीडा भयंकर देखणी आहे. केव्हातरी तिच्याशी तुझी भेट व्हायला हवी--- तू कल्पना करशील ,त्याहून लाखोपटीनं ती चांगली आहे--- तू आवडतोस तिला. मी सांगतो, तुला तोंडात बोटं घालायला लावेल ती. तिची अंगलट रुबेनच्या चांगल्या बायांप्रमाणं (स्थूल) आहे. पण तिचा चेहरा ग्रीकला साजेसा (रेखीव) आहे. तिच्यासंबंधी एक शब्द जरी, बोलशील, द्वेष करीन मी तुझा---' पत्राला ताजा कलम जोडला : फ्री(डा) सांगते "मी एवढी सुखी आहे तुझं चुंबन घ्यावसंही मला वाटत नाही." बघितलंस, प्रेम वासनेहून महान आहे आणि स्त्री कामप्रेरणेहून.

पैशाची ददात त्यांना होती. जेमतेम पंधरा-एक शिलींग खिशात असत. त्यातून चांगल्या–

पैकी 'ब्लॅक ब्रेड' आणि ताजी अंडी घेणं त्यांना परवडत असे. सुरेख बेरी मिळत. खडतर परिस्थितीत सौख्य मिळवण्याची हातोटी दोघांनाही होती.

प्रतिभावंत लेखक आणि त्याची प्रिया या भूमिका दोघंही पार पाडत होते, पण वेगळ्या ढंगानं. प्रत्येक दिवशी फुलांच्या गुच्छासमवेत तो तिचा ब्रेकफास्ट तिला अंथरुणात नेऊन देत होता आणि ती आपले लाड करून घेण्यासाठी अंथरुणात पडून राहात होती. घरकामात ती कुचकामी आहे, हे त्याला कळून चुकलं होतं. पण आता काहीही काम न करण्याच्या तिच्या खुशालचेंडू वृत्तीवरून तो तिची खरडपट्टी काढत होता. म्हणायचा, सामान्य बाईही चांगली कॉफी बनवू शकते.

मूल होऊ देण्याचा विचारही फ्रीडाला असह्य होता, तरी देखील समागमाच्या वेळी गर्भनिरोधक साधनांचा वापर करावासा त्याना वाटत नव्हता. जेव्हा स्त्रीपुरुष एकमेकांवर प्रेम करत असतात तेव्हा गर्भधारणा होऊ न देण्याची खबरदारी घेणं लॉरेन्सला मंजूर नव्हतं. अशा साधनांनी सुरतसुखाचा खरा आनंद लाभत नाही असं त्याला वाटत होतं, तिलाही वाटत होतं.

फ्रीडाचं शारीरिक सौंदर्य आणि तिचा भोगविलास यांच्या अवीट गोडीचा आनंद, सौख्य लॉरेन्स लुटत होता. 'साँग ऑफ अ मॅन हू इज लव्हड' मध्ये तो सांगतो : 'Between her breasts is my home, between her breasts.' संतुष्ट होऊन झोपी गेलेल्या तान्ह्या बाळागत लॉरेन्स तृप्त होता :

'And I hope to spend eternity
With my face down-buried between her breasts
And my still heart full of security
And my still hands full of her breasts.'

फ्रीडाही आनंदाच्या डोही डुंबत होती. ती सांगते: 'मला माणसं नको होती, मला काहीही नको होतं, लॉरेन्सनं मला बहाल केलेल्या या नव्या विश्वात आनंद उपभोगायचा एवढीच माझी इच्छा होती. मला जे हवं होतं ते मला गवसलं होतं, आता ओढ्यातील ट्राउट माशागत किंवा सूर्यप्रकाशातील डेझी फुलागत मी आता बहराला येईन. त्याचं औदार्य सर्वस्व देण्यात :"माझ्याकडून तुला जे हवं ते सारं घे, सारं काही, मी तुझीच आहे;" आणि मी घेतलं आणि तेवढंच दिलं, मागचापुढचा विचार न करता.

मी त्याला विचारलं,"जे तुला इतरांकडून मिळालं नाही असं मी तुला काय दिलं?"

त्यावर तो उत्तरला : "माझा आत्मविश्वास तू बळकट केलास."

'आणि तो म्हणायचा : "तू एवढी तरुण आहेस,एवढी तरुण !" मी सांगायची: "पण मी तुझ्याहून मोठी आहे"– "हॅं, वयाचं म्हणत नाही मी, ती बाबच वेगळी आहे. तुला नाही

कळायचं.''

तिच्यामधील गुणदोषासकट त्याचं तिच्यावर प्रेम होतं.

एकदा तो तिला म्हणाला,''आयुष्य भोगायची तुझी वृत्ती वाखाणण्याजोगी आहे.''

''असेलही, पण माझ्यामधील या वृत्तीला तुझ्यामुळंच जाग आली.''

लॉरेन्स आणि फ्रीडा स्वच्छंदपणे भटकत. निसर्गाचं मनोहारी रूप पाहून हरखून जात बऱ्याच गोष्टींविषयी बोलत, वादविवाद करत. स्वत:चं बालपण, त्याच्या परिचयाची माणसं, त्याच्या कुटुंबाचं दारिद्र्य, आईवडिलांची भांडणं, खाणकामगाराचा मुलगा म्हणून त्याची झालेली अवहेलना इत्यादीसंबंधी त्यानं तिला सांगितलं. तिनं त्याला सांगितलं, तिचं भन्नाट वागणं, तिच्या हूडपणाला आळा घालण्याचे तिच्या कॉन्व्हेंटमधल्या नन्सचे असफल प्रयत्न, तिचे 'हीरो' वडील, मुलांमध्येच हुंदडण्याची तिची लहानपणापासूनची हौस, तिची अफेअर्स वगैरे वगैरे. ऑट्टो ग्रॉसचा तिच्या जीवनावर किती जबरदस्त प्रभाव होता ही गोष्टही तिनं लपवून ठेवली नाही. एकाच वेळी अनेकांशी लैंगिक संबंध असण्यावर त्यानं तिच्याशी वाद घातला. फ्रीडाच्या बहिणींचं अनिर्बंध वागणं त्याला नापसंत होतं. वैवाहिक जीवनातील पतीपत्नीमधील बांधिलकीला तो प्राधान्य देत होता. विवाहानं त्याच्या आईवडिलांना सुख दिलेलं नाही याची पुरती जाणीव असूनही विवाहावर त्याचा विश्वास होता. फ्रीडा त्याच्या आयुष्यात आल्यानंतर त्यानं अन्य स्त्रीबरोबर लैंगिक संबंध जोडले नव्हते. तिनं बेइमानी केली तरी तिच्याशी त्यानं इमान राखलं.

फ्रीडाचा कारभार गलथान. वृत्ती बेफिकीर. तिला नीटनेटकेपणाची सवय लावण्याचा लॉरेन्सनं कसोशीनं प्रयत्न केला. त्याची आई ठेवत असे तसे लोकरी, रेशमी, सुती कपडे वेगवेगळ्या खणात तिनं ठेवावे म्हणून कैकदा त्यानं डोकेफोड केली. पण पालथ्या घड्यावर पाणी. तुटपुंज्या पैशात संसार करायचा म्हणजे प्रत्येक दमडी काटकसरीनं खर्च करायची हे लॉरेन्सचं सांगणं तिनं कधी मनावर घेतलं नाही, घ्यावसं तिला वाटलंही नाही. एकदा इसार नदीच्या काठावरून चालताना तिच्या एका बुटाची टाच निखळली. तिनं दोन्ही बूट पायातून काढले आणि नदीच्या पाण्यात बेधडक भिरकावून दिले. लॉरेन्स तिच्याकडे बघतच राहिला. तिला वाटलं, तिला आता अनवाणी पायानं घरापर्यंत चालत जावं लागणार, तिला अनवाणी चालताना पाहून येणारे-जाणारे कुत्सितपणे खिदखिदणार म्हणून त्याचे डोळे विस्फारले गेले असतील. पण तसं नव्हतं. त्यानं तिला व्याख्यानच दिलं, सांगितलं,''बुटाचा जोड बनवायला बराच वेळ खर्चावा लागतो आणि त्या बुटासाठी ज्या कुणी परिश्रम घेतलेत त्याविषयी तू अनादर दाखवता कामा नये.'' त्यावर ताडकन ती म्हणाली,''या गोष्टी माझ्यासाठी आहेत, मी त्यांच्यासाठी नाही. मला त्यांची अडगळ वाटली, मी ते फेकून दिले.'' तिनं चुटकीसरशी प्रश्न निकालात काढला.



अनुक्रमणिका

त्यांची भांडणं सदाचीच. अगदी कडाक्याची भांडणं. 'मी त्याला प्रक्षुब्ध केलं किंवा त्याच्या भोवतालच्या परिस्थितीनं त्याच्या सहनशक्तीचा अंत केला की रागानं मला तो तडाखा हाणायचा. मी त्याची फारशी फिकीर कधी केली नाही. मीही तडाखा हाणायची किंवा त्याच्यामधलं वादळ शांत होईपर्यंत निमूट राहायची. अगदी कडवटपणा येईपर्यंत आम्ही एकमेकांच्या उरावर बसलो. नंतर लाभायची शांतता, निरामय शांतता.' असं फ्रीडा म्हणते. तर लॉरेन्सचं म्हणणं, त्यांचे संबंध निकोप आहेत. कारण अगदी दातओठ खाऊन ती दोघं भांडतात. 'फँटॅशिआ ऑफ द अन्कॉन्शस' (१९२२) मध्ये त्यानं नमूद केलं आहे : 'एखाद्या स्त्रीचा नवरा तिच्या मस्तकात गेला तर तिनं त्याच्यावर तुटून पडावं.'

त्यांच्या भांडणांना कारणं अनेक, पण त्यातील एक : मुलांच्या आठवणींनी फ्रीडाचं दु:खोकष्टी होणं. अशा वेळी 'लॉरेन्स माझं सांत्वन करायचा आणि म्हणायचा, "दु:ख नको करूस, मी त्यांच्यासाठी नवीन स्वर्ग आणि धरा बनवीन, रडू नकोस, बघ मी बनवतो की नाही." माझं सांत्वन व्हायचं तरी माझं रडं चालूच असायचं. मग तो संतापायचा, "खरोखरीच त्या कार्ट्याविषयी तुला काडीचीही चिंता नाही आणि त्यांना तुझी काळजी नाही." मग मी रडायची आणि आम्ही भांडायचो." माझ्या मुलांचा विसर मला पडला तर आई कसली मी?" पण माझ्या यातना या त्याच्या दृष्टीनं माझा गंभीर गुन्हा होता. वाटायचं, माझ्या यातना तो अधिक तीव्र करत आहे.

भावनिकदृष्ट्या आपण फ्रीडावर अवलंबून आहोत याची जाणीव लॉरेन्सला होती. मुलांच्या ओढीने, न जाणो, ती आपल्याला सोडून जाईल ही धास्ती त्याच्या मनात चुकचुकत असावी. जुलैअखेरीस लंडनमधील एका फ्लॅटमध्ये तिनं मुलांबरांबर राहावं असा प्रस्ताव वीकलींनी तिच्यापुढं मांडला होता आणि तो प्रस्ताव स्वीकारण्याकडे तिच्या मनाचा कल झाला होता. तिनं संमती दर्शवली असती तर घटस्फोटाच्या प्रकरणात तिला गुंतावं लागलं नसतं, स्वत:च्या इच्छेनुसार वागायला ती मोकळी असती. या प्रस्तावात एक अट होती तिनं उघडपणे लॉरेन्सबरोबर राहाता कामा नये. वीकलींनी सुचवलेली ही तजवीज तिच्या वहिणींना आदर्श वाटत नसली तरी मान्य करण्याजोगी वाटत होती आणि त्यांनी तिचं मन वळवण्याचा प्रयत्नही केला असता. असं घडलं तर या विचारानं तो हादरून गेला होता.

'Perhaps she will go back to England

Perhaps she will go back

Perhaps we are parted for ever.'

तरीदेखील आपल्यासाठी फ्रीडानं राहावं म्हणून तिची मनधरणी करणं मानी लॉरेन्सला मंजूर नव्हतं. 'ती माझा अगदी तिरस्कारच करते. कारण मी म्हणत नाही "माझं तुझ्यावर प्रेम आहे– काहीही घडो तू माझ्या बरोबर राहा." माझं खरंच तिच्यावर प्रेम आहे. मला जर का

ती सोडून गेली तर मला वाटत नाही त्यानंतर सहा महिनेदेखील मी जिवंत राहीन! फ्रीडाही स्वत:ची समजूत घालायची : 'हे बंध कायमचे आहेत, जगातली कुठलीही शक्ती ते तोडू शकणार नाही. मी वाट पाहायला हवी, मी वाट पाहायला हवी.'

मुलांच्या आठवणींनी फ्रीडाच्या डोळ्यांतून आसवं ओघळत, तद्वतच लॉरेन्समध्ये काही तरी विनाशक असल्याच्या जाणिवेनंही तिचे डोळे भरून येत. या संदर्भात 'इन द डार्क' ही कविता विलक्षण बोलकी आहे. ही कविता संवादात आहे, त्याचा (लॉरेन्स) आणि तिचा (फ्रीडा). तिचा संवाद तिरप्या टाईपात दिलेला आहे.

रात्रीचा समय. ती अंथरुणात उठते आणि खिडकीकडे जाते. तो तिला विचारतो;

" Why have you gone to the window ? Why don' t you sleep?
How you have wakened me ! – But why, why do you weep?"

*"I am afraid of you, I am afraid, afraid*
*There is something in you destroys me — !"*

*"You have dreamed and are not awake, come here to me."*
*"No, I have wakened.It is you,you are cruel to me !"*

*"My dear ! –" "Yes, yes, you are cruel to me. you cast*
*A shadow over my breasts that will kill me at last."*

*"Come !" – "No, I'm a thing of life. I give*
*You armfuls of sunshine, and you won't let me live."*

*"Nay, I'm too sleepy !" –"Ah, you are horrible ;*
*You stand before me like ghosts like a darkness upright."*

*" I ! – "How can you treat me so, and love me?*
*My feet have no hold, you take the sky from above me."*

अखेरीस तो तिची समजूत घालतो :

"But never mind, my love. Nothing matters, save sleep;
Save you, and me, and sleep; all the rest will keep."



अनुक्रमणिका

आशा-निराशा, हर्ष-खेद, प्रेम-द्वेष या द्वंद्वामधून जात असूनही त्याचं आयुष्य म्हणजे, फ्रीडाच्या शब्दात सांगायचं तर, सुखाचं नंदनवन होतं.

लॉरेन्सची दुसरी कादंबरी 'द ट्रेसपासर' १९१२च्या मेमध्ये प्रसिद्ध झाली होती. त्या कादंबरीवरील परीक्षणं गार्नेटनं त्याच्याकडे पाठवून दिली. परीक्षणं नाउमेद करणारी नसली तरी उत्साहवर्धकही नव्हती. 'इंग्लिश रिव्ह्यू'ला कादंबरी 'काहीशी निराशाजनक' वाटली तर 'सॅटर्डे रिव्ह्यू'नं म्हटलं : अन्य कुठल्याही माणसाचं ते लिखाण असतं तर ते समाधानकारक वाटलं असतं.' 'नॉटिंगहॅमशायर गार्डीयन'नं लॉरेन्स-फ्रीडाच्या सहजीवनाची कुणकुण लागली असल्यानं परीक्षणाला मथळा दिला : 'एक निंद्य सफर.' हा मथळा वाचून फ्रीडा खदखदून हसली, लॉरेन्स मात्र घुम्म राहिला.

गार्नेटनं परीक्षणं लॉरेन्सांकडे पाठवली आणि त्यापाठोपाठ आपला वीस वर्षांचा मुलगा डेव्हीड यालाही त्यांच्याकडे पाठवून दिलं. जुलैमध्ये डेव्हिड म्युनिचमध्ये होता. एकटाच होता. त्याच्या वडिलांनी त्याला सुचवलं की त्यानं लॉरेन्सांकडे जावं. त्यानंतर लागलीच लॉरेन्सची चिठ्ठी त्याला गेली, त्या चिठ्ठीत आपल्याकडे कसं पोचायचं ते तपशीलवार लिहिलं होतं. रंगीबेरंगी पोषाखातील बव्हेरिअन शेतकऱ्यांच्या गर्दीमधून वाट काढत डेव्हिड स्टेशनवर उतरला तेव्हा अस्सल अंग्रेज त्याच्या दृष्टीला पडला. लॉरेन्समधली दोन ठळक वैशिष्ट्यं त्याला जाणवली : त्याचे वेधक निळेभोर डोळे आणि त्याचं हास्य, जीवनाची मौज चाखणाऱ्या माणसाच्या चेहऱ्यावर दिसतं तसं. फ्रीडा त्याला, हिरव्यागार डोळ्यांनी रोखून पाहाणाऱ्या सिंहिणीगत वाटली.

डेव्हिड गेला आणि त्यानंतर २ ऑगस्टला फ्रीडाची आई अचानक लॉरेन्सांच्या दारात उभी ठाकली. घरात पाऊल टाकल्यानंतर तासभर तिनं लॉरेन्सची खरडपट्टी काढली, जर्मन भाषेत शिव्या हासडल्या. त्याला विचारलं, एका बॅरनेसनं त्याचे बूट साफ करावे आणि त्याचं सांडपाणी ओतून टाकावं अशी अपेक्षा तो करतो तरी कसा? एका हुशार प्राध्यापकाची पत्नी, त्याच्यासंगे एक 'बारमेड'गत आयुष्य जगते आणि तिला बूट देण्याचीही ऐपत त्याला नाही, अशा माणसाला स्त्री हवी कशाला? थोडीफार तरी सभ्यता आहे की नाही ? वगैरे वगैरे.

फ्रीडाच्या चिडचिडीकडे दुर्लक्ष करून सासूबाईंचा भडीमार त्यानं निमूट सहन केला, तिच्याशी अतिशय अदबीनं वागला. म्यूनिचला पोचल्यानंतर ती एल्सला म्हणाली प्रेम करावं, विश्वास बाळगावा असाच लॉरेन्स आहे.

ती गेल्यानंतर तीन दिवसांनी लॉरेन्स आणि फ्रीडा यांनी आपला मुक्काम हलवला, 'नॅपसॅक' पाठीवर बांधून इटालीचा मार्ग धरला. मजल दरमजल करत, डोंगरदऱ्या पार करत ते मायरोफेनला (Mayrhofen) पोचले. ऑस्ट्रियाच्या टायरोलमधील हे एक खेडं.

तिथल्या एका नदीकाठच्या शेतावरल्या मांगरात त्यांनी काही दिवसांसाठी मुक्काम केला. गाठोडी पाठीवर घालून दिवसभर ते मनसोक्त भटकत. शेकोटी पेटवत. उकडलेली अंडी, तिथं बनवला जाणारा ताजा चीज हा त्यांचा शुद्ध शाकाहारी आहार. अवतीभवतीचे हिमाच्छादित डोंगर. खूप उंचावरून कोसळणारे धबधबे. काही वेळेला फ्रीडा अंगावरील वस्त्रं उतरवून उन्हात पडून राहायची. क्वचित दोघंही नदीत डुंबायचे. त्याला वाटतं : 'आम्ही सुखी होऊ, कसे, कोण जाणे !'

मिसेस हॉपकीनला १२ ऑगस्टला लिहिलेल्या पत्रात लॉरेन्सनं तिला सांगितलं की वीकलींचं फ्रीडावर अतोनात प्रेम आहे आणि ते तिला सोडून देणार नाहीत. 'स्वत:विषयी सांगायचं तर, फ्रीडा आणि मी, खडतर काळामधून गेलो, धडपडलो, जिव्हाळ्यानं भरलेल्या नागव्या सलगीप्रत पोचलो, यालाच प्रेम म्हणतात हे अखेरीस कळून आलं. या आधी चुकीच्या स्त्रीकडे मी प्रेमासाठी वळलो या दोषाचं खापर मी आजवर स्त्रियांवर फोडत होतो ते माझ्या माथी फोडलं पाहिजे. जी स्त्री आपला स्वीकार करील आणि जिचं प्रेम आपण स्वीकारू शकू अशी स्त्री सापडेपर्यंत प्रयत्न करायला हवेत. मग पुरुषाबद्दल कोण कुरबूर करील. अर्थात हे उभयपक्षी व्हायला हवं. काहीही असो, आणि काहीही घडो, मी प्रेम करतो आणि माझ्यावर प्रेम केलं जातं. मी दिलं आहे आणि मी घेतलं आहे– आणि ते शाश्वत आहे. खरंच माणसांना सुयोग्य जोडीदार लाभला; विवाहावर माझा विश्वास आहे.'

काही दिवसांनी डेव्हिड गार्नेट लॉरेन्सांकडे पोचला. लॉरेन्स दिवसभर खोलीत बसून लिहीत असे. तिथंच फ्रीडा आणि डेव्हिड यांच्या गप्पागोष्टी चालत असत. लॉरेन्स अधूनमधून उठून स्वयंपाकाची तयारी करे, क्वचित फ्रीडा आणि डेव्हिड यांच्या संभाषणात थोडावेळ भाग घेई व आपल्या हस्तलिखिताकडे वळे. संध्याकाळी तिघंही मिळून कोडी रचत किंवा लॉरेन्स नकला करून दाखवी. ईस्टवूडमधील लोकांच्या, येट्सच्या, पाउंडच्या पार्टीमधील येट्सचं स्वगत आणि पाउंडचं ट्युलीप फुल खाणं. डेव्हिड सांगतो त्याच्या अभिनयात चार्ली चॅप्लीनच्या काही छटा दिसत. त्यात कडवटपणा अधिक असे, भावुकता कमी. घरातलं खेळकर वातावरण तंग होत असे जेव्हा लंडनहून किंवा जर्मनीहून पत्रं येत असत तेव्हा. कारण त्या पत्रांतील मजकूर फ्रीडाच्या मुलांच्या संदर्भात असे.

टायरोलच्या या सफरीमध्येच फ्रीडाच्या कामजीवनावर इत:पर विश्वास ठेवता येणार नसल्याचं लॉरेन्सला प्रथमच आढळून आलं.

हेरॉल्ड हॉब्सन हा डेव्हिड गार्नेटचा मित्र लॉरेन्सांकडे आला. जे. ए. हॉब्सन या अर्थशास्त्रज्ञाचा हा मुलगा पेशानं कन्सल्टिंग इंजिनियर. देखणा तरुण. त्याला फ्रीडानं नादी लावून त्याच्याशी संग केला असल्याचं लॉरेन्सला कळून आलं. फ्रीडा त्याच्यावरोबर नांदू लागल्याला चार महिनेही झाले नव्हते. १२ ऑगस्टला त्यानं मिसेस हॉपकीनला पत्र लिहून फ्रीडा आणि तो यांच्या एकमेकांवरील प्रेमाची ग्वाही दिली होती त्याच दिवशी फ्रीडा आणि

हॉब्सन यांचा संग घडून आला होता.

या कहाणीला आधार मुख्यत्वे डेव्हिड गार्नेटचा. 'मिस्टर नून' मधील निवेदनावर विश्वास ठेवल्यास फ्रीडानं या घटनेची कबुली लॉरेन्सपाशी दिली होती आणि त्यानं तिला माफ केलं होतं. या कादंबरीत प्रत्यक्षात घडलेल्या प्रसंगाचं एवढ्या ठसठशीतपणे चित्रण करण्यात आलं आहे की फ्रीडा – हॉब्सन प्रेमप्रकरणाला बळकट पुरावा म्हणून कादंबरीचा आधार घेतल्यास ते गैर ठरू नये. टायलेसच्या या सफरीत गिल्बर्ट नून आणि जोहान्ना यांच्याबरोबर दोन मित्र असतात. पहाटे जोहान्ना लॉरेन्सपाशी कबुली देते की त्यातल्या एकाबरोबर तिनं समागम केला होता. या घटनेचं वर्णन सुरेख आहे. जोहान्नाच्या कबुलीजबाबानं गिल्बर्ट एवढा आश्चर्यचकित होतो की त्याला यातनाही जाणवत नाहीत. क्षणभरानं तो स्वत:शीच म्हणतो की माणसं काही गोष्टी करतात, त्यामागचं कारण. त्यांनाही ठाऊक नसतं आणि त्याला या असल्या गोष्टीचं काही विशेष वाटत नाही. कारण त्याचं तिच्यावर प्रेम असतं. गिल्बर्टचं औदार्य जोहान्नाला थोडी चिडकी बनवतं. लॉरेन्सला खुल्लंखुल्ला असूया प्रदर्शित करण्यास आपण प्रवृत्त करू शकलो नाही म्हणून फ्रीडाही अशीच चिडचिडली असेल.

डेव्हिड गार्नेटच्या मते या ट्रिपवर हॉब्सन हाच फ्रीडाचा एकमेव प्रियकर नव्हता. आणखीनही एक कहाणी तो सांगतो. एक दिवस लॉरेन्स आणि फ्रीडा यांचं कडाक्याचं भांडण झालं. रागाच्या भरात ती घराबाहेर पडली, नदी पोहून तिनं पार केली. नदीपल्याड एक लाकुडतोड्या काम करत होता. त्याच्याशी तिनं समागम केला आणि ती माघारी परतली. तिला जे हवं ते करायला ती मोकळी आहे हे लॉरेन्सला दाखवण्यासाठी ती अशी वागली होती.

ही घटना म्हणजे निव्वळ कपोलकल्पित कथा आहे असं फ्रीडाची मुलगी बार्बरा ठासून सांगते. तर अल्डस हक्सले फ्रीडाच्या प्रियकरांच्या संभाव्य यादीत प्रशियन घोडदळातील बऱ्याचशा अधिकाऱ्यांची आणि काही इटालियन शेतकऱ्यांची भर घालतो. वस्तुत: बार्बरा आणि हक्सले घटनास्थळी उपस्थित नव्हते.

प्रत्यक्षात काय घडलं असेल ते असो, एवढं मात्र निश्चित की टायरोलमध्ये असतानाच लॉरेन्सला धक्का बसल्यागत जाणीव झाली. फ्रीडा काहीही करू दे, एव्हाना तो तिच्यावर पूर्ण अवलंबून होता, आणि जर का त्यांना विभक्त व्हावं लागलं तर त्याचा जीव रक्तबंबाळ होऊन प्राण सोडेल.

'ह्युमिलिएशन' या कवितेत तो म्हणतो : Do not leave me, or I shall break. And,God that she is necessary/ Necessary, and I have no choice! Do not leave me.'

३१ ऑगस्टला लॉरेन्सांनी मायरोफेनमधला मुक्काम हलवला आणि ७ सप्टेंबरला इटालीतील गार्दा सरोवराच्या परिसरात ते आले. १८ सप्टेंबरला गार्ग्नॅनो येथील व्हिला

इगेऑमध्ये (Igea) ते राहायला गेले. पहिला मजला त्यांनी भाड्यानं घेतला. महिन्याचं भाडं होतं तीन गीनी. घरमालकाला आगाऊ रक्कम द्यायच्या वेळीच 'द ट्रेसपासरचं मानधन म्हणून ५० पौंड त्याच्या हाती पडले होते. वाड्याभोवती द्राक्षांचे मळे होते, ऑलिव्ह वृक्ष होते, लिंबाची झाडे होती. एप्रिल १९१३ पर्यंत लॉरेन्स इथं राहिले. इथलं सात महिन्यांचं वास्तव्य म्हणजे लॉरेन्सच्या अनुभवविश्वाचे एक लक्षणीय पर्व. 'सन्स अँड लव्हर्स'ची लेखन- समाप्ती ही गतकाळात त्याला त्रस्त करणाऱ्या समस्यांची समाप्ती ठरली. इथं 'द सिस्टर्स' या कादंबरीच्या लेखनाला तो सुरुवात करणार होता. या कादंबरीवरून त्यानं पुढं दोन कादंबऱ्या लिहिल्या. पहिली 'द रेनबो' १९१५ मध्ये पूर्ण केली, आणि दुसरी 'वूमेन इन लव्ह' १९१६ च्या अखेरीस वा १९१७ च्या प्रारंभी लिहून झाली. त्याच्या साहित्यिक कारकीर्दीच्या दुसऱ्या टप्प्यातील त्याचं हे महत्त्वपूर्ण योगदान. इटालीमधील या भ्रमंतीच्या काळात लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्यामध्ये सामंजस्य निर्माण झाले. लुक ! वुइ हॅव कम थ्रू !' या कवितामालिकेमधील पुढील अखेरच्या अखेरच्या कविता अतिशय बोलक्या आहेत.

Through the strait gate of passion
Between the bickering Fire
Where Flames of fierce love tremble
On the body of fierce desire

To the intoxication,
The wind, fused down like a bead,
Flees in its agitation
The flames stiff speed :

At last to calm incandescence,
Burned clean by remorseless hate,
Now, at the day's renascence
We approach the gate............

( Paradise re- entered )

'Among the pink and blue
Of the sky and the almond flowers
A sparrow flutters
–We have come through.........

( Spring Morning )

साऱ्या अडीअडचणी पार केल्याच्या आनंदात त्यानं 'सॉंग ऑफ अ मॅन हू हॅज कम थ्रू' लिहिली. त्यात निर्वाळा दिला :

' Not I, not I, but the wind that blows through me !

A fine wind is blowing the new direction of Time.

सुरुवाती सुरुवातीला जेवणाची वेळ होईपर्यंत फ्रीडा सिगारेटी फुंकत, कादंबऱ्या वाचत अंथरुणात लोळत पडून राहायची. घरकामात ती लक्ष घालत नाही म्हणून लॉरेन्स कधी कुरबूर करत नव्हता. तिचं आयुष्य सोडून ती त्याच्या दारिद्र्यात त्याला साथ देत होती. तिला हवं तसं तो वागू देत होता. शिवाय घरकामाची त्याला स्वत:ला आवड होती. सकाळी आठ वाजता उठून तो कामाला लागायचा. स्वयंपाक करायचा, लाकडं फोडायचा, तक्तपोशी घासायचा आणि गाईचं दूधही काढायचा. हळूहळू फ्रीडा घरकामात लक्ष घालू लागली. परंतु स्टोव्ह आणि भलेथोरले पितळी थाळे हाताळायचे म्हणजे तिच्या उरात धडकी भरायची मदतीसाठी ती वेळोवेळी लॉरेन्सला हाक मारायची – 'पारवे करपताहेत, आता काय करू मी?' आणि तो हातातलं काम बाजूला सारून हंसतहसत तिच्या साहाय्याला जायचा. ती सांगते : चादरी धुण्याचा माझा पहिला प्रयत्न म्हणजे अनर्थच. त्या एवढ्या लांबलचक आणि ओल्या होत्या, त्यांचा चिंबपणा जेरीस आणणारा होता. स्वयंपाकघरात सर्वत्र पाणीच पाणी साचलं होतं. टेवल ओलंचिंब झालं होतं, माझं सर्वांग निथळत होतं. आणि लॉरेन्सनं तिच्या या दयनीय अवस्थेमधून तिची सुटका केली, तिला पुसून कोरडी केली, स्वयंपाकघर पुसून स्वच्छ केलं आणि चादरी बागेत झाडावर बांधलेल्या दोरीवर वाळत टाकल्या. त्यानं थट्टेनं गार्नेटला लिहिलं. आमचे खून पाडण्यात आले असल्याचं तुझ्या कानी आलं तर समज फ्रीडाच्या चुकीमुळं हे घडलं. बेडरूमच्या दारातूनच ती बाहेरच्या रस्त्यावर पाणी ओतून देते आणि तिघून एक गलेलठ्ठ म्हातारी दबकत जाते. मला सर्व दारांना कड्या घालाव्या लागतात, आणि एक जादा बेडरूम आहे तिथं आम्ही बसून राहातो. इथं पोलीस नाहीत.

तुटपुंज्या पैशावर लॉरेन्सांची गुजराण तशी बऱ्यापैकी चालली होती, आणि फ्रीडा अचंबा करत होती. त्यांच्याप्रमाणेच प्रत्येकजण प्रपंच का चालवत नाही? प्राप्त परिस्थितीत जगण्यातलं सुख कसं मिळवायचं याची उत्तम जाण लॉरेन्सला होती, फ्रीडालाही होती.

एक दिवस फ्रीडाच्या वाचनात 'ॲना कॅरेनिना' आली. तिला वाटलं, ती कादंबरी आपल्या नवऱ्याला पाठवावी, ती वाचून त्याच्या काळजाचं काठिण्य दूर होईल. हा विचार तिनं ताबडतोब अंमलात आणला. तिच्या गलथानपणामुळं विल डॉसन या तिच्या पहिल्या याराचं पत्र त्या पुस्तकात राहून गेलं. त्या पत्रात त्याच्याबरोबर पळून येण्याचा त्यानं तिला आग्रह केला होता. वीकलींच्या हाती ते पत्र लागताच त्याची आगआग झाली. चवताळून

त्यांनी ते पत्र लॉरेन्सकडे पाठवून दिलं.

लॉरेन्सांचं आयुष्य 'ॲना कॅरेनिना' मधल्या पात्रांशी मिळतंजुळतं होतं. लॉरेन्स व्रोन्स्की आणि फ्रीडा ॲना. ॲनाप्रमाणं नवऱ्याला सोडून फ्रीडा लॉरेन्सशी सोबत करत होती. वीकली ॲनाच्या नवऱ्याप्रमाणं आपल्या व्यभिचारी बायकोला आपल्या मुलांचा ताबा मिळू न देण्यासाठी कायद्याचा बडगा उगारून सज्ज होता. ॲना-व्रॉन्स्कींचा एकाकीपणा फ्रीडा-लॉरेन्सनाही भोगावा लागत होता पण ॲना-व्रॉन्स्कीप्रमाणं ते खचले नव्हते, ताठ मानेनं जगत होते. शिवाय आपल्या आयुष्याच्या प्रधान उद्दिष्टांपासून लॉरेन्स व्रॉन्स्कीप्रमाणं ढळला नव्हता. उलट लेखनाला सर्वस्वी वाहून घेण्याची संधी त्याला आता लाभली होती. मुलांच्या वियोगाच्या दु:खानं फ्रीडा मात्र सैरभैर होत होती. या तिरमिरीत एक दिवस गारठा असतानाही ती घराबाहेर पडली आणि कपड्यानिशी सरोवरात उतरली आणि नशिबी आलेला भोगवटा पाण्याच्या लहरीसंगे आपल्या अंगावरून तिनं वाहू दिला.

गार्नेटच्या सूचना लक्षात घेऊन लॉरेन्स 'सन्स अँड लव्हर्स'वर परिष्करण करत होता. या कामी फ्रीडानं त्याला बहुमोल साहाय्य केलं होतं. 'त्यावेळी माझ्या आईला काय वाटलं असेल असं तुला वाटतं?' अशासारख्या त्याच्या प्रश्नांना ती सविस्तर उत्तरं देत असे. खास बायकी असे अनुभव ती स्वत: लिहीत असे. मिसेस मोरेल आणि मिरीयम, तद्वतच त्या दोघींचे लॉरेन्सबरोबर संबंध याविषयी ती वेळोवेळी सूचना करत असे. क्लॅरा डॉवेसची व्यक्तिरेखा रेखाटण्यात तिचं योगदान होतं. आपल्या या कामावर ती भलतीच खूष होती. तिनं गार्नेटला लिहिलं: 'मला वाटतं लॉ(रेन्स) 'पॉल मोरे' मधील मुख्य गाभाच चुकीच्या मार्गानं हाताळत होता. अन्य कुणाहीपेक्षा, त्याच्या इतर स्त्रियांपेक्षाही त्याचं स्वत:च्या आईवर नितांत प्रेम होतं, अस्सल प्रेम, इडीपसच्या जातीचं.' ग्रॉसच्या तोंडून फ्रॉइडच्या सिद्धांताविषयी जे काही तिनं ऐकलेलं होतं ते तिनं लॉरेन्सला ऐकवलेलं होतं. तत्पूर्वी लॉरेन्सला फ्रॉईडबद्दल फारसं माहीत असण्याची शक्यता कमीच. फ्रॉईडच्या लिखाणाचं अद्याप इंग्रजीमध्ये भाषांतर झालेलं नव्हतं. फ्रॉईडच्या सिद्धांतांचं पूर्ण ज्ञान असलेल्यांशी त्यांचा प्रथम परिचय झाला १९१४ मध्ये. गार्गनॅनोमध्ये पॉल मोरेलच्या समस्या फ्रॉईडच्या सिद्धांताच्या आधारे बघायला तो शिकला फ्रीडाच्या मदतीनं. मानसशास्त्राचं फ्रीडाचं ज्ञान अगदीच तुटपुंजं होतं, पण स्वत:ला जे समजलं आहे असं ती समजत होती, त्याबाबत मात्र ती अगदी नि:शंक होती आणि त्या आधारे कादंबरीचं अंतीम स्वरूप बदलण्यात तिनं महत्त्वपूर्ण भूमिका बजावली. परिणामी, जेसीबद्दलचा दुष्टावा कथानकात शिरला : फ्रीडाचं असं ठाम मत होतं की मिसेस मोरेलनं मिरीयमवर कुरघोडी करून विजय संपादन करावा एवढी तिची योग्यता आहे, कारण मिरीयमला पॉलबद्दल पुरेसा 'जिव्हाळा' नव्हता.

फ्रीडाच्या मानसशास्त्रावरील पाठांनी प्रभावित होऊन लॉरेन्सनं कथानकात सुधारणा केल्या, कादंबरीचं 'पॉल मोरेल' हे नाव बदलून 'सन्स अँड लव्हर्स' असं ठेवलं. १८ नोव्हेंबरला कादंबरीचं हस्तलिखित गार्नेटकडे पाठवताना त्या सोबत लिहिलेल्या पत्रात आवर्जून त्या कादंबरीचा गोषवारा लिहिला :

'एक चारित्र्यसंपन्न आणि सुसंस्कृत स्त्री खालच्या वर्गात जाऊन पडते, आणि स्वत:च्या आयुष्यात तिला समाधान नसतं. तिला मुलांची ओढ आहे, आणि त्या ओढीमधून मुलं जन्माला येतात, आणि तिची जगण्याची ऊर्मी दांडगी आहे. पण तिचे मुलगे जसजसे मोठे होतात, प्रियकर म्हणून ती त्यांची निवड करते– प्रथम थोरला, नंतर दुसरा. आपल्या आईवरील परस्परपूरक प्रेमानं हे मुलगे आयुष्यात पुढं सरसावतात– परंतु जेव्हा ते वयात येतात, पुरुष बनतात, ते प्रेम करू शकत नाहीत, कारण त्यांची आई ही त्यांच्या जीवनातील एक जबरदस्त शक्ती आहे, त्यांना ती धरून ठेवते---- तरुण जेव्हा स्त्रियांच्या सहवासात येतो, तिथं तो दुभंगतो. विल्यम त्याचं 'सेक्स' एका क्षुद्र बाईला देतो,आणि त्याची आई त्याचा आत्मा पकडून ठेवते. दुभंगलेपण त्याचा जीव घेते,कारण त्याला कळत नाही तो कुठं आहे. दुसऱ्या मुलाला एक स्त्री भेटते, ती त्याच्या आत्म्यासाठी त्याच्या आईशी झगडते. मुलगा आईवर प्रेम करतो– दोन्ही मुलगे बापाचा तिरस्कार करतात, त्याच्याविषयी त्यांना असूया वाटते. मुलावरून आई व प्रेयसी यांच्यात झगडा सुरू होतो. हळूहळू आपण वरचढ असल्याचं आई सिद्ध करते, कारण रक्ताचे बंध. आपला आत्मा आपल्या आईच्या हाती सुपूर्द करण्याचं ठरवून, मुलगा, आपल्या थोरल्या भावाप्रमाणं, वासनेच्या मागं जातो. त्याची वासनातृप्ती होते. नंतर पुन्हा दुभंगलेपण जाणवायला सुरुवात होते. काय घडत आहे हे आईच्या ध्यानी येतं आणि मृत्यूच्या दिशेनं तिची वाटचाल सुरू होते. मुलगा आपल्या प्रियपात्रांना बाजूला सारतो आणि मरणोन्मुख असलेल्या आईची शुश्रूषा करतो. सरतेशेवटी सर्व बाजूंनी तो पुरता नागवला जातो, मरणाच्या दिशेनं वाहात जातो.'

एका प्रतिभावंताची सहचरी म्हणून त्याच्या सन्निध असणं यात 'थ्रिलींग' असेलही पण त्यासाठी आत्मिक कणखरपणाचीही गरज असते आणि असा कणखरपणा फारच थोड्या स्त्रियांमध्ये असेल. अशा विरळा स्त्रियांपैकी फ्रीडा होती. आपल्या आईच्या मृत्यूचं प्रकरण लिहीत असताना लॉरेन्स दु:खावेगानं व्यथित झाला होता. त्याच्यावरील औदासिन्याचं सावट दूर करण्याच्या प्रयत्नात फ्रीडाचा धीर कैकदा खचला होता, हातापायातलं त्राण गळालं होतं. त्याची उदासी आपल्याही सहनशक्तीच्या पलीकडे जात असल्याचं ध्यानी येताच ती पार हादरून गेली होती. हा मनावरील ताण घालवण्यासाठी तिनं 'पॉल मोरेल : की त्याच्या आईचा डार्लिंग' हे हलकंफुलकं प्रहसन लिहिलं होतं. या प्रहसनानं लॉरेन्सच्या दु:खाची धार

बोयट केली होती, तिलाही सावरलं होतं. तिच्या खळाळत्या उत्साहानं त्याला कैकदा उभारी दिली होती. ख्रिसमसच्या दिवशी, मिसेस हॉपकीनच्या पत्रात त्यानं लिहिलं होतं : तोडफोड केलेल्या बगीचात आकाश कोसळून पडलं तरी फ्रीडा आणि मी, आम्हा दोघांमध्ये जे भावबंध निर्माण झाले आहेत, ते तोडू शकणार नाही.

लॉरेन्सांच्या घरातील आनंद वीकलींच्या पत्रांनी विरून जाई. ते घटस्फोटाची भाषा करत पण त्या दृष्टीनं काही हालचाल मात्र करत नव्हते. काही वेळेला त्यांची भाषा धमकावणीची असे तर काही वेळेला सूर नरमाईचा असे. एक दिवस त्यांनी पत्रासोबत आपल्या मुलांचे फोटो पाठवले व लिहिलं की फ्रीडा आपल्याकडे परतून आली नाही, तर मुलांना ती कधीच भेटू शकणार नाही. 'तुझे माझे संबंध संपलेत. मला तुला विसरून जायचं आहे आणि मुलांच्या लेखी तू मेलेली आहेस.' डिसेंबरच्या पत्रात त्यांनी धमकावलं की ते स्वत: इटालीला येऊन दोघांनाही ठार मारणार आहेत. त्यांची ही नियोजित भेट कधी घडून आली नाही पण आपल्या कल्पनाशक्तीनं त्यांचं आगमन लॉरेन्सनं आपल्या 'फाईट फॉर बार्बरा' या नाटकानं रंगवलं.

फ्रीडाची वहीण एल्स हीसुद्धा लॉरेन्सनं फ्रीडाचा नाद सोडावा म्हणून त्याच्यामागं टुमणं लावून होती, भावनिक दबाव आणत होती. १४ डिसेंबरच्या पत्रात लॉरेन्सनं थंड माथ्यानं तिला लिहिलं की, तिच्या पत्राचा त्याला राग येत नाही. फ्रीडाचं भलं व्हावं असं तिला वाटतं याची जाणीव त्याला आहे. त्याची सुद्धा तीच इच्छा आहे. पण त्याला वाटतं, नकली सफरचंदासाठी ताजं टवटवीत सफरचंद ती फ्रीडा आणि त्याला फेकून द्यायला सांगत आहे. जर का फ्रीडा आणि मुलं एकत्र सुखानं राहू शकत असतील तर तो सांगेल तिला "जा," कारण तिघांपैकी दोघांचं सुख पुरेसं आहे. पण जर का तिच्या आयुष्याचं बलीदानच करत असेल तर तो तिला जाऊ देणार नाही, अर्थात् तो तिला जवळ ठेऊ शकत असला तरच. त्यानं हेही स्पष्ट केलं की या बलीदानानं मुलांचं भलं होणार नाही, ते त्यांना शापवत ठरेल. ती मोठी झाल्यानंतर त्यांना तिची देखभाल करावी लागेल. स्वत:चं आयुष्य जगण्याची मोकळीक त्यांना लाभणार नाही – प्रथम त्यांना तिच्यासाठी जगावं लागेल तिचं ऋण फेडण्यासाठी घटस्फोट मिळाल्यानंतर मुलांना आपल्यापाशी आणायची उमेद तो बाळगून होता.

सुरुवाती सुरुवातीला मुलांच्या वियोगामुळे व्यथित झालेल्या फ्रीडाचं लॉरेन्स हरप्रकारे सांत्वन करत असे. पण पुढंपुढं तिच्या दु:खानं त्याच्या रागाचा पारा चढू लागला. तिचा जसा आपल्याला आधार वाटतो तसा तिला आपला आधार वाटत नाही. याचा पुरावा म्हणजे तिचं दु:ख, असं त्याच्या मनानं घेतलं आणि या विचारानं त्याला निष्ठुर बनवलं. वीकलींच्या वागणुकीनं या समस्येच्या आगीत तेल ओतलं. ख्रिसमससाठी लॉरेन्सनं फ्रीडाच्या मुलांसाठी



अनुक्रमणिका

काही पैसे पाठवले. वीकलींनी ते परत पाठवून दिले. याचं मनस्वी दु:ख फ्रीडाला झालं. तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या. तिचे अश्रू पाहून लॉरेन्सचं माथं भडकलं. रागाच्या भरात जे शब्द त्यानं स्वप्नातही उच्चारले नसते ते त्याच्या ओठावाटे बाहेर पडले. "तू दु:खी आहेस तर तू तुझ्या नवऱ्यापाशी जा, तुझी वाट मी अजिबात अडवणार नाही." लेकरांच्या वियोगाचं दु:ख प्रत्येक आईला होतं तसंच तिलाही होतं हेच मुळी मान्य करायला त्याची तयारी नव्हती. उपरोधानं पाजळलेली त्याची जीभ तिला परपीडक वृत्तीची जोड. फ्रीडानं गार्नेटपाशी तक्रार केली : 'मुलांच्या बाबतीतील त्याचं वर्तन पशुतुल्य आहे असं मला वाटतं; मी दु:खी आहे म्हणून माझा तो तिटकारा करतो, दु:खाचा एखादा क्षणही सहन करणं त्याच्यानं होत नाही.' खरं तर 'पिलाविना असलेल्या मांजरीगत' तिची अवस्था झाली होती, पण ती जाणून होती 'त्यांच्यापेक्षा (मुलं) त्याला (लॉरेन्स) माझी गरज अधिक आहे.' संतापाचा समंध मानगुटीवरून उतरला की झालं गेलं विसरून लॉरेन्स तिचा अनुनय करत होता, आणि दु:ख गिळून ती त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करत होती.

लॉरेन्सनं इंग्लंडला रामराम ठोकला असला तरी तिथले लागेबांधे त्यानं तोडून टाकले नव्हते. मॅकलेऑड, मिसेस हॉपकीन या स्नेह्यांना त्याची पत्रं जात होती. जेसी चेंबर्स, हेलन कॉर्क व लुई बरोज यांच्याशीही त्याचा पत्रव्यवहार होता. लॉरेन्स आपल्या आयुष्यातून गेला याचं दु:ख, जेसी विसरू शकत नव्हती, हेलनला ते फारसं जाणवलं नाही, लुईनं ते गिळून आपल्या काळजाच्या एका कोपऱ्यात लॉरेन्सला स्थान दिलं होतं. जर्मनीहून लॉरेन्सने तिला दोन पोस्टकार्ड पाठवली होती. पण त्याची भटकंती चालू असल्यानं तिला उत्तरं पाठवता आली नव्हती. पुढं तिनं त्याची बहीण ॲडा हिच्याकडून त्याचा पत्ता मिळवून त्याच्या वाढदिवसाला पत्र पाठवलं होतं, त्याचं अभिष्टचिंतन केलं होतं. पण तोवर तो फ्रीडाबरोबर असल्याचं तिला कळलेलं नव्हतं. नोव्हेंबरमध्ये तिनं त्याला पत्र लिहिलं, त्यासोबत स्वत:चा एक फोटो पाठवला. लॉरेन्सनं १९ तारखेला तिला पोच दिली.

'मी तुझ्याशी क्षुद्रपणानं वागलो याचं दु:ख मला होत आहे. हे मला तुला सांगायचं आहे. तू नेहमी मला खरोखरीच चांगल्या तऱ्हेनं वागवलंस– आणि मी– अखेरी अखेरीला मला जाणवलं, आपण काही त्यातून चांगलं निष्पन्न करू शकणार नाही, अर्थात् चुकलं ते माझंच. मला तुझ्याबद्दल आदर नि कृतज्ञता वाटते,कारण माझ्याशी तू चांगली वागलीस, आणि त्या संदर्भात मी स्वत:चा विचार करतो तो सुखद नाही. हे मी तुला सांगू शकतो, आणि जे काही मी आता करू शकतो ते हे सांगणं एवढंच.

'मी एका घरंदाज स्त्रीबरोबर इथं राहात आहे. तिच्यावर माझं प्रेम आहे. शक्य झाल्यास इंग्लंडला मी येईन आणि तिच्याशी लग्न करीन. गेले सहा महिने आम्ही दोघं नवरा–बायकोप्रमाणं राहातो. आणि मला आशा आहे, आम्ही नेहमीच नवराबायको म्हणूनच राहू.

'एक पशू हे लिहीत आहे याची जाणीव मला आहे. पण मी ते करत आहे याचं कारण तुझ्याबाबतीत ते औचित्याला सोडून होणार नाही असं मला वाटतं. मी तुला कधीच फसवलेलं नाही, की फसवलं आहे मी तुला? तेसुद्धा मी केलंही असेन, मला अभिमान वाटावा असं नाही.'

'जर मी लिहीत राहिलो तर आणखीनच त्रांगड्यात सापडेन. माझ्याबाबतीत आणि यासंबंधी कुणाला काहीही सांगू नकोस, नाही ना सांगणार? वसंतात लग्न करणं आणि चारचौघात सारं जाहीर करणं मला शक्य होईल अशी मी आशा करतो– अर्थात् घटस्फोट मिळाला तरच.

'कधी नव्हे एवढी माझी प्रकृती उत्तम आहे– खिसा खाली आहे– पण पुष्कळ सुखी आहे. तुझ्याबाबतीत मी जे काही केलं त्याची भरपाई करण्याची इच्छा आहे. पण आपण जर का लिहीत राहिलो तर मला वाटतं, माझ्याकडून अधिक अन्याय होईल. आता कायमचा पूर्णविराम देणं अधिक सुलभ होईल – कदाचित् शहाणपणाचंही.

'सर्वांत चांगली गोष्ट तू करू शकतेस ती म्हणजे माझा तिरस्कार.

यावर माझ्या नावाची स्वाक्षरी करणं मला घृणास्पद वाटतं.'

जेसीशी त्यानं पत्रव्यवहार केला होता. तो 'सन्स अँड लव्हर्स'च्या संदर्भात. या कादंबरीवरील स्वत:च्या प्रतिक्रियांची टिपणं तिनं हस्तलिखिताबरोबर त्याच्या हवाली केली होती. तिची टिपणं कादंबरीच्या पुनर्लेखनसमयी त्यानं विचारात घेतली नव्हती, तशी त्याला गरजही वाटली नव्हती. एव्हाना, त्याच्या लेखनप्रक्रियेत फ्रीडा सहभागी झाली होती. त्यानं जेसीला एका पत्रात कळवलं होतं तिनं सुचवलेल्या सुधारणा करणं त्याला शक्य नव्हतं. त्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून त्यानं माफी मागितली होती. फ्रीडाबरोबर राहात असल्याचा गौप्यस्फोट त्यानं एका पत्रात केला होत. त्याचबरोबर हे गुपित अँडाव्यतिरिक्त अन्य कुणालाही त्यानं सांगितलं नसल्याचं तिला विश्वासात घेऊन कळवलं होतं. वस्तुत: हे गुपित त्याच्या बऱ्याच मित्रांना ठाऊक झालं होतं.

हे गुपित कळल्यानंतर आपण सुटकेचा श्वास सोडला असे जेसीनं नमूद केलं आहे. परंतु प्रत्यक्षात ही बातमी, मृत्यूनं दिलेल्या हादऱ्यागत होती, तिनं जेसीचा भविष्यकाळ उजाड करून टाकला होता. जेसीच्या व्यक्तिमत्त्वामधला आकस्मिक बदल तिची जिवाभावाची मैत्रीण हेलन कॉर्क, हिच्याही लक्षात होता. तिच्या मते, जेसीमधली, 'ज्योत जणूकाही मंद झाली होती.'

१९१३च्या फेब्रुवारीमध्ये लॉरेन्सचा 'लव्ह पोएम्स अँड अदर्स' हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. या संग्रहाची एक प्रत जेसीकडे पाठवून देण्यास त्यानं प्रकाशकाला सांगितलं. त्यानुसार तो कवितासंग्रह जेसीच्या हाती आला. त्यातल्या बऱ्याचशा कविता तिनं त्याच्या नोटबुकात यापूर्वी वाचलेल्या होत्या. तिनं त्याला आभाराचं पत्र लिहिलं, आपल्या प्रतिक्रिया कळवल्या.



अनुक्रमणिका

त्याचं उत्तर आलं. पूर्वी तिच्या प्रतिक्रिया जाणून घेण्यास तो उत्सुक असे. पण यावेळी त्यांची दखलही त्यानं घेतलेली नव्हती. उलट लिहिलं : 'छोटं पुस्तक चांगलं आहे.' शिवाय आमंत्रण दिलं. तिनं तो आणि फ्रीडा यांच्याबरोबर राहायला इटालीला यावं. पत्रासोबत 'सन्स अँड लव्हर्स'ची प्रुफही पाठवली.

कादंबरीचे हस्तलिखित वाचून जेसीला मनस्ताप भोगावा लागला होता. आता प्रुफं वाचून पुन्हा यातना भोगण्याची तिची तयारी नव्हती. तिनं लॉरेन्सचं पत्र तिची थोरली बहीण मे हिला दाखवलं. तिनं सल्ला दिला की त्याच्या पत्राला उत्तर न देता ते तसेच परत त्याच्याकडे पाठवून द्यावं. तिचा सल्ला जेसीनं मानला. त्याचं पत्र परत पाठवताना त्याच्या मागच्या उद्‌गारांचं तिला स्मरण झालं. तो म्हणाला होता : 'कुठलीही स्त्री एखाद्या पुरुषाला टनभर औदार्य देईल, पण अशी एखादी तरी स्त्री असेल का जी त्याला औंसभर न्याय देऊ शकेल.' तिनं त्याच्या पत्राला चिठ्ठी जोडली : 'हा तुझ्यासाठी औंसभर न्याय,' आणि प्रुफं त्याच्या बहिणीकडे पाठवून दिली. तिची ही कृती म्हणजे हिशेब पूर्ण झाल्यानंतर मारलेली रेघ होती.

त्यानंतर १६ मार्चला जेसीनं हेलनला लिहिलं :

'या घटकेला प्रुफांमध्ये काहीही फेरबदल करणं शक्य नसतानाही ती प्रुफं मी वाचावी अशी इच्छा लॉरेन्सला का व्हावी याचा मला खरोखरीच उलगडा होत नाही. दुसऱ्याची कदर करण्याबाबत तो बेफिकीर असावा. मला ती तापदायक ठरली नसती तर त्यांची मी पर्वाही केली नसती, भावनोद्रेकाची ही सारी घालमेल. पण मला त्यामुळं अतिशय थकवा जाणवत आहे. जेवणखाण जात नाही. झोप नाही. आणि शेकोटीसमोर मी बसलेली असले तरी मला हुडहुडी भरते, तापाचा झटका आल्यागत.

'कादंबरीमधील मिरीयमचा भाग ही चक्क नालस्ती आहे, हादरा बसावा असा विश्वासघात. मिरीयमला प्रतिकूल ठरतील अशा तऱ्हेनं डेव्हिडनं घटना निवडलेल्या आहेत. आणि मिसेस मोरेलला मिरीयमविषयी वाटणारा द्वेष लक्षात घेऊन मिरीयमचा प्रत्येक शब्द आणि तिचं वागणं याचं त्यानं विश्लेषण केलेलं आहे.

'--- तुला एव्हाना माहीत झालं नसेल तर, मला सांगायचं आहे तुला की, तो परदेशात गेल्यापासून एका विवाहित स्त्रीबरोबर राहात आहे. नवराबायको म्हणूनच त्यांच्याकडे पाहिलं जातं. तिच्या घटस्फोटाची सुनावणी लौकरच होईल, असं माझ्या कानी आलेलं आहे. तू फार आश्चर्यचकित झाली असशील असं मला वाटत नाही. मेहरबानी करून, हे लौकर पचवून टाक आणि मी येण्याआधी यातून बाहेर पड. डेव्हिडची आणि त्याच्या संदर्भातल्या साऱ्या गोष्टींची मला मरणाची उबग आलेली आहे.'

हे पत्र म्हणजे हेलनच्या निमित्तानं जेसीनं केलेली स्वत:ची समजावणी होती. पण स्वत:च्या मनाची समजूत घालूनही प्रेमभंगाचं दु:ख तिला आयुष्यभरात कधीच पचवता आलं

नव्हतं.

आपली प्रेमकहाणी जेसीनं लिहावी असं एडवर्ड गार्नेटनं तिला सुचवलं होतं, प्रोत्साहनही दिलं होतं. १९१०च्या सुमारास जेसीनं 'द रेथ प्राईम रोज' ही कादंबरी लिहिली होती. १९११ मध्ये तिच्यावर जेसीनं परिष्करण केलं होतं. नावही बदलून 'युनिस टेंपल' असं ठेवलं होतं. हे नाव तिच्या कादंबरीच्या नायिकेचं होतं. तिनं हस्तलिखित गार्नेटपाशी पाठवूनही दिलं होतं. ही वार्ता लॉरेन्सला कळताच ११ मार्च १९१३ रोजी त्यानं गार्नेटला पत्र लिहिलं आणि जेसीच्या कादंबरीचं हस्तलिखित वाचण्याची इच्छा प्रदर्शित केली. आपल्यापेक्षा फ्रीडा अधिक उत्सुक असल्याचं कळवलं. तरीही गार्नेटकडून हस्तलिखित येण्याची चिन्हे दिसेनात. म्हणून मे च्या प्रारंभी त्यानं पुन्हा एकवार विनंती केली. यावेळी त्याच्या विनंतीचा गार्नेटने मान राखला. हस्तलिखित वाचल्यानंतर फ्रीडानं १७ तारखेला गार्नेटला लिहिलं : 'मला वाटतं मिरीयमची कादंबरी फार आवडावी अशीच आहे. आणि कुणालाही तिच्याबद्दल अतिशय वाईट वाटेल. पण ती कादंबरी म्हणजे 'सन्स अँड लव्हर्स'चं धूसर झालेलं छायाचित्र आहे. स्वत:च्या आंतरिक घडामोडीविषयी तिला कधीच काही कळलेलं नव्हतं. परंतु एखादा व्यथित व्हावा एवढं मात्र तिनं साधलेलं आहे.'

तिच्या पत्रानंतर दोन दिवसांनी लॉरेन्सनं प्रतिक्रिया कळवल्या 'मिस चेंवर्सची कादंबरी आम्हाला मिळाली. तिला ओळखणं मलाही मुष्किल झालं – ती कधीच काही बोलायची नाही. पण कादंबरी वाईट नाही, आणि तिनं मला एवढं व्यथित केलं, दोन दिवस घराबाहेर पडण्याइतपतही ताकद माझ्यात नव्हती.'

आपल्या कादंबरीचं हस्तलिखित लॉरेन्सनं वाचलं याची कल्पना जेसीला नव्हती. पुढील वर्षी त्याची 'दि रेनबो' तिच्या वाचनात आली तेव्हा आपल्या हस्तलिखिताचा थोडाफार वापर त्यानं या कादंबरीत केला असल्याचं तिला आढळून आलं. परंतु आपल्या हस्तलिखिताचा थांगपत्ता मात्र तिला पुढं कधीच लागला नाही.

फ्रीडा इंग्लंडमध्ये राहिल्यास तिला तिच्या मुलांचा सहवास लाभू शकेल असा विचार करून लॉरेन्सबरोबर इंग्लंडला जाण्याचा बेत आखण्यात आला. इटाली सोडून इंग्लंडला जाणं लॉरेन्सला बिलकुल पसंत नव्हतं. परंतु फ्रीडाला एकटी पाठवण्यास तो धजत नव्हता. न जाणो, मुलांची भेट झाल्यावर त्याच्याबरोबर राहाण्याचा तिचा निश्चय डळमळला तर ! दोघांनी मिळून इंग्लंडला जाण्याच्या निर्णयावर शिक्कामोर्तब झालं. ५ एप्रिल १९१३ रोजी अॅडाला पत्र लिहून लॉरेन्सनं आपला बेत तिच्या कानी घातला.



अनुक्रमणिका

## आठ

फ्रीडाच्या तडकाफडकी जाण्यानं वीकली कुटुंबावर झालेला आघात जबरदस्त होता. गतकाळाची नाळ पुरती तोडून टाकण्यासाठी फ्रीडानं जर्मनीहून आणलेल्या आयाला वीकलींनी कामावरून काढून टाकलं होतं. नॉटिंगहॅममधील स्वत:चं घर आणि हॅम्पस्टेड येथील वडिलोपार्जित घर, दोन्ही घरं त्यांनी विकून टाकली होती. आपली मुलं, आईवडील, अविवाहित आत्या आणि अविवाहित काका यांच्यासह चिस्विक येथे ते राहात होते. फ्रीडाचा नामोल्लेख घरात कटाक्षानं टाळला जात होता. मुलांचं आईविषयीचं मत कलुषित करण्यात, ती एक दुष्ट बाई असल्याचं त्यांच्या मनावर ठसवण्यात वडीलधारी माणसं प्रयत्नशील होती. फ्रीडाची मॉन्टी आणि एल्सा ही मुलं वडिलांच्या बाजूची होती. धाकटी बार्बरा ही जात्याच बंडखोर होती. तिच्या हातून काही आगळीक घडली की तिची तुलना नेहमी तिच्या आईशी केली जात होती. लॉरेन्स आणि फ्रीडा पुढं इटालीमध्ये असताना बार्बरा त्यांच्याकडे राहायला गेली होती. तेव्हा फ्रीडा गेल्यानंतर वीकलींच्या घरातलं वातावरण कसं होतं याविषयी तिच्या तोंडून ऐकायला मिळालं होतं. त्या आधारे लॉरेन्सनं 'द व्हर्जिन अँड द जिप्सी' ही कथा लिहिली. पळून गेलेल्या पत्नीबद्दलचा क्रोध, चीड, घरातलं अवघं वातावरण कसं गुदमरवून टाकतं याचं चित्रण या कथेत केलेलं आहे.

जूनच्या मध्यावर लॉरेन्स आणि फ्रीडा इंग्लंडला परतले. गार्नेटशी त्यांचे संबंध जवळिकेचे. साहजिकच त्यांच्या घरी उतरणं सर्व दृष्टीनं सोयीचं. गार्नेट केंटमधील केअर्न (Cearne) या गावी राहात. घरात मिसेस गार्नेट आणि मुलगा डेव्हिड. एडवर्ड गार्नेटचं वास्तव्य लंडनला. मिसेस गार्नेटला लॉरेन्सचं लोभस व्यक्तिमत्त्व भावलं. फ्रीडा मात्र तिच्या मस्तकात गेली.

इंग्लंडच्या भूमीवर पाऊल टाकल्यापासून आपल्या मुलांना कधी एकदा भेटते असं फ्रीडाला झालं होतं. मुलं चिस्विक येथे राहातात एवढं तिला चौकशीअंती कळलं. पण त्यांचा नेमका पत्ता तिला मिळेना. रस्त्यावर कुठं तरी मुलं दृष्टीला पडतील या आशेनं ती भटक भटक भटकली. कर्मधर्मसंयोगानं, तिच्या परिचयाचे पडदे तिला खिडक्यांना लावलेले दिसले ते पडदे नॉटिंगहॅमला तिनंच विकत घेतलेले होते. तिनं त्या घरात धाव घेतली आणि मुलांना भेटायला पहिल्या मजल्यावर पोचली. तिच्या या आगंतुक आगमनानं मुलं घाबरून गेली. त्यांची आई एक घाणेरडी बाई आहे हे त्यांच्या मनावर सातत्यानं ठसवण्यात आलेलं असल्यामुळं ती सामोरी येताच काय करावं, मुलांना समजेना. मुलांबरोबर दोन शब्द बोलायच्या आधीच अपमानास्पदरीत्या तिला घराबाहेर काढण्यात आलं.

या अपेशी प्रयत्नाच्या आघातामधून सावरल्यानंतर फ्रीडानं ठरवलं, मुलांना गुपचूप रस्त्यावर भेटायचं. मॉंटेग्यू लंडनमधील 'सेंट पॉल स्कूल'मध्ये शिकत होता. त्या शाळेच्या

प्रवेशद्वारापाशी ती घुटमळत राहिली. तिचं नशीब बलवत्तर. मॉंटेग्यू तिला भेटला. प्रेमानं चौकशी झाली. तिनं त्याला मिठाईच्या दुकानात नेलं. या भेटीची वाच्यता त्यानं घरी केली नाही. त्यानंतर तिच्या दोन्ही मुली अचानक रस्त्यात भेटल्या. आईला पाहाताच त्यांना खूप आनंद झाला. त्यांनी विचारलं की ती पुन्हा घरी केव्हा येणार. तिनं त्यांना पोटाशी धरलं आणि समजावून सांगितलं की त्यांना थोडी कळ सोसावी लागेल. त्या खुषीत घरी परतल्या. पण आपल्या भावाची सावधगिरी त्यांनी घेतली नाही. त्यांना तंबी देण्यात आली. फ्रीडानं जेव्हा त्यांना पुन्हा भेटण्याचा प्रयत्न केला तेव्हा ती दुष्ट पिशाच्च असल्यागत पांढऱ्याफटक चेहऱ्यानं तिच्याकडे एकटक पाहात राहिल्या आणि नंतर तोंड फिरवून निघून गेल्या. फ्रीडा सुन्न झाली.

मुलांची भेट होऊ देण्यात नाना अडचणी सतत उभ्या केल्या जात असल्याचं पाहून फ्रीडा सैरभैर झाली. तशात, तिच्याकडे, तिच्या समस्यांकडे पूर्णपणे दुर्लक्ष करून मित्रपरिवार लॉरेन्सबद्दलच आस्था दाखवत असल्याचं पाहून ती अधिकच चिडचिडी बनली. आपल्या अस्तित्वाची जाणीव लॉरेन्सला कशी करून द्यायची हे ती ओळखून होती. दोघांची खडाजंगी सुरू झाली. हमरीतुमरीवर येऊन भांडण करताना त्यांना पाहून मिसेस गार्नेट काळजीत पडली. या भांडणात तिची सहानुभूती लॉरेन्सला होती. फ्रीडाचं दुःख तिला जाणवत होतं. पण तिचं म्हणणं, इच्छित गोष्ट साध्य करून घेण्याचं कौशल्य तिच्या अंगी नाही, घिसाडघाईनं चांगल्या संधीचाही बट्ट्याबोळ करणाऱ्यांपैकी ती एक आहे. शिवाय लॉरेन्ससारख्या संवेदनाक्षम माणसाच्या भावना जाणण्याची कुवतच तिच्यापाशी नाही. याचा परिणाम, त्याचं संतापानं किंचाळणं. डेव्हिड फ्रीडाच्या बाजूचा. त्याचं म्हणणं, ही भांडणं जुंपतात याला कारणीभूत लॉरेन्स. मुळात तो तुसडा, त्यात फ्रीडाच्या मुलांबद्दलच्या असूयेची भर.

लॉरेन्सांच्या भांडणांनी मिसेस गार्नेट अगदी बेजार होऊन गेली. तिला कळत नव्हतं, या जोडप्याचे संबंध कसे काय टिकून राहाणार आहेत ! तिनं त्याला तसं विचारलंही. त्यावर तो म्हणाला, "मला ठाऊक नाही. माझं तिच्यावरचं प्रेम चिरंतन आहे. पण माझ्या प्रेमाच्या निम्म्यानंही तिचं माझ्यावर प्रेम नाही." मिसेस गार्नेटनं सौम्य शब्दात त्याची कानउघाडणी केली. त्यानंतर तो रागाला आवर घालू लागला. अर्थात् नाखुषीनं. महिनाभर लॉरेन्स गार्नेटांच्या घरी राहिले.

१९१३च्या मे मध्ये 'सन्स अँड लव्हर्स' प्रसिद्ध झाली होती. त्या कादंबरीवरची परीक्षणं उत्साहवर्धक, अनुकूल होती. वर्षभरात प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या कादंबऱ्यांमध्ये लॉरेन्सच्या या नव्या कादंबरीशी बरोबर करणारी एकही कादंबरी आढळत नाही असा अभिप्राय 'द लंडन सॅटर्डे रिव्ह्यू'नं दिला होता. इंग्लंडला परतल्यानंतर आठवड्याभरात मानधन म्हणून त्याच्याकडे पन्नास पौंड पाठवण्याची व्यवस्था गार्नेटनं केली होती. ही कादंबरी प्रकाशित

करून डकवर्थनं पैसे गमावले, पण एक महत्त्वाचा लेखक म्हणून लॉरेन्सचे नाव साहित्य-जगतात झळकले. या जगतातील एका नव्या वर्तुळात त्याचा प्रवेश झाला; अनेक चाहाते लाभले, मित्र मिळाले. त्यातीलच जॉन मिडल्टन मरे आणि कॅथरीन मॅन्सफिल्ड. 'मरेज' म्हणून ती दोघं साहित्यप्रांती ओळखली जात.

लॉरेन्स आणि मरेज यांची मैत्री, फ्रीडाच्या शब्दात सांगायचं तर, 'उत्स्फूर्त' होती 'खेळीमेळी'ची होती. त्या चौघांमध्ये बऱ्याच गोष्टी समान होत्या. कॅथरीन आणि फ्रीडा त्यांच्या नवऱ्यांकडून घटस्फोट मिळण्याची वाट पाहात होत्या, थोरामोठांच्या घरच्या होत्या, त्यांच्या प्रियकरांपेक्षा वयानं मोठ्या होत्या, 'सेक्स'चा बाऊ त्यांनी कधी केला नव्हता. कॅथरीननं आपल्या फ्लॅटमधील एक खोली मरेला दिली होती, त्याची 'मिस्ट्रेस' बनण्याची आपणहून तयारी दर्शवली होती. त्याच्या होकारासाठी त्याचा पिच्छा पुरवला होता. पॅरीसमधील वास्तव्यात एका वेश्येच्या संसर्गानं गनोरिया झाल्याचं निमित्त होऊन मरेच्या मनात भयगंड निर्माण झाला होता, तो घालवण्यात कॅथरीन यशस्वी झाली होती.

कॅथरीनची मायभूमी न्यूझिलंड. वेलिंग्टन येथे १८८८मध्ये तिचा जन्म झाला. तिचे वडील 'बँक ऑफ न्यूझिलंड'चे चेअरमन. कॅथरीन पंधरा वर्षांची झाल्यानंतर त्यांनी तिला उच्च शिक्षणासाठी इंग्लंडला पाठवले. इंग्लंड हीच तिनं आपली कर्मभूमी मानली. १९११ मध्ये मरेशी तिचा परिचय झाला. मरे तिच्याहून वर्षानं लहान. 'वॉर ऑफीस' मधल्या एका गरीब कारकुनाचा मुलगा. स्वकर्तृत्वावर त्यानं शिक्षण घेतलं, स्कॉलरशिपवर ऑक्सफर्डमध्ये प्रवेश मिळवला. कॅथरीनच्या सहवासात राहाता यावं म्हणून पदवीचा मोहही त्यानं बाजूस सारला.

कथालेखिका म्हणून कॅथरीन एव्हाना नावारूपाला येऊ लागली होती. १९११ मध्ये प्रकाशित झालेल्या 'इन अ जर्मन पेन्शन' या कथासंग्रहाचं चांगलं कौतुक झालं होतं. मरेही लेखक होण्याचं स्वप्न बाळगून होता. परीक्षण करून कमाई करत होता. पॅरीसमधल्या वास्तव्यात तिथल्या साहित्यिक चळवळीनं भारून जाऊन त्यानं इंग्लंडला परतल्यानंतर 'ऱ्हिदम' मासिक चालू केलं होतं. त्या मासिकाचं संपादन तो कॅथरीनच्या मदतीनं करत होता. या मासिकाची निर्मितीमूल्यं सुमार असली तरी त्यातील मजकुरामध्ये विविधता होती, नावीन्य होतं, साहित्यिक दर्जा होता. १९१३च्या जानेवारीत कॅथरीननं लॉरेन्सला इटालीत पत्र पाठवून त्याचं लिखाण पाठवण्याची विनंती केली होती. आपल्या लिखाणाला मानधन मिळणार नाही हे ठाऊक असूनही त्यानं होकार कळवला होता. मरेज चान्सरी लेनमध्ये तीन खोल्यांच्या जागेत राहात. त्यातल्या एका खोलीत त्यांनी 'ऱ्हिदम'चं ऑफीस थाटलं होतं.

या पत्रव्यवहाराचा आधार घेऊन १९१३च्या जुलैमध्ये मरेज लॉरेन्सच्या घरी पोचले. या प्रथम भेटीतच लॉरेन्स आणि मरेज यांच्यात मैत्रीचे धागे जुळले गेले. चौघांनाही एकमेकांची व्यक्तिमत्त्वं परस्परपूरक वाटली.

फ्रीडानं कॅथरीनला आपली धाकटी बहीण मानलं. कॅथरीनलाही फ्रीडाचा लळा लागला. वीकलींकडून फ्रीडाला जी वागणूक मिळत होती, ती पाहून कॅथरीन संतापत असे. फ्रीडाच्या चिठ्ठ्याचपाट्या, तिच्या मुलांना पोचवणं व त्यांचे निरोप फ्रीडाला सांगणं हे काम ती आपुलकीनं करत असे, फ्रीडाची चित्तवृत्ती प्रसन्न राहावी यासाठी झटत असे, आपले अंतरीचे गूज मोकळेपणानं फ्रीडाला सांगत असे. तथापि ह्या दोघींची व्यक्तिमत्त्वं भिन्न होती. कॅथरीनला शय्यासोबतीसाठी पुरुष,स्त्री दोन्हीही चालत असत. फ्रीडाला तर शाळेत असल्यापासून केवळ पुरुषांचंच आकर्षण. कॅथरीनच्या अवतीभोवती स्त्री चाहात्यांचा वावर असे. असली मैत्री फ्रीडाला मानवण्याजोगी नव्हती. स्वत:मधले साहित्यिक गुण वाढीला लावावेत, जोपासावेत याविषयी फ्रीडाला यत्किंचितही आस्था नव्हती. तर, कॅथरीन लेखिका म्हणून स्वत:चं स्थान निर्माण करण्याची ईर्षा बाळगून होती, अन्य बाबी तिच्या लेखी गौण होत्या. दोघीही प्रचलित,मान्यताप्राप्त रीतीरिवाज बिनदिक्कतपणे झटकून टाकणाऱ्या, पण आपल्याविषयी इतरेजन काय म्हणतात, याला कॅथरीन महत्त्व देत असे, आपल्याबद्दलचं इतरांचं मत चांगलं व्हावं याची खबरदारी घेत असे. उलट फ्रीडा उद्धट वाटावी एवढी सडेतोड बोलणारी. अर्थात त्यांची भिन्न व्यक्तिमत्त्वं त्यांच्या मैत्रीमध्ये कधी आड आली नाहीत.

जवळजवळ संपूर्ण जुलै लॉरेन्स आणि फ्रीडा किंग्जगेट येथे राहिली. इथं एडवर्ड मार्श त्यांना जाऊन भेटला. विन्स्टन चर्चिलचा तो सचिव. काव्याची उत्तम जाण असणारा. 'जॉर्जिअन पोएट्री : १९११-१२' या निवडक कवितांच्या संग्रहाचा संपादक. लॉरेन्स इटालीमध्ये असताना त्याची 'स्नॅप डॅगन' ही कविता मिळवून मार्शनं आपल्या संपादित पुस्तकात समाविष्ट केली होती. त्याचं मानधन म्हणून तीन पौंडाचा चेक त्यानं गार्नेटच्या पत्त्यावर पाठवला होता. गार्नेट- लॉरेन्स यांची मैत्री त्याला ठाऊक होती. गार्नेटनं तो चेक किंग्जगेटला लॉरेन्सकडे धाडून दिला होता. तो चेक हाती पडताच लॉरेन्सनं मार्शला आभाराचं पत्र लिहिलं होतं आणि आपल्या घरी येण्याचं आमंत्रण दिलं होतं. त्या आमंत्रणानुसार २० जुलैला, रविवारच्या सुटीत मार्श लॉरेन्सांकडे पोचला. त्याच दिवशी त्यानं रूपर्ट ब्रुकला लिहिलं : 'तो (लॉरेन्स) अतिशय आजारी असल्यागत दिसला, मला वाटतं तो आजारी असावा- त्याची बायको अगदी दिलखुलास, सुदृढ, गोल गुबगुबीत जर्मन बाई, सहजीवनात ते खूप सुखी आहेत असं दिसतं.'

लॉरेन्सचं आमंत्रण मिळूनही मरेज त्यांच्या घरी पोचले नव्हते. मार्शनं लॉरेन्सला सांगितलं की बहुधा मरेपाशी रेल्वे तिकिटासाठी पैसे नसल्यामुळे त्यांना येणं जमलेले नसावं. हे ऐकून लॉरेन्सला आश्चर्य वाटलं. तो समजत होता, त्यांची आर्थिक स्थिती चांगली असणार आणि आपल्याहून लेखनावर ते जास्त पैसे मिळवत असणार. २२ जुलैला त्यानं मरेला जरा खरमरीत पत्र पाठवलं, लिहिलं, 'एक पौंड मी कर्जाऊ दिला असता' आणि पुढील विकएन्डला येण्याचं पुन्हा आमंत्रण दिलं. यावेळी मात्र मरेनं त्याच्या आमंत्रणाचा मान



अनुक्रमणिका

राखला. कॅथरीन आणि बॅरिस्टर मित्र चार्ल्स हेन्री गॉर्डन कॅंपबेल यांच्यासह तो लॉरेन्सच्या दारात उभा राहिला. पोहोणं आणि अखंड बडबड. स्टेक आणि टोमॅटो ही मेजवानी. वेळ अगदी मजेत गेला. हिवाळ्यात इटालीला येऊन आपल्याबरोबर राहाण्याचं लॉरेन्सनं आमंत्रण दिलं. शक्य झाल्यास येतो असं मरेजनं आश्वासन दिलं. निरोप घेताना लॉरेन्सनं त्यांना 'सन्स अँड लव्हर्स'ची प्रत भेट दिली. जुलै अखेरीस लॉरेन्सांनी किंग्जगेट सोडलं.

'सन्स अँड लव्हर्स'च्या प्रकाशनानंतरच्या या मायभूमीच्या भेटीत लॉरेन्सला आढळून आलं की तो आता 'कुणीतरी' बनतो आहे. कादंबरीचं अनुकूल स्वागत झालेलं पाहून त्याचा आत्मविश्वास बळावला, फ्रीडाच्या सततच्या सान्निध्यानं तो आणखीन दृढ केला. सुरक्षित जीवनाची हमी नसतानाही त्यानं एका स्त्रीला तिच्या नवऱ्यापासून स्वत:कडे खेचलं होतं, मुलांवर तिची अतोनात माया असूनही तिला जवळ ठेवण्यात यश संपादन केलं होतं, मुलांची ओढ असूनही त्याला सोडून जावसं तिला वाटत नव्हतं. पुन्हा ते युरोपकडे वळले तेव्हा त्या दोघांनाही ठाऊक होतं उर्वरित आयुष्यातही ते एकत्र वाटचाल करणार आहेत.

लॉरेन्सच्या डोक्यात एक कथाविषय आता खदखदत होता. या कथानकावरील कादंबरी 'द रेनबो' या नावानं प्रसिद्ध व्हायची होती. ही कादंबरी लिहिणं सोपं नव्हतं. बराच काळ निर्मितीप्रक्रियेत जायचा होता. आपल्याला जे सांगायचं आहे ते नेमकेपणानं सांगण्यासाठी त्याला झगडावं लागणार होतं. प्रथम जर्मनीत तो झगडला, नंतर इटालीमध्ये आणि अखेरीस इंग्लंडमध्ये. शेतमळ्यावर, खाणकामगारांच्या घरांवर आणि खाणींवर गूढ इंद्रधनुष्याच्या कमानीचं चित्र तो रेखाटू शकला आणि त्याखाली लिहू शकला. 'माझं इंद्रधनुष्य मी पूर्ण केलं', तो दिवस त्याच्या लेखी सोनियाचा दिवस होता. पण तो दिवस उगवण्यासाठी जवळजवळ दोन वर्ष उलटावी लागणार होती. दरम्यानच्या काळात लॉरेन्स आणि फ्रीडा यांना बराच काळ युरोपमध्ये पुन्हा कंठावा लागणार होता. ह्या काळाचा प्रारंभ १९१३ च्या ऑगस्टमध्ये सुरू झाला, इरश्नेन हाऊझेनमध्ये ते पोचले तेव्हा तिथं ते साडेपाच आठवडे राहिले. तिथून दोघांनी वेगवेगळ्या वाटा धरल्या. फ्रीडा आपल्या आईवडिलांना भेटण्यासाठी जर्मनीला गेली. लॉरेन्सनं स्वित्झर्लंडमध्ये स्वच्छंद भटकणं पसंत केलं. स्वित्झर्लंड त्याला 'फारच पर्यटकी' वाटलं, त्याचा जीव रमत नव्हता तरी दोन आठवडे तो तिथं राहिला. त्यानंतर इटालीची वेस ओलांडून मिलानला पोचला, फ्रीडाच्या आगमनाची वाट पाहात राहिला.

ऑक्टोबरमध्ये लॉरेन्स आणि फ्रीडा फिआश्चेरिनो येथे स्थायिक झाले. एक छोटसं घर त्यांनी भाड्यानं घेतलं. तीन खोल्या आणि एक स्वयंपाकघर. महिन्याला भाडं ६० लिरा. आठ महिने ते इथं राहिले. दिवसाचा बराचसा काळ ते बाहेरच घालवत. दिवसभर भटकत. रात्री काळोख दाटू लागला की घरी परतत. लॉरेन्स सतत कामात व्यग्र असायचा. त्यानं फ्रीडाला

बरीच गाणी शिकवली. दोघंही संध्याकाळची गाणी म्हणायचे. स्पेझिआमधून एक पियानोही त्यांनी आणला. क्वचित दोघंही चित्र काढायचे. त्याचं काम टापटिपीचं. चित्र काढताना त्याला स्थळकाळाचंच भान राहात नसे. फ्रीडाचा कारभार गलथान. केवळ मौज म्हणून ती ब्रश हाती घ्यायची.

लॉरेन्सचं कादंबरीलेखन रखडत चाललं होतं. फिआश्चेरिओमध्ये आल्यानंतर लगेच त्यानं लिहिलं (५ ऑक्टोबर) "सन्स अँड लव्हर्स'' चा तारा माझ्या आकाशात मावळू लागला आहे, आता मी दुसऱ्या अगदी पूर्णपणे भिन्न अशा कादंबरीवर काम करत आहे;' पण २७ ऑक्टोबरमध्ये लिहिलं; 'मी एवढा बेचैन आहे, ही भ्रमंती आणि मुलांवरून चाललेली फ्रीडाची कुरबूर. . . . आणि बरंच काही, जेणे करून काम करणं मला अशक्य झालं आहे.' या काळात त्याचीच साहित्यनिर्मिती मंदावली होती. 'लुक ! वुइ हॅव कम थ्रू' या कविता-मालिकेत एकाही नव्या कवितेची भर पडली नव्हती. त्यांनी कथा लिहिल्या नाहीत, लेख लिहिले नाहीत. पैशाची तंगी होती. फ्रीडाच्या घटस्फोटाच्या समस्येची टांगती तलवार होती. तशात पाहुणे त्याच्याकडे राहून जात होते. त्यापैकी आयव्ही लो ही एक.

आयव्ही लो लॉरेन्सला भेटायला आली. तेव्हा 'ग्रोईंग पेन्स' आणि 'द क्वेस्टिंग बीस्ट' या दोन कादंबऱ्या तिच्या नावावर होत्या. त्या थोड्या फार प्रमाणात लोकप्रियही झाल्या होत्या. इंग्लंडमधील ज्यू विचारवंतांच्या घरातली ही छोकरी उमेदीची. वय वर्ष पंचवीस पण आत्मविश्वास दांडगा ! मी आजवर वाचलेल्या कादंबऱ्यांपैकी सर्वात अलौकिक साहित्यकृती हे तिचं 'सन्स अँड लव्हर्स' वरील मत. ही कादंबरी वाचून भारावून तिनं लॉरेन्सला पत्र लिहिलं. लॉरेन्सचा पत्ता नसल्यामुळं पत्र प्रकाशकाच्या पत्त्यावर पाठवलं. तिथून ते लॉरेन्सकडे आलं. क्रेस्ट पेपरवर त्यानं तिला उत्तर लिहिलं. पत्रासोबत एक टीप जोडली. क्रेस्ट पेपर पाहून तिनं बिथरून जाऊ नये. 'माझ्या पत्नीचे वडील बॅरन आहेत.' आणि तो पेपर हाती आला म्हणून त्यावरच त्यानं लिहिलं एवढंच. आपण कष्टकरी वर्गातले आहोत अशी प्रौढी त्यानं पुढील काळात मिरवलेली असली तरी, या काळात बॅरनच्या मुलीशी शरीरसंबंध जोडल्यामुळं जणू काही तो स्वतःही त्यांच्यातलाच झाला असल्याचा विचार त्याला सुखावीत होता. त्याचा हा भंपकपणा दूर करण्याचा प्रयत्न फ्रीडानं चुकूनही कधी केला नाही. आता महागड्या क्रेस्ट पेपरचा आणि बॅरन या बिरुदाचा वापर त्यानं आयव्हीवर छाप मारण्यासाठी केला होता असं म्हटलं तर ते वावगं ठरू नये.

आयव्हीच्या वृत्तांतानुसार तिचं स्वागत अगदी तोंड भरून करण्यात आलं. लॉरेन्स प्रथम भेटीत काहीसा अवघडल्यासारखा होता. आपल्याविषयी तिला काय वाटतं असं त्यानं विचारलं. त्याच्या मनावरचं दडपण तिनं दूर केलं. आयव्ही सांगते, जीवनेच्छेने मुसमुसणारा एक कष्टकरी माणूस तिनं पाहिला. त्यानं तिच्याकडे जातीनं लक्ष पुरवलं त्यामुळं ती संकोचून गेली. स्वतःविषयीचं तिचं मत जाणून घेण्यास लॉरेन्स उत्सुक होता या तिच्या सांगण्यावर

विश्वास ठेवणं कठीण आहे. असा प्रश्न त्यानं कधीही कुणालाही विचारलेला दिसत नाही, त्याच्या स्वभावाशीही ते सुसंगत वाटत नाही.

आयव्हीचा उत्साह अमाप. प्रारंभीचे चारपाच दिवस लॉरेन्सच्या सहवासात छानपैकी गेले. परंतु त्यानंतर त्यांच्या गट्टीला ग्रहण लागत गेलं. तिच्याबद्दलचं त्याचं मत बदललं. ती सांगते,'एकेक करून माझ्यातला प्रत्येक दोष काढायला' त्यानं सुरुवात केली, 'आणि त्यातले काही असे होते जे आजवर कुणालाही आढळून आलेले नव्हते.' काहीही निमित्त करून तो तिला फैलावर घेत होता. उदाहरणार्थ, तो स्वयंपाक करत असताना ती त्याला मदत करायला पुढं येत नव्हती. त्याचं हे वागणं तिला योग्य वाटत नव्हतं. तिचं म्हणणं, फ्रीडा कुठं काही मदत करत होती, नुसती बसून राहात होती आरामात – 'जणू काही तिचं अस्तित्वच पुरेसं होतं!'

फ्रीडाचा चरित्रकार रॉबर्ट ल्यूकास सूचित करतो की लॉरेन्स आपल्या या नव्या मैत्रिणीबरोबर बराच वेळ घालवतो त्याबद्दल फ्रीडाला असूया वाटत होती. आयव्ही तर उघडपणे कबूल करते की लॉरेन्सच्या शय्येवरील फ्रीडाची जागा बळकावणं तिला भारी आवडलं असतं. यापैकी कुणीही पुरेसं स्पष्टीकरण देत नाही. लॉरेन्स आयव्हीवर टीकेची झोड का उठवत होता? आयव्ही मान्य करते की ॲलीस मेनेल या कवयित्रीची मुलगी व्हाओला हिच्यावरोबरच्या आपल्या सलगीबाबत ती सचिंत असे. आपल्या ख्यातनाम मित्रांमध्ये तिची ओळख करून देण्याचे आयव्ही शक्यतो टाळत असे. आणि तिच्या या सलगीवरून लॉरेन्स तिला निष्ठूरपणे टोचून बोलत असे.

सहा आठवड्यानंतर आयव्ही इंग्लंडला जायला निघाली तेव्हा तिचा आत्मविश्वास खचला होता. आपल्या हातून यापुढं काहीही लिहून होणार नाही याबद्दल तिची पुरती खात्री पटली होती. तिची धास्ती अनाठायी नव्हती. तिनं कादंबरी लिहिली ती त्यानंतर पंधरा वर्षांनी. लॉरेन्सबरोबरची तिची मैत्री मात्र अतूट राहिली. कॅथरीन मॅन्सफिल्ड तर आयव्ही समोर दिसली की अक्षरश: पळ काढत असे. लॉरेन्सनं आयव्हीला कधी टाळलं नाही. तिच्यामुळंच त्याची व्होओला मेनेलशी ओळख झाली. व्हाओलानंच १९१५ मध्ये ससेक्समधील ग्रॅटहॅम येथील आपली कॉटेज लॉरेन्सांना दिली. आयव्हीनं मॅक्झिम लिट्विनोफ याच्याशी लग्न केलं तेव्हा त्यानं आपणहून तिला विचारलं, चित्रकार मार्क गेर्टलर याच्याकडे त्याचं एक किचन टेबल आणि खुर्च्या आहेत, त्या तिला हव्या असल्यास घेऊन जाव्यात. लग्नासमयी मॅक्झिम लंडनमधील एका प्रकाशकासाठी काम करत होता. पुढं तो सोव्हिएट परराष्ट्र मंत्री झाला.

१९१४ च्या जानेवारीत एडवर्ड मार्श लॉरेन्सला भेटून गेला. मिसेस गार्नेटही पाहुणचार घेऊन गेली. पण मिडलटन मरे आणि कॅथरीन मॅन्सफिल्ड हे अपेक्षित स्नेही मात्र आले नव्हते. त्या दोघांची प्रकृती चांगली नव्हती. 'न्हिदम'चा गाशा गुंडाळण्याची घटिका जवळ

आली होती. आर्थिक विवंचना, कॅथरीनला सुखी करण्यास आपण समर्थ आहोत की नाहीत हा जीवाला लागलेला घोर, मरेनं लॉरेन्सला पत्र लिहून आपलं मन मोकळं केलं. त्याला लॉरेन्सनं पूर्वी सल्ला दिला होता की, कॅथरीनला वर्षाला शंभर पौंड मुशाहिरा मिळतो, त्यावर त्यानं आणि कॅथरीननं इटालीमध्ये येऊन राहावं. त्याचा हा सल्ला मरेला मान्य नव्हता. त्या संदर्भात लॉरेन्सनं लिहिलं :

'जेव्हा तू म्हणतोस, कॅथरीनचे पैसे तू घेत नाहीस, याचा अर्थ तुझ्यावरील तिच्या प्रेमाचा विश्वास तुला वाटत नाही. तू सांगतोस तिला थोड्याशा चैनीची गरज आहे, आणि त्यापासून तिला वंचित करणं तुला आवडत नाही, याचा अर्थ तू तुझा स्वत:चा वा तिचा पुरेसा मान राखत नाही आहेस.

'मला असं दिसतं, अधिकाधिक निकट येण्याऐवजी, तुम्हाला एकत्र आणणारे बंध तुम्ही दोघं, जणू काही एकापाठोपाठ तोडून टाकत आहांत. मला वाटतं, तुम्ही दोघांनीही तुमच्या स्वत:च्या अंत:करणाचा प्रामाणिकपणे सल्ला घ्यायला हवा. तिला तू खरोखरीच हवा आहेस का, तुझी साथसंगत हवी आहे का, उभ्या आयुष्यात अन्य कुणी तिला नको आहे ना, या गोष्टींचा विचार तिनं करायला पाहिजे. याचा अर्थ हातचं काही तरी गमावणं. पण अशा आयुष्यात मी एकच तत्त्व जाणतो आणि ते म्हणजे उच्चतम गोष्ट मिळवण्यासाठी एखादी मामुली गोष्ट हातची गमावण्यास काही हरकत नाही. फक्त तो जे करतो त्याच्याशी त्यानं पूर्णपणे प्रामाणिक असायला हवं.'

मरेनं आत्मसंशोधन करावं, स्वत:ची प्रकृती सांभाळावी, विश्रांती घ्यावी, कमाई करण्यासाठी वॉल्टर पेटरच्या धर्तीचे निबंध लिहावेत, सहा महिने काम न करता राहावं लागलं तरी बेहत्तर; 'घे तिचे पैसे. तिची चैन तिला करता आली नाही म्हणून काही बिघडत नाही; त्यावाचून ती मरणार नाही.'– अशा उपदेशाच्या चार गोष्टी सुनावल्या. पण त्याचबरोबर मरेला इशाराही दिला : 'तिला चॉकोलेट देण्यासाठी तू स्वत:चं घामटं निघेपर्यंत काम करत राहिलास तर तिरस्कार करील ती तुझा. योग्यच ठरेल ते, यात तिचं काहीही चुकलेलं नसेल. आपल्या खातीर तू स्वत:चं बलीदान द्यावंस अशी तिचा इच्छा नसणार, मूर्ख माणसा----'

'गोष्टी सुरळीत व्हाव्यात अशी तुझी इच्छा असेल, तू आजारी असशील, थकला असशील तर, अखेरच्या पेनीपर्यंत तिचे पैसे घे आणि तिला स्वत:चं घरकाम स्वत:ला करू दे. नंतर तिला कळून येईल तुझं तिच्यावर प्रेम आहे. तुझ्याबरोबर ती समाधानी नाही म्हणून तिला तू दोष देणं उचित नाही. हे मूर्खा, तिच्यासाठी तू सर्वस्व उधळत नाहीं आहेस, तर ज्यांची खरोखरीच गरज नाही अशा सामान्य चैनी तिला पुरवण्यासाठी तिचा अपमान करतो आहेस तू. असमाधानी स्त्रीला चैनींची गरज असते. पण जिचं आपल्या पुरुषावर प्रेम आहे ती स्त्री फळकुटावर झोपेल.'

मरे आणि कॅथरीन यांनी एकमेकांची साथ सोडू नये असं लॉरेन्सला मनापासून वाटत

होतं म्हणूनच त्यानं अत्यंत कळकळीनं मरेला सल्ला दिला. तात्या पंतोजीच्या थाटात. तसं त्यानं पुढल्या एका पत्राला लिहिलंही. त्याला खात्री होती, एक दिवस ते सारे भरपूर कमाई करतील आणि एकत्र मौजमजा करतील. दु:खदैन्याचा त्याला वीट आला आहे.

'आम्ही, फ्रीडा आणि मी, पुन्हा हळूहळू निकट येत आहोत असं लॉरेन्सनं मरेला लिहिलेल्या पत्राची अखेर करताना लिहिलं होतं. त्याच्या लिहिण्यात तथ्य होतं हे खरं, परंतु ही प्रक्रिया जीवघेणी होती हेही तितकंच खरं. त्याचं लेखनाकडे दुर्लक्ष झालं. फ्रीडाबरोबरच्या सहजीवनात सुसंवाद निर्माण करणं हे स्वत:च्या लिखाणापेक्षा त्यानं महत्त्वाचं मानलेलं दिसतं. त्यानं फारसं लेखन केलं नसलं तरी कलावंत म्हणून आपला विकास कसा करता येईल, आपली स्वत:ची अशी वाट कशी चोखाळता येईल याबद्दलचे विचार मात्र त्याच्या मनात सतत घोळत असावेत. एडवर्ड मार्श आणि एडवर्ड गार्नेट हे त्याचे आजवरचे मार्गदर्शक होते. मार्श हा त्याच्या काव्यलेखनात तर, गार्नेट त्याच्या गद्यलेखनात त्याला मार्गदर्शन करत होते. पण एव्हाना त्यांच्या सूचना तो अव्हेरू लागला होता. 'सन्स अँड लव्हर्स'च्या हस्तलिखितात हवीतशी काटछाट, सुधारणा करण्याची पूर्ण मोकळीक त्यानं गार्नेटला दिली होती,गार्नेटनं केलेल्या सुधारणा मान्य केल्या होत्या, इतकंच नव्हे तर संपादकीय संस्करणाचं काम आपल्याहूनही चोख बजावलं म्हणून लॉरेन्सनं त्याचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले होते. आपल्याला नेमकं काय करायचं आहे हे त्याला अद्याप नीटसं उमगलेलं नव्हतं, आपल्या लिखाणात अद्याप बऱ्याच सुधारणा व्हायला हव्यात, याचं भान त्याला होतं. आणि या वाटचालीत मार्श आणि गार्नेट यांच्या मार्गदर्शनाचा उपयोग आपल्याला होणार नाही याचंही भान त्याला होतं. म्हणून इत:पर आपल्या साहित्यात अवाजवी ढवळाढवळ अन्य कुणी करावी हे त्याला नामंजूर होतं.

२४ मे १९१४ला 'वीकली विरुद्ध वीकली आणि लॉरेन्स' या घटस्फोट खटल्याचा निकाल लागला. फ्रीडाला घटस्फोट देण्यात आला पण तिच्या मुलांना तिच्याकडे सोपवण्यास कोर्टानं नकार दिला, त्यांना भेटण्याचीही तिला मनाई करण्यात आली. हे वृत्त लॉरेन्सांच्या कानी पडलं. त्यांनी इटाली सोडली. लॉरेन्स स्वित्झर्लंडमार्गे इंग्लंडला पोचला. फ्रीडा आपल्या आजारी वडिलांना भेटण्यासाठी बाडेन-बाडेनला गेली. त्या दोघांची ही भेट अखेरची ठरली. पुढील वर्षी वडील मृत्यू पावले.

जूनच्या अखेरीस लॉरेन्स आणि फ्रीडा इंग्लंडला पोचले. १३ जुलैला केन्सिंग्टन रजिस्टर ऑफिसात त्यांचा विवाह झाला. यावेळी मरे, कॅथरीन आणि कॅंपबेल साक्षीदार म्हणून उपस्थित होते. हा विवाहसमारंभ साधेपणानं पार पडला. या समारंभाला जाण्याआधी वीकलीनं दिलेली आंगठी फ्रीडानं कॅथरीनला दिली आणि नंतर लॉरेन्सची आंगठी आपल्या बोटात घातली. लॉरेन्स आणि फ्रीडा आता कायदेशीररीत्या पति-पत्नी बनले.



अनुक्रमणिका

## नऊ

लॉरेन्सच्या इंग्लंडमधील या वास्तव्याच्या काळात बऱ्याच स्त्रिया त्याच्याकडे आकर्षिल्या जात होत्या. त्या साऱ्याजणी त्याच्या व्यक्तिमत्त्वावर, लेखनावर खूष होत्या. त्यांना तो नैतिक गुरू वाटत होता. त्यांच्या लेखी तो उपचारतज्ज्ञ होता. आणि तो प्रेषितागत त्यांना प्रवचनं देत होता. पत्रांमधून वा प्रत्यक्ष भेटीत, बऱ्याचदा अंत:स्फूर्तीनं, पण नेहमीच अधिकारवाणीनं. त्याच्या या मैत्रिणींमधील बऱ्याचशा उमराव घराण्यातील होत्या, काही धनिक होत्या. त्यांच्यात पुरुषांना आकर्षित करू शकणारं मादक सौंदर्य त्याला आढळलं असलं तरी, आपल्याबरोबरच्या त्यांच्या सलगीचा त्यानं, कधीही गैरफायदा उठवला नाही. त्याला स्त्रियांविषयी आस्था होती. कारण तो समंजस होता, त्यांच्या समस्यांची त्याला उत्तमप्रकारे जाण आहे, शिवाय त्यांच्यामधल्या 'स्व'ची त्यांना ओळख करून देण्यात तो साहाय्यभूत ठरू शकतो. या स्त्रिया त्याच्याशी आदरानं वागत, त्याच्याकडे आस्थेनं लक्ष पुरवत. अशी वागणूक त्याला फ्रीडाकडून मिळत नव्हती, मिळायची सुतराम शक्यता नव्हती.

२० जुलै १९१३ रोजी लॉरेन्स लेडी सिंथिया ॲस्क्विथला प्रथम भेटला. लॉरेन्स तेव्हा किंग्जगेटला राहात होता. तिचं वास्तव्य जवळच ब्रॉडस्टेअर्सला होतं. एडवर्ड मार्श लॉरेन्सांना घेऊन तिच्या घरी गेला. २६ वर्षांच्या या लावण्यवतीचा लॉरेन्सवर भलताच प्रभाव पडला. तो आणि फ्रीडा नीतिबाह्य अतएव पापी जीवन जगत असल्याचा बोभाटा होत असूनही सिंथियानं लॉरेन्सांचं अतिशय आदबशीर स्वागत केलं. तिच्या आदरातिथ्यानं लॉरेन्स सुखावला.

लेडी सिंथिया ही बेमिस्सच्या अर्लची कन्या. विल्टशायरमधील त्यांच्या प्रशस्त प्रासादात १८८७ मध्ये तिचा जन्म झाला. राजदरबारी तिला प्रवेश होता. इंग्लंडच्या पंतप्रधानाचा मुलगा हर्बर्ट याच्याशी तिनं विवाह केला. हर्बर्ट व्यवसायानं बॅरिस्टर. पण तिच्या विवाहित बहिणींच्या तुलनेनं अस्क्विथांपाशी धनदौलत फारशी नव्हती. सिंथिया राहात असे डामडौलानं पण पैशाची चणचण तिला सदाचीच भासत असे. साहित्यिकांवर तिचा भारी लोभ. आणि साहित्यजगतात काहीही करायचा तिचा उत्साह उदंड. 'हॅपिली आय रिमेंबर' (१९५०) या तिच्या आत्मवृत्तात तिनं लिहिलं आहे की स्वत:चं लिखाण छापून आलेलं पाहून ती फार खूष होत असे. रँडॉल्फ चर्चिलनं तिचं वर्णन आजवर होऊन गेलेल्या 'फ्लर्ट' मधील सर्वश्रेष्ठ अशा शब्दात केलेलं आहे. ती थोडीशी उथळ होती आणि तरुण आपल्या प्रेमात पडतात हा विचार तिला सुखावत असे.

प्रेम जडलं म्हणून सिंथियानं हर्बर्टशी लग्न केलं होतं. पण वैवाहिक जीवनातील प्रारंभीची नवलाई ओसरल्यानंतर तिला वैतागवाणं वाटू लागलं होतं. या जोडप्याला आत्मप्रतिष्ठा उंचावण्यासाठी इतरांच्या खुषामतीची आत्यंतिक गरज होती, सिंथियाला तर

फारच. तिला वाटत असे, आपल्या अवतीभोवती नेहमी चाहते असावेत. लॉर्ड बेसिल ब्लॅकवूडसारख्या वयस्कराकडून होणारं कौतुकही तिला लाखमोलाचं वाटत असे. तिनं त्याला चुंबनं घेऊ दिली, पण त्याची 'मिस्ट्रेस' होण्यास नकार दिला. तिनं आपल्या डायरीत नमूद केलं आहे, 'समागमापेक्षा प्रेम संपादन करणं तिला अधिक आवडतं.'

'द ट्रेसपासर' या कादंबरीत हेलन कॉर्कवर आधारित हेलेनाचं लॉरेन्सनं वर्णन केलं आहे: 'एक स्वप्नाळू स्त्री, जिच्या लेखी वासना मुखापाशीच संपुष्टात येतात, जिच्या कामनांची परिपूर्ती प्रेमभऱ्या चुंबनात होत असे ! हेच वर्णन सिंथियालाही लागू पडतं. तिच्यावर जी काही पात्रं लॉरेन्सनं बेतलेली आहेत त्यांचे नवरे बहुतेक करून शारीरिक प्रेम देत नव्हते. आणि तिच्याशी लॉरेन्सची अतिशय दाट जानपहचान झाली होती. त्या काळात लैंगिक परिपूर्तीपेक्षा स्वत:चं कौतुक करून घेण्यात तिला अधिक स्वारस्य वाटत असे. लॉरेन्स ज्याला 'सच्चा' प्रियकर म्हणतो तसा प्रियकर तिला कुणीच नव्हता आणि आपल्या पतीशी शक्यतोवर प्रामाणिक राहाणं, निदान शय्यासोबतीत, तिला पसंत होतं.

सिंथियाची प्रकृती तशी दुबळी होती. तिला क्षय झाल्याचं निदान झालं होतं. लॉरेन्सला ती प्रथम भेटली तेव्हा स्कॉटलंडमधील सॅनिटेरियममधून ती नुकतीच परतली होती. लॉरेन्सनं कविता लिहिल्या आहेत आणि तो खाणकामगाराचा मुलगा आहे एवढीच त्याची माहिती आपल्याला होती असं सिंथिया सांगते. किंग्जगेटमध्ये असताना लॉरेन्स बऱ्याच वेळा तिच्याबरोबर फिरायला जात असे. १९२१मध्ये त्यानं लिहिलेल्या 'द लेडी बर्ड' या कथेतील 'ऑब्सेशन' असल्यागत स्वत:च्या रूपावर प्रेम असणारी लेडी दाफ्ने सिंथियावर आधारलेली आहे. सिंथियाचा नाजूक बांधा, तिचे निळे-हिरवे डोळे यांचं त्याला कौतुक होतं आणि त्यानं ते कधी लपवलेलं नव्हतं.

सिंथिया आणि लॉरेन्स एवढे निकट आले होते की त्यांचं 'अफेअर'असावं असा संशय तिच्या घरातली माणसं घेत असत. लॉरेन्स तिच्या प्रेमात पडला होता, बऱ्याच वेळा तिची स्वप्नं तो रंगवत होता हे खरं, पण समागमासाठी त्यानं कधीही तिच्यावर दडपण आणलं नव्हतं. किंबहुना त्याच्या साऱ्या स्त्री-चाहत्यांशी त्याचं वर्तन पाक होतं. रिचर्ड ॲल्डिंगटन या त्याच्या कविमित्रानं आणि चरित्रकारानं स्त्रियांना त्याच्याविषयी वाटणाऱ्या आकर्षणाच्या संदर्भात लिहिलं आहे. त्यांना आकर्षण होतं त्याच्यामधील 'प्रतिभावंता'चं, त्याला थोर कलाकार बनवणाऱ्या त्याच्यामधील उत्कृष्ट गुणांचं. या परस्परांविषयीच्या आकर्षणात कामभावनेला स्थान नव्हतं. सिंथियानं तिच्या आठवणींमध्ये लिहिलं आहे की तिनं कधीही त्याच्यासंगे 'सेक्स'वर चर्चा केलेली नव्हती, इतकंच नव्हे तर त्यानं तो शब्द कधी वापरल्याचं तिला स्मरत नव्हतं. लॉरेन्सच्या निधनानंतर तिनं उद्‌गार काढले की त्याच्या सहवासात दोन मिनिटं राहिल्यानंही इतरांपेक्षा तो किती वेगळा आहे हे कुणालाही जाणवलं असतं. त्याच्याबरोबर हिंडताना निसर्गामधील नानाविध गोष्टींबद्दलचं त्याचं सूक्ष्म अवलोकन

पाहून कुणीही स्तिमित झाला असता. त्याच्या सहवासामुळं तिच्यातील जीवनेच्छा फुलारली होती हे तिनं मोकळेपणानं मान्य केलं होतं. स्वत:विषयी बोलणं तिला प्रिय होतं आणि आपुलकीनं ऐकणारा लॉरेन्ससारखा श्रोता तिला लाभला होता. आपल्या साऱ्या कटकटी, विवंचना ती त्याला सांगत होती आणि त्याचा सल्ला घेत होती. तिच्या दोन्ही मुलांच्या आजारपणात त्यानं तिला जो सल्ला दिला होता तो एवढा मानवला की ती सांगते की त्याच्याएवढा 'आरपार पाहू शकणारा मानसोपचारतज्ज्ञ' तिला कधी आढळला नव्हता. १९२६मध्ये त्यानं लिहिलेली 'द रॉकिंग-हॉर्स विनर' ही कथा त्याला ॲस्क्विथाचं कौटुंबिक दु:ख पाहूनच स्फुरली होती.

लेडी सिंथिया आणि लॉरेन्स यांची मैत्री सलगीची असूनही फ्रीडाला तिच्याबद्दल कधी असूया वाटली नव्हती. आपली प्रतिस्पर्धी म्हणून फ्रीडानं तिला मानलं नव्हतं. आपल्या अगदी खाजगी गोष्टीही तिला सांगण्याइतपत दोघींची गट्टी झाली होती.

१९१५च्या जूनमध्ये फ्रीडा आणि सिंथिया केंटच्या समुद्रकिनाऱ्यावर फेरफटका मारत असताना, फ्रीडानं तक्रार केली होती की लोक,'खास करून स्त्रिया– त्यातही खास एक स्त्री'– ती एक बांडगूळ आहोत अशा तऱ्हेनं तिला वागवतात, तिचा स्वत:चा नवरा कसा आहे हे तिला 'समजावून' देण्याचा अट्टाहास करतात, तिला सांगतात की 'सरळ आकाशातून खाली उतरलेला' तो एक जीव आहे. शक्यता आहे, ज्या 'एका स्त्री'चा फ्रीडानं उल्लेख केला होता ती साहित्यविश्वात यजमानीण म्हणून मिरवणारी लेडी ओट्टोलिन मोरेल असावी. असं असेल तर त्या दोघींमधल्या ताणतणावाला फ्रीडाला वाटणारी असूया कारणीभूत आहे हा लेडी ओट्टोलिनचा समज खरा ठरतो.

लेडी ओट्टोलिन लेडी सिंथियाप्रमाणं मवाळ वृत्तीची नव्हती. लेफ्टनंट जनरल आर्थर बेंटिकची ती कन्या. ड्यूक ऑफ पोर्टलँडची सावत्र बहीण. पार्लमेंटचा लिबरल सभासद फिलिप मोरेल याची पत्नी. तिचा चेहरा लांबोडका होता. ठेवण पुरुषी होती. तरीही तिचं रूप आकर्षक होतं. १९१४च्या वसंतात तिची लॉरेन्सशी मैत्री जुळून आली तेव्हा तिनं चाळिशी ओलांडलेली होती. तत्पूर्वी त्याच्या लिखाणाचं कौतुक करणारं एक पत्र तिनं त्याला लिहिलं होतं आणि बेडफोर्डमधील आपल्या घरी येण्याचं आमंत्रण दिलं होतं. तिथून ऑक्स्फर्ड–शायरमधील गार्सिंग्टन येथील आपल्या वाड्याला त्यानं भेट द्यावी असंही तिनं सुचवलं होतं. हा वाडा एलिझाबेथकालीन होता. अवतीभवती पाचशे एकरांचं आवार होतं. वाड्यात अद्ययावत सुखसोयी होत्या. रेशमी पडदे, पर्शियन गालिचे वाड्यात पाऊल टाकणाऱ्यांचं लक्ष वेधून घेत. नामवंत लेखक, चित्रकार, राजकारणी यांना गार्सिंग्टनला येण्याचं आमंत्रण देणं, त्यांची राजेशाही तैनात राखणं याची ओट्टोलिनला मनापासून हौस. जे कोणी तिचं आमंत्रण स्वीकारून गार्सिंग्टनला जात त्यांना दिवसभर शांतचित्तानं स्वत:चं काम करता येत

असे आणि सायंकाळच्या रंगतदार चर्चेत त्यांनी भाग घ्यावा अशी अपेक्षा असे.

लेडी ओट्टोलिनला काळाचं अचूक भान होतं. ती सढळ हाताची होती. तरीही तिची कुचेष्टा केली जात असे. या कुचेष्टाखोरांमध्ये तिनं मदत केलेली माणसंही असत. काही प्रमाणात तिचं रूप याला कारणीभूत होतं. तिच्या व्यक्तिमत्त्वामध्ये मादकता असली तरी, तिचं बोलणं, हसणं पुरुषी होतं. उंची टोप्या आणि नजर वेधून घेणारे चटेरीपटेरी पोषाख या आडून आपल्या देहाचा डौलदारपणा बघणाऱ्याच्या नजरेत भरावा याची दक्षता ती घेत असे. तिच्या ख्यातनाम पाहुण्यांइतकंच तिचं व्यक्तिमत्त्व संपन्न होतं आणि उच्चभ्रू वर्गातील प्रतिष्ठितांपेक्षा, प्रतिभावंत म्हणून मान्यता लाभलेल्या कुठल्याही माणसाबद्दल तिला अधिक आस्था असे.

लेडी ओट्टोलिन आणि बॅरनकन्या फ्रीडा या दोघींचं एकमेकींशी कधीच जुळलं नाही. १५ जून १९१४ रोजी लॉरेन्स आणि फ्रीडा गार्सिंग्टनला राहायला आल्याची आनंददायी वार्ता नमूद करतानाच फ्रीडाच्या वागणुकीसंबंधी तिखट प्रतिक्रिया ओट्टोलिननं आपल्या डायरीत नोंदवल्या आहेत: खोलीचं रंगकाम चालू होतं आणि लॉरेन्स अंगात संचारल्यागत त्या कामात मदत करत होता आणि फ्रीडा बसल्या जागेवरून तो करत असलेल्या कामाची खिल्ली उडवत होती. धुमसत राहाण्याच्या फ्रीडाच्या वृत्तीचं वर्णन करताना ओट्टोलिन सांगते की लॉरेन्स वा अन्य पाहुणा यांच्यावर कुठल्याही क्षणी झडप घालून त्यांच्यावर हल्ला करण्याच्या पवित्र्यात ती असते, एखाद्या वाघिणीगत. फ्रीडा सांगते, लेडी ओट्टोलिनचा लॉरेन्सच्या आयुष्यावर बराच प्रभाव पडला होता. तिचा सुसंस्कृतपणा, तिचा सुंदर वाडा, तिची सामाजिक प्रतिष्ठा हे लॉरेन्सच्या लेखी महत्त्वाचं होतं. तिला वाटायचं, गर्भश्रीमंत यजमानिणीच्या प्रभावाखालीच लॉरेन्सला राहू द्यावं. तिच्याशी आपलं सख्य जुळलं नाही याचं कारण तिच्याबद्दल वाटणारी असूया असं फ्रीडा सांगते. पण ओट्टोलिनचं म्हणणं, असूया हे एक कारण, एकमेव कारण नव्हे. लॉरेन्सला प्राप्त झालेली सामाजिक प्रतिष्ठा, उच्चवर्गीयांकडून होणारं त्याचं कौतुक आणि त्याच्या आयुष्यावरील एक 'बांडगूळ' म्हणून तिला दिली जात असणारी वागणूक फ्रीडाला खपत नव्हती, मानहानीकारक वाटत होती. गार्सिंग्टनच्या जगात तिच्या अस्तित्वाची दखल फारशी घेतली जात नसे. लॉरेन्सच्या इतर मित्रांप्रमाणंच ओट्टोलिनचंही मत होतं की फ्रीडा लॉरेन्सला अनुरूप नाही. लॉरेन्स वैवाहिक जीवनातील काही नीतिमूल्य मानणारा असल्यामुळं फ्रीडाशी तो प्रामाणिक होता. शिवाय जीवनाला एकट्यानं सामोरं जाण्याची धमक संवेदनाशील लॉरेन्सच्या अंगी नव्हती. गार्सिंग्टनला लॉरेन्स आणि फ्रीडा पहिल्यांदाच राहायला आली त्या रात्री त्यांचं कडाक्याचं भांडण रात्रभर चाललेलं पाहून ओट्टोलिन घाबरीघुबरी झाली होती. दुसऱ्या दिवशी लॉरेन्स खाली आला तेव्हा फटकारे खाल्ल्यागत, अनाथागत तो दिसत होता.

ओट्टोलिन आणि फ्रीडा एकमेकींच्या मैत्रिणी व्हाव्यात म्हणून लॉरेन्स उत्सुक होता आणि या कामी त्याला साहाय्य करण्याची ओट्टोलिनचीही तयारी होती. पण तो योग जुळून येणं केवळ अशक्य होतं. बौद्धिक जगाचं आणि सांस्कृतिक हक्काचं प्रतिनिधित्व करणारी एक स्त्री म्हणूनच लॉरेन्स ओट्टोलिनकडे बघत होता. तर त्यांची मैत्री त्याच्या जीवनातील आपलं महत्त्व कमी करते अशी फ्रीडाची धारणा होती. फ्रीडाला सोडून दिलं तर लॉरेन्स अधिक सुखी होईल हे ओट्टोलिनचं मत तिला कळलं तेव्हापासून तर तिच्याबरोबरचं फ्रीडाचं वैमनस्य वाढत गेलं. फ्रीडा तिचा जेवढा मत्सर करत होती, तेवढा लॉरेन्सच्या निकट आलेल्या अन्य कुणाही स्त्रीचा करत नव्हती. लॉरेन्सबरोबर आत्मिक बंध जुळून येणं ही बाब ओट्टोलिनला थरारक वाटत होती तर नेमकी हीच बाब फ्रीडाला खटकत होती. तिनं ओट्टोलिनला सुनावलं होतं: 'तुझं आणि त्याचं नित्याच्या प्रेमप्रकरणासारखं असलं तर फिकीर नाही– पण मला तिटकारा आहे तो या "आत्मिक भावविवशते"चा.'

ओट्टोलिनला लॉरेन्सनं लिहिलेली बरीचशी पत्रं उपदेशकाच्या अभिनिवेशानं भरलेली आहेत. त्या पत्रांची भाषा उद्धट वाटावी एवढी परखड आहे. तरीही ओट्टोलिननं त्याचा राग धरला नाही, निखळ प्रेमानंच त्याला प्रतिसाद दिला, त्याच्याशी नेहमीच इमान राखलं. लॉरेन्सलाही तिचा आधार वाटत असे. 'द रेनबो'वर बंदी घालण्यात आली तेव्हा त्या कादंबरीचं हस्तलिखित सुरक्षित राहावं म्हणून लॉरेन्सनं ते गार्सिंग्टनला पाठवून दिलं होतं ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे.

१९१४च्या जूनमध्ये कॅथरीन कार्सवेल या लेखिकेशी लॉरेन्सची सलगी जुळून आली. कॅथरीन ही आयव्ही लो हिची मैत्रीण. आपल्या पहिल्या पत्राला पाठवलेलं लॉरेन्सचं उत्तर आयव्हीनं मोठ्या अभिमानानं कॅथरीनला वाचून दाखवलं होतं. 'इंग्लीश रिव्ह्यू' मधून प्रसिद्ध झालेलं लॉरेन्सचं लिखाण कॅथरीनच्या वाचनात आलेलं होतं आणि ते तिला अतिशय आवडलेलंही होतं. लॉरेन्स इटालीमधून इंग्लंडला आले होते आणि कॅंपबेलांच्या घरी त्यांचं वास्तव्य होतं. कॅथरीननं त्यांना चहाचं आमंत्रण दिलं. कॅथरीन हॅम्पस्टेड येथे राहात होती. लॉरेन्स आणि फ्रीडा तिच्या घरी गेले. या चहापानाला आयव्ही लो आणि व्हाओला मेनेल या उभयतांच्या परिचित मैत्रिणीसुद्धा आल्या. या पहिल्या भेटीतच कॅथरीनला जाणवलं की लॉरेन्सचं व्यक्तिमत्त्व ज्योतीगत आहे, भोवतालचं वातावरण प्रसन्न करणारं. हा माणूस अंगिकारलेल्या कार्यात स्वकर्तृत्वानं उच्च स्थानी पोहोचू शकणारा आहे. त्याचे हिऱ्यागत तेजस्वी डोळे, मातीच्या रंगाचे दाट केस, त्याचा मोहक अधर, सुंदर हात आणि जलद पण चलबिचलपणाचा मागमूस नसलेल्या त्याच्या हालचाली कॅथरीनच्या मनात ठसल्या. फ्रीडामधलं सळसळतं चैतन्यही तिला जाणवलं. लॉरेन्सबरोबरचं असुरक्षित आयुष्य स्वीकारण्यात तिनं दाखवलेल्या धैर्यानं ती स्तिमित झाली.



अनुक्रमणिका

चहापानानंतर कॅथरीन लॉरेन्सबरोबर फिरायला बाहेर पडली. चर्चजवळून जात असताना तिला आपल्या मृत मुलीची आठवण झाली. त्या चर्चच्या आवारातच तिच्या मुलीचं दफन करण्यात आलं होतं. तिच्या आठवणींनी तिला भडभडून आलं. भावनावेगानं ती भरभरून बोलू लागली. जणू काही कित्येक वर्षांपासून ती लॉरेन्सला ओळखत होती. लॉरेन्स हेलावून गेला. तत्क्षणी त्यांचे ऋणानुबंध जुळले गेले.

कॅथरीन फ्रीडाच्याच वयाची होती. ग्लासगो येथील एका प्रेसबिटेरिअन व्यापाऱ्याच्या कुटुंबात १८७९ मध्ये तिचा जन्म झाला. तिचं सुरुवातीचं शिक्षण ग्लासगो विद्यापीठात झालं, त्यानंतरचं फ्रँकफर्ट कॉन्झर्वेटरीमध्ये. तिथं ती पियानो शिकली. १९०४ मध्ये तिनं हर्बर्ट जॅक्सनशी लग्न केलं. हर्बर्ट चित्रकार होता. बोअर युद्धात त्यानं भाग घेतला होता. लग्नानंतर हर्बर्टचं वास्तवाचं भान सुटलं. आपण गर्भार असल्याचं सांगताच तो तिच्या जीवावर उठला. पिस्तुलानं तिचा जीव घेण्याची त्यानं धमकी दिली. समागम करण्यास आपण असमर्थ आहोत असं तो समजत होता. त्यानंतर तो पागल असल्याचं निदान झालं. घटस्फोटाचा खटला सुरू झाला. खटला खळबळजनक ठरला. कोर्टानं विवाहबंधनातून तिला मुक्त केलं. १९०५ मध्ये तिला मुलगी झाली. चरितार्थ चालवण्यासाठी 'ग्लासगो हेराल्ड' मध्ये साहित्यसमीक्षक म्हणून ती काम करू लागली. 'द व्हाईट पिकॉक'चं तिनं केलेलं परीक्षण लॉरेन्सची भलावण करणारं होतं. पुढं ती 'ग्लासगो स्कूल ऑफ आर्ट' मधील प्राध्यापक मॉरीस ग्रीफेनहॅगन याची 'मिस्ट्रेस' बनली. मॉरीस तिच्याहून सोळा वर्षांनी मोठा होता. पुढे १९१४च्या ऑक्टोबरमध्ये डोनाल्ड कार्सवेल या बॅरिस्टरशी तिचं लग्न ठरलं. ही आनंदाची बातमी तिनं लॉरेन्सला कळवली. लॉरेन्सनं उत्तरादाखल लिहिलं (२१ ऑक्टोबर) की तिचं लग्न ठरल्याचं वाचून त्याला आणि फ्रीडाला आनंद झाला. तिच्या आयुष्यात आता तिला स्थैर्य लाभेल आणि ती अधिक सुखी होईल. 'नाहीतरी, सुखी असणं हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे. जीवनाला धैर्यानं सामोऱ्या जाणाऱ्या माणसांचाच परिचय करून घेणं मला पसंत असतं. हातपाय गाळणारे आतासे माझ्या मस्तकात जायला लागले आहेत. तुझ्या बातमीनं आम्ही आनंदित झालो आहोत.' तिच्या लग्नात, पैशाची चणचण असूनही लॉरेन्सनं तिला एक सुबक तबक पाठवून दिलं. मिळमिळीत स्वभावामुळं आपल्या व्यवसायात यश मिळवणं डोनाल्डला कठीण होत गेलं, नैराश्यानं त्याला घेरलं. तो दारूच्या आहारी गेला, फुकाची बडबड करण्यात वेळ वाया दवडू लागला. कॅथरीनच्या आयुष्यावरचं दु:खाचं सावट दूर झालंच नाही.

कॅथरीनबरोबरच्या लॉरेन्सच्या मैत्रीत शारीरिक आकर्षणाचा, अल्पसा का होईना, भाग असावा. तिच्या सहवासात त्याचं वागणं अवघडल्यागत असायचं. या संदर्भात पुढील घटना लक्षणीय आहे: १९१६ मध्ये कॅथरीन लॉरेन्सच्या घरी पाहुणचारासाठी गेली होती. गुडघ्यापर्यंत पेटीकोट, त्यावर लांब बाह्यांची लोकरी ब्रंडी या पोषाखात ती घरभर वावरत

होती. या आखूड वस्त्रांमध्ये तिला पाहून तो भयंकर अस्वस्थ झाला होता. शेवटी न राहवून तिच्या पोषाखावरून त्यानं तिची खरडपट्टी काढली होती. स्वत:च्या वासना काबूत ठेवण्याचा त्याचा हा सावध पवित्रा होता.

लॉरेन्सच्या इतर परिचित स्त्रियांच्या तुलनेत कॅथरीनवर बेतलेली पात्रं त्याच्या साहित्यकृतीत फारच थोडी आहेत. तरीही त्याच्या 'द ब्लाइंड मॅन' या कथेतील इसाबेला पेरविनच्या संदर्भात कॅथरीननं उद्गार काढले आहेत. वस्तुस्थितीवर नेमकं बोट ठेवून लॉरेन्सनं तिला 'तडाखा' हाणलेला आहे. १९१८ मध्ये कार्सवेल पाद्र्यांच्या वसतिस्थानी राहात होते. ही पार्श्वभूमी लॉरेन्सनं कथेसाठी निवडली. इथलं वातावरण इसाबेलाच्या नवऱ्याच्या औदासिन्याला कारणीभूत ठरतं. तिला वाटतं ताण असह्य होऊन तो किंचाळेल, आणि इथून सुटका करून घेण्यासाठी, ती काहीही, अगदी काहीही देईल.' तिचा एक मित्र त्यांना भेटायला येतो. तो असताना आपल्याला खिजगणतीतही घेतलं जात नाही याची जाणीव इसाबेलाच्या नवऱ्याला होते. बायकोच्या भेटीला आलेल्या पाहुण्याशी जवळीक साधावी, जिव्हाळ्याचे संबंध जोडावेत यासाठी नवरा धडपड करतो. चाचपडत केलेली त्याची ही धडपड इसाबेला आणि तिचा मित्र यांना घुसखोरी वाटते. आपल्या नवऱ्याबरोबरच्या लॉरेन्सच्या संबंधाच्या संदर्भात 'द सॅव्हेज पिल्ग्रिमेज' या आत्मकथेत कॅथरीननं लिहिलं आहे:'तो आणि ज्याच्याशी मी लग्न केलं होतं तो माणूस एकमेकांचा मान राखत असले तरी त्यात सहानुभूतीचा अंश फारसा नव्हता.'

कॅथरीनबरोबरची लॉरेन्सची वागणूक अत्यंत आपुलकीची होती. त्या दोघांच्या थोड्याफार भेटीगाठी झाल्या असतील, कॅथरीननं जुलैमध्ये आपल्या कादंबरीचं हस्तलिखित त्याला वाचायला दिलं. तिची कादंबरी आत्मचरित्रात्मक होती, ग्लासगोमधील तिच्या तारुण्यदशेतील घटनांवर आधारित होती. जे काही सांगायचं ते सरळ न सांगता उगाचच आडवळणानं सांगण्याच्या तिच्या निवेदनशैलीवर त्यानं टीका केली. तरी उत्तम लेखिकेचे गुण तिच्या अंगी असल्याचं सांगून तिला प्रोत्साहन दिलं. लेखनात तिला मदत करण्याची तयारीही दर्शवली.

प्रपंचाचा गाडा रेटताना कॅथरीनची दमछाक होत आहे,मानसिक आघात ती निमूट सोसत आहे हे लॉरेन्स पाहात होता. त्याला भरंवसा होता, या दिव्यामधूनही ती पार पडेल. 'मला वाटतं, मला ज्या स्त्रिया भेटल्या त्यात तूच अशी एक आहेत जिच्या अंगी उपजतच अलिप्त वृत्ती आहे---- जातिवंत लेखक वा चित्रकार वा दप्तरदार होण्यालायक. इतरेजनांबरोबरचे तुझे संबंध हे तुझ्यामधील क्षणिक स्थित्यंतर असतं आणि मुलं व्हावीत, सर्वसामान्य मानवी इच्छांची पूर्ती व्हावी या गोष्टी तुला मिथ्या वाटत असल्याचा असा माझा समज आहे. "मिळून मिसळून" असावं हे तुझ्या स्वभावात नाही, तर स्व जपण्याकडे तुझा प्रामुख्यानं कल आहे, भले कोणतेही अनुभव येवोत.'

लॉरेन्स प्रतिभावंत आहे याबद्दल कॅथरीनच्या मनात चुकूनही कधी शंका चुकचुकली नाही. तिनं त्याचं चरित्र लिहिलं, वारेमाप कौतुक केलं. त्याचबरोबर आपल्या मित्रांसंबंधीच्या त्याच्या धारदार भाष्यातील बोचरी मर्मभेदकता हे त्याचं वैशिष्ट्यही तिनं नमूद केलं आहे. इतर स्त्रियांप्रमाणं तिनं लॉरेन्सवर कधी भावनिक दडपण येऊ दिलं नाही. आणि फ्रीडा तिच्याबाबतीत पूर्ण निर्धास्त होती. दोघींचा एकमेकींवर जीव होता.

मेरी कान्नान ही आणखीन एक मैत्रीण १९१४ मध्ये लॉरेन्सच्या आयुष्यात आली. मेरी ही पूर्वीश्रमीची मेरी ॲन्सेल. एक गुणी अभिनेत्री. लोकप्रिय कादंबरीकार गिल्बर्ट कान्नान याची पत्नी. तत्पूर्वी जे. एम. बॅरी या नाटककाराबरोबर तिनं तेरा वर्षं संसार केला होता. १९०९ मध्ये त्यांनी घटस्फोट घेतला. तरीही तिच्यावरील बॅरीचा जिव्हाळा अबाधित होता आणि तिला तो भरघोस वर्षासन देत होता. गिल्बर्ट घटस्फोटाच्या खटल्यात तो सहप्रतिवादी होता. मेरी त्याच्याहून सतरा वर्षांनी मोठी असूनही तिच्याशी त्याला लग्न करणं भाग पडलं होतं 'अभक्ष्य फळांनी भरगच्च भरलेली थाळी' अशा शब्दात त्यांच्या लग्नाचं वर्णन डेव्हिड गार्नेटनं केलं आहे. लॉरेन्सची मेरीशी ओळख झाली तेव्हा ती पंचेचाळीसएक वर्षांची होती. तरी तिचा चेहरा रेखीव होता, देखणा होता. त्यावर रंगरंगोटी कायमची. बोलत असताना तिचे डोळे गोलगोल फिरायचे. तिचा दुसरा विवाह सुखाचा नव्हता. १९१५ मध्ये कॅथरीन कार्सवेलच्या ध्यानी आलं की गिल्बर्ट अतिशय खिन्न आहे आणि मेरीचा उदंड उल्हासही त्याची खिन्नता दूर करू शकत नव्हता. पुढं कान्नान पतिपत्नीमधील बेबनाव वाढत गेला. आपल्याला कुणाचीतरी संगत असावी म्हणून दोघंही उत्सुक. मित्रमंडळींना आपल्या घरी येण्याचं आमंत्रणं देत असत. या मित्रांमध्ये लॉरेन्सचाही समावेश असे. गिल्बर्टचा पुढं मानसिक तोल ढळला. त्यातून सावरल्यानंतर त्यानं एक रखेली ठेवली, मेरीच्या मोलकरणीला पोटोशी केली. १९१७च्या सुमारास गिल्बर्ट आणि मेरी विभक्त झाले

लॉरेन्स जिवंत असेपर्यंत मेरी एखाद्या पाखरागत त्याच्या आयुष्यात येतजात राहिली. तिचा रुबाब, कुलंगडी सांगण्याची तिची हातोटी, लॉरेन्सला मनापासून आवडे. अर्थात तिच्या 'गॉसिपिंग' मध्ये विखार नसायचा. ती अं:करणाची दयाळू होती हे लॉरेन्स जाणून होता.

१९१४च्या ग्रीष्माच्या प्रारंभी लॉरेन्सला एक धनिक आश्रयदाती लाभली, ॲमी पॉवेल. पिकॅडेलीमधील वर्कली हॉटेलात तिनं लॉरेन्सांना ३० जुलैच्या भोजनाचं आमंत्रण दिलं. रिचर्ड ॲल्डिंग्टन, त्याची बायको हिल्डा डूलिटल ('एच्. डी') आणि एडवर्ड मार्श हेही आमंत्रित पाहुण्यांमध्ये होते. युद्धाच्या वातावरणाच्या पार्श्वभूमीवर झालेल्या या पार्टीत काव्यजगतातील लढाईचंच प्रदर्शन झालं.

ॲमी पॉवेल स्वत: कवयित्री होती आणि दोन वर्षापूर्वी इझरा पउंडनं सुरू केलेल्या प्रतीकवादी चळवळीची सूत्रं तिला स्वत:च्या हाती घ्यायची होती. तिचा हा प्रयत्न निष्फळ

ठरावा यासाठी पाउंड प्रयत्नशील होता. तिची तो जाहीर खिल्ली उडवत होता. हा भोजनसमारंभ आपलं स्थान बळकट कसं करता येईल याचा विचारविनिमय करण्यासाठी तिनं आयोजित केला होता.

मानाचा पाहुणा म्हणून लॉरेन्सला ॲमीनं तिच्या बाजूच्या खुर्चीवर बसवलं. पाउंडच्या साहित्यिक मानदंडानुसार, तरुण आधुनिक लेखकांमधील लॉरेन्स हा एक बिनीचा लेखक होता. आणि आपल्या वर्तुळात त्यानं यावं अशी ॲमीची इच्छा होती. आपल्या ग्रुपचा सभासद होण्याची तिनं विनंती केली, त्यावर तो म्हणाला, की, तो प्रतीकवादी नाही. तत्क्षणी

'The morning breakes like a promgranate
In shining crack of red—'

या त्याच्या 'वेडिंग मॉर्न' या कवितेच्या प्रारंभीच्या ओळी तिनं म्हणून दाखवल्या. आपल्या कविता ती संपादित करत असलेल्या संग्रहात समाविष्ट करण्याची त्यानं हसतमुखानं अनुमती दिली. प्रतीकवादाचा पुरस्कार मात्र त्यानं कधीही केला नाही.

ॲमी हुकूमत गाजवू पाहाणाऱ्यांपैकी होती, पण कवितेवरचं तिचं प्रेम वादातीत होतं. लॉरेन्स, एच. डी. यासारख्यांची ती निष्ठावान कैवारी होती. लॉरेन्सच्या कविता तिनं आपल्या संग्रहात प्रसिद्ध केल्या, इतकंच नव्हे तर त्याच्या आजारपणात, त्याच्या आर्थिक ओढघस्तीच्या काळातही तिनं सदैव मदत केली. 'द ट्रेसपासर'चा अमेरिकन प्रकाशक मिशेल केन्नरली याच्याकडील थकबाकी लॉरेन्सला मिळवून देण्यासाठी कसोशीनं प्रयत्न केले. ४ नोव्हेंबर १९१६ रोजी ६० पौंडाचा तिचा चेक हाती पडताच त्यानं लिहिलं : पैसे मी परत करू शकलो तरीही तुझा हा कनवाळूपणा मी नेहमीच जतन करीन. तथापि, तो खुषमस्कऱ्या नव्हता. एखादे प्रसंगी तो तिला खडसावून विचारायचा की जशी ती आहे तशीच ती नेहमी वागत का नाही ? तिच्या काळजामधून जर का एखादी गोष्ट बळेच बाहेर आली असेल, भले ती कितीही आकर्षक असो, त्यानुसार तिनं वागणं खचितच उचित नव्हे. त्याला ती उद्धट म्हणेल. पण तिला असे बहाणे करताना पाहून त्याला तिचा तिटकारा येतो. त्याला वाटतं, तिच्यामधील जी अस्सल व्यक्ती आहे तिचा ती विश्वासघात करत आहे. त्याचं हे म्हणणं मान्य करण्याइतपत ॲमी सहिष्णू होती. १९२५पर्यंत, तिचं निधन होईपर्यंत ती आणि लॉरेन्स एकमेकांशी संपर्क ठेवून होती.

'सन्माननीय' डोरोथी ब्रेट्टला लॉरेन्स १९१५ मध्ये प्रथम भेटला. त्याच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत त्याची ती नि:स्वार्थी भक्त राहिली. तिचे वडील व्हायकाउंट इशेर पार्लमेंटमध्ये लिबरल पक्षाचे सभासद होते. एके काळी राजदरबारी त्यांचं वजन होतं. आपल्या समलिंग–संभोगीपणावर पांघरूण घालण्यासाठी त्यांनी लग्न केलं होतं. आपल्या मुली मूर्ख आहेत असं त्याला वाटायला लावण्यासाठी त्यांनी हरप्रकारे सातत्यानं प्रयत्न केले होते. डोरोथी



अनुक्रमणिका

लहानपणापासून बहिरी होती आणि त्यावरून तिचे भाऊ तिची चेष्टा करत. ऐकू येण्यासाठी आयुष्यभर यंत्र लावणं तिच्या नशिबी आलं होतं. तिचे पुढील दात सशागत पुढं आले होते, तिची हनुवटी चिंचोळी होती. त्यावरून फ्रीडा नेहमी तिची मस्करी करत असे.

डोरोथीला ब्रेट्ट म्हणूनच ओळखलं जात असे. लॉरेन्सची तिची प्रथम भेट झाली तेव्हा ती 'स्लेड स्कूल ऑफ आर्ट' मध्ये विद्यार्थिनी होती. तिचा विद्यार्थी– मित्र चित्रकार मार्क गेर्टलर यांनं लॉरेन्सबरोबर तिची ओळख करून दिली होती. या भेटीत लॉरेन्स तिच्या आणि त्याच्या एका परिचिताबद्दल अतिशय मत्सरानं बोलला ही आठवण ती कधी विसरली नाही. म्हणून असेल कदाचित त्यांची मैत्री जुळून यायला काही कालावधी लोटावा लागला. शिवाय ती अतिशय लाजरी होती. शक्यता आहे जवळीक वाटावी असं लॉरेन्सला तिच्यामध्ये काही आढळून आलेलं नसावं. १९२३ मध्ये लॉरेन्सनं 'द बॉय इन द बुश' कथा लिहिली. त्यातील हिल्डा ब्लेसिंग्टन हे पात्र ब्रेट्टवर आधारलेलं आहे. काही माणसं अशा एका विचित्र सीमारेषेवर असतात, ज्यांची स्थिती 'अत्र ना परत्र' अशी असते, जी खरोखरीच कुणाची नसते, असूच शकत नाही. ती तशी असेल वा नसेलही, पण एवढं मात्र खरं की, गरजू कलावंतांच्या अडीअडचणीत त्यांना साहाय्य करण्यासाठी त्यांच्यांशी मैत्रीचे संबंध जोडणं यात ती धन्यता मानत असे. कॅथरीन मॅन्सफिल्डचा क्षयाचा विकार विकोपाला गेला होता. मृत्यूशी ती झुंज देत होती त्या काळात ब्रेट्टनं तिची सर्वतोपरी काळजी घेतली होती. लॉरेन्सशी तिच्या मैत्रीचे बंध जुळून यायला १९२३ साल उजाडावं लागलं होतं.

---

तुम्ही ज्या वेळेला चूक केलेली असते, तेव्हा मित्राची जागा तुमच्या शेजारी याचे कारण तुमचे जेव्हा बरोबर असते, तेव्हा जवळ जवळ प्रत्येकजणं तुमच्या शेजारी असेल.

**– मार्क ट्वेन यांच्या नोंदवहीतून**

---

आपणास ज्याची जाणीव आहे, असा एकही मुखवटा आपण धारण करीत नाही. तेव्हा आपल्या प्रत्येक मित्रासाठी आपल्याकडे एक खास मुद्रा असते.

**– ऑलिव्हर वेंडेल होम्स**

---

ज्या मैत्रीचा शेवट होतो, तिचा खरे म्हणजे कधीही आरंभच झालेला नसतो.

**– पुब्लीएस स्सीस** (इ. स. पूर्व पहिले शतक)

---

मैत्रीचे दोन अंगरखे, एक बाहेरचा व एक आतला.

**– लॉरेन्स स्टर्न टिस्ट्रम शँडीत**

# नोंदवही

## पहिली भेट

**ब्लेझे पास्काल आणि रने डेकार्ट**

१६४७ सालच्या सप्टेंबर महिन्यातील एका सकाळी– त्यावेळी चौदावा लुई नऊ वर्षांचा होता– पास्काल कुटुंबाच्या पॅरिसमधील घरासमोर एक घोडागाडी थांबली आणि त्यातून रने डेकार्ट बाहेर आले. कावेबाज व धूर्त शेतकऱ्यासारखे ते दिसत. त्यावेळी त्यांचे वय एकावन्न वर्षांचे होते. गणित या विषयातील तत्कालीन विद्वानांतही ज्यांना अतिशय मानाचे स्थान होते अशी ती व्यक्ती. तसेच तत्त्वज्ञान या विषयातही एक अधिकारी व महत्त्वाचा विद्वान. त्यांनी 'डिसकोर्स' नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला होता व त्यावेळी तो चांगलाच गाजत होता. या प्रसिद्ध ग्रंथामुळे तत्कालीन फ्रेंच बुद्धिवाद्यांमध्ये दोन तट पडले होते. एका बाजूला कार्टेशियनवादी; व त्याच्या विरोधात कार्टेशियनविरोधक. (कार्टेशियनवाद – हा डेकार्ट यांच्या नावातील शेवटचे शब्द घेऊन तयार केलेला शब्द. )

ब्लेझे पास्काल हा चोवीस वर्षांचा तरुण; तो कार्टेशियनवादी नव्हता. डेकार्ट यांचे एक सूत्र प्रसिद्ध आहे– 'मी विचार करतो म्हणजेच मी (अस्तित्वात/जिवंत) आहे.' या सूत्रासंबंधी पास्काल यांचा वाद नव्हता. परंतु केवळ युक्तिवाद व तर्क यांच्या जोरावर, अ) ईश्वराचे अस्तित्व, ब) निसर्गात पोकळी नसते, या दोन्ही गोष्टी कशा काय सिद्ध करता येतील याबद्दल त्यांना खात्री नव्हती. ईश्वराचे अस्तित्व भावते, ते कोणी तर्काने व युक्तिवादाने सिद्ध करीत नाही. 'पोकळी' विषयी बोलावयाचे झाल्यास त्यांनी स्वत:च प्रयोग करून 'पोकळी'चे अस्तित्व सिद्ध केले होते. असे होते तरीही डेकार्ट यांनी आपण पास्काल यांची भेट घेऊ इच्छितो असे सांगून, पास्काल यांनी त्या विनंतीस संमती द्यावी असे पास्काल यांना पत्र पाठविले. पास्काल यांनी त्या विनंतीस लगेच मान्यता दर्शविली. खरे म्हणजे पास्काल यांना आनंदच झाला होता. पास्काल त्यावेळी आजारी होते, तरीही त्या भेटीची सिद्धता करण्यात आली.

१६४७ च्या सप्टेंबर महिन्यातील त्या सकाळी प्राध्यापक रोबरव्हाल (ROBERVAL)– हे कोल्लेज ड फ्रान्स मध्ये प्राध्यापक होते; – त्या भेटीच्या ठिकाणी हजर होते. हा प्राध्यापक अत्यंत वाचाळ असा कार्टेशियनविरोधक. पास्काल यांची धाकटी बहीण जाक्येलिन (JACQUELINE) हीदेखील त्या पहिल्या भेटीच्या वेळी हजर होती. पास्काल यांनी नुकतेच बेरीज,वजाबाकी करणारे कॅलक्युलेटर यंत्र तयार केले होते. ते त्यांनी भेटीच्या वेळी बाहेर काढले आणि त्यावर बेरीज आणि वजाबाकी कशी करता येते त्याचे प्रात्यक्षिक करून दाखविले.



अनुक्रमणिका

डेकार्ट यांच्यावर त्या यंत्राचा व प्रात्यक्षिकाचा चांगलाच प्रभाव पडला. मग 'पोकळी' या विषयावर चर्चेला सुरुवात झाली. पास्काल यांनी ते जे काही नवे प्रयोग करीत होते, त्याबद्दल माहिती सांगितली. डेकार्ट यांनी नम्रपणे त्या प्रयोगाबद्दल शंका व्यक्त केली. – ही तशी अगदी आदबशीर अशी चकमक होती आणि ती त्या ठिकाणीच थांबलीही असती. परंतु प्रा. रोबरव्हाल हे फक्त, केवळ आदबशीर वागणूक करण्यासाठी, त्या ठिकाणी आले नव्हते. त्यांनी लगेच तोंड फोडले, त्या चर्चेत आपली स्वत:ची मते घुसडली. या सर्वांचा परिणाम अगदी गरमागरमीची चर्चा होण्यात झाला. त्या चर्चेतून काहीच निष्पन्न झाले नाही हा भाग वेगळा. डेकार्ट यांनी थोड्याच वेळात निरोप घेतला व ते निघाले.

दुसऱ्या दिवशी ते पुन्हा पास्काल यांच्या भेटीला आले. आता या खेपेस तत्त्वज्ञ डेकार्ट नव्हते, ते वैद्यकीय– डॉक्टर– डेकार्ट या भूमिकेत आले होते. ते आपल्या रुग्णाजवळ तीन तास बसले. त्यांनी त्याची चौकशी केली, त्याला त्यांनी तपासले, त्याने काय खावे हे सांगितले, कोठची सूप्स घ्यावीत यासंबंधी सूचना दिल्या, औषधे लिहून दिली, व सरते शेवटी रुग्णाने विश्रांती घेतली पाहिजे, असे बजावून त्यांनी पास्कालचा निरोप घेतला. पास्काल त्यांना तेव्हा असे म्हणाले की, 'अंथरुणात पडून पडून अगदी कंटाळा आला आहे,' तेव्हा 'तू लवकरच बरा होशील ' असा दिलासा डेकार्ट यांनी दिला. पुढील आयुष्यात पास्काल आणि डेकार्ट यांचे तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन नेहमीच विरोधी होते. परंतु डेकार्ट हा पास्काल यांच्या स्मरणात राहिला होता तो सर्वश्रेष्ठ असा बुद्धिवादी आणि दयाळू डॉक्टर म्हणूनच.

पास्काल तेव्हा असे म्हणाले की, 'हृदयाला जाणवणारी अशी काही कारणे असतात की त्याबद्दल बुद्धीला काहीच माहिती नसते.' त्यावेळी डेकार्ट यांची ती त्यांच्या स्मरणात असलेली' प्रतिमा त्यांच्या नजरेसमोर असावी .......

**– डॉ. मंगला सरदेशपांडे**

---

सगळ्या अमेरिकन साहित्याचा मूलस्रोत म्हणजे मार्क ट्वेनचे 'हकलबरी फिन' हे पुस्तक होय. तुम्ही जर ते वाचलंत तर जिम मुलांकडून पळवला जातो तेथवरच थांबा. तोच त्याचा खरा शेवट होय. पुढचा सारा भाग म्हणजे शुद्ध फसवणूक ! पण तरीही ते आपल्याला उपलब्ध असणारं उत्तम पुस्तक आहे. सगळं अमेरिकन साहित्य त्यातून जन्माला आलंय. त्याच्यापूर्वी काहीच नव्हतं आणि त्यानंतर त्याच्याएवढं चांगलं साहित्य निर्मिलं गेलंच नाही.

**–अर्नेस्ट हेमिंग्वे**

---

शब्दांशिवाय, लेखनाशिवाय, पुस्तकांशिवाय इतिहास असंभव आहे, एवढंच काय माणुसकीची संकल्पनादेखील अशक्य आहे.

**– हरमान हेस**



अनुक्रमणिका



फ्रांझ काफ्का
(१८८३-१९२४)

जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा
जर्मन कथा-कादंबरीकार.

विसाव्या शतकातील
या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा
मराठीमधील पहिला ग्रंथ

# थोडाबहुत काफ्का

शकुंतला नी. कनयाळकर

१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.
'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.

चरित्रपट, वाङ्मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

मूळ किंमत रु. २००
'तपशील' च्या वर्गणीदारांना
सवलतीची किंमत रु. १२०

त्वरित संपर्क साधा
नाना जोशी
४ अ, सोमण नगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२

अनुक्रमणिका

